# समर्पण



माझे मित्र

श्री. ए. श्री. पटवर्धन

यांस

स्नेहादरपूर्वक

# माडखोलकरांचीं पुस्तकें



## प्रबंध

१ आधुनिक कविपंचक
२ विष्णु कृष्ण चिपळूणकर
३ विलापिका
४ वाङ्मयविलास
५ स्वैर विचार
६ माझे आवडते लेखक
७ अवशेष
८ आव्हान
९ माझी नभोवाणी
१० जीवनसाहित्य
११ परामर्श
१२ संभावना
१३ माझे आवडते कवि
१४ व्यक्तिरेखा
१५ ऋणभार

## कादंबऱ्या

१ मुक्तात्मा
२ भंगलेलें देऊळ
३ शाप
४ कान्ता
५ दुहेरी जीवन
६ मुखवटे
७ नवे संसार
८ नागकन्या
९ डाक बंगला
१० चंदनवाडी
११ तीन दिवस
१२ प्रमद्वरा
१३ हें युद्ध
१४ देवगिरी
१५ चक्रवर्ती उदयन
१६ गोंडवन
१७ उमरा

## कथासंग्रह

१ शुक्राचें चांदणें
२ रातराणीचीं फुलें

## नाटिका

१ उर्वशी
२ शर्मिष्ठा
३ अगस्त्य
४ नचिकेत
५ एकलव्य
६ वृत्रहंता

**सौ. शांता माडखोलकर**

*‘वीस वर्षें’*

# निवेदन

ही कादंबरी लिहावयाला मी ता. २९ जून १९४२ रोजीं आरंभ केला आणि ता. ६ नोव्हेंबर १९४२ रोजीं, धनत्रयोदशीच्या दिवशीं मध्यरात्रीं, ती लिहून पूर्ण झाली. या कादंबरीचीं पंधरा प्रकरणें ता. १० ऑगस्टपर्यंत लिहून झालीं. तेव्हांपासून ता. ६ आक्टोबरपर्यंत म्हणजे सुमारें दोन महिने, निरनिराळ्या कारणां-मुळें, तिच्या लेखनांत खंड पडला होता. त्यानंतर शेवटलीं सात प्रकरणें ता. ६ नोव्हेंबरपर्यंत लिहून झालीं; व अशा रीतीनें गेल्या वर्षीच्या दिवाळींत पूर्ण झालेली ही कादंबरी कागदाच्या अडचणीमुळें, आतां १९४३ च्या जूनमध्यें प्रसिद्ध होत आहे.

या कादंबरींत घातलेलें घारापुरीच्या लेण्यांतील त्रिमूर्तीचें चित्र माझे सन्मान्य मित्र श्री. शेख याकूब मलक यांनीं आपल्या मूळ ' त्रिमूर्ति ' या सुंदर चित्रावरून माझ्या विनंतीनुसार तत्परतेनें तयार करून दिल्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे. त्याचप्रमाणें कादंबरीचें वेष्टन आपल्या नेहमींच्या मोहक शैलीनें सजवून दिल्याबद्दल श्री. दीनानाथ दलाल यांचाहि मी आभारी आहे.

ही कादंबरी लिहितांना प्रो. रा. म. मराठे, श्री. वि. अं. गिजरे, श्री. अ. ल. कोसरे, श्री. ज. श्री. देशपांडे, श्री. मा. कृ. पारधी आणि श्री. वसंतराव शहाणे यांची जी निरनिराळ्या प्रकारची मदत झाली, तिचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें अवश्य आहे.

या कादंबरींत बरेच मुद्रणदोष राहिले आहेत. त्यांपैकीं फक्त एक अत्यंत महत्त्वाचा मुद्रणदोष मुद्दाम येथें दुरुस्त करीत आहे. पहिल्याच प्रकरणांत पृष्ठ १८ वर १७ व्या ओळींत असें वाक्य आहे कीं, " मग कशाच्या जोरावर चंदनवाडी पुन्हा

परत मिळवणार आहे, ही बकाबाई कोण जाणे!" या वाक्यांतील 'बकाबाई' हा शब्द चूक असून तो '**बाकाबाई**' असा पाहिजे. 'बाकाबाई' ही नागपूरच्या दुसऱ्या रघूजी राजाची चवथी लाडकी राणी. स. १८१६ सालीं दुसऱ्या रघूजीच्या मृत्यूनंतर पुढें चाळीस वर्षे ज्या अनेक घडामोडी नागपूर दरबारांत झाल्या, त्यांत ही बाकाबाई प्रमुख होती; व तिच्या कारस्थानानें नागपूरचा पुढील इतिहास रंगलेला आहे. नागपूर संस्थान खालसा झाल्यावर तें परत मिळविण्यासाठीं बाकाबाईनें आमरण जे भगीरथ प्रयत्न केले, त्यांचें हृदयस्पर्शी वर्णन नागपूर रेसिडेन्सीच्या प्रतिवृत्तांत आणि इंग्रज इतिहासकारांच्या ग्रंथांत वाचावयाला मिळतें. त्यामुळें, एखादी बाई विशेष उलाढाली किंवा कर्तबगार असली, म्हणजे तिला कौतुकानें किंवा कुचेष्टेनें 'बाकाबाई' म्हणण्याचा प्रघात नागपूर प्रान्तांत आहे.

मुद्रणदोषांच्या विपुलतेप्रमाणेंच या कादंबरींत शुद्धलेखनाचें (कीं अशुद्धलेखनाचें?) वैचित्र्यहि वाचकांना भरपूर आढळेल. पण माझ्या डोळ्यांचा वाढता अधूपणा लक्षांत घेऊन त्यांनीं यापुढें असल्या सगळ्याच दोषांकडे सहृदयतेनें काणाडोळा केला पाहिजे.

नागपुरांतील त्यागी आणि चारित्र्यवान् कार्यकर्त्यांत अग्रगण्य असे माझे मित्र, महाविदर्भ सभेचे कार्यवाह, श्री. ए. श्री. पटवर्धन यांना मी ही कादंबरी अर्पण करीत आहे. महाराष्ट्राच्या या भागांत आल्यावर जे थोडे स्पृहणीय लाभ मला सुदैवानें घडले, त्यांत मी श्री. पटवर्धन यांच्या निरपेक्ष स्नेहाची गणना करितों. गेलीं सोळा सतरा वर्षे हेमन्त व्याख्यानमालेच्या उपक्रमापासून तों महाविदर्भ सभेच्या कार्या-पर्यंत अनेक चळवळींत आम्ही एकदीलानें काम केलें आहे. त्या सहकारितेचें संस्मरण म्हणूनच केवळ नव्हे, तर त्यांच्याविषयींची माझी नितान्त आदरबुद्धि व्यक्त करण्यासाठींच मुख्यतः, ही कादंबरी मी त्यांना अर्पण करीत आहे.

६ जून १९४३
चिचभुवन, नागपूर

**ग. त्र्यं. माडखोलकर**

### वि. स. खांडेकर

| | |
|---|---|
| फुलें आणि दगड | सायंकाल |
| घरट्याबाहेर | अविनाश |
| पहिलें प्रेम | मंदाकिनी |
| जळलेला मोहर | सहा भाषणें |
| क्रौंचवध | कलिका |

### ग. त्र्यं. माडखोलकर

| | |
|---|---|
| अवशेष | माझी नभोवाणी |
| नागकन्या | नवे संसार ( जप्त ) |

चंदनवाडी

### ना. धों. ताम्हणकर

तात्या भा. १ ला | निवाडे भा. १ ला

तात्या भा. २ रा

### साने गुरुजी

पुनर्जन्म | आस्तिक

### चिं. वि. जोशी

आणखी चिमणराव

नवें भारुड | स्टेशनमास्तर

### दत्तु बांदेकर

सख्या हरी | नवी आघाडी

### द. र. कवठेकर

अपुरा डाव | रेशमाच्या गांठी

---

नवें जग ?–पु. य. देशपांडे

रॅायचरित्र–भाई बेके

काव्यज्योति–प्र. ले. वि. स. खांडेकर

पारंब्या–आनंदीबाई जयवंत

ढासळलेले बुरूज–लक्ष्मण० सरदेसाई

व्यक्तिचित्रें–प्रो. वि. ह. कुलकर्णी

स्मृति-लहरी–वा. म. जोशी

फसगत–ना. ह. आपटे

साखरपुडा–प्र. के. अत्रे

मीनाक्षीचें जीवन–कृष्णाबाई मोटे

चलती नाणी–र. गो. सरदेसाई

सौंदर्यशोध आणि आनंदबोध–
रा. श्री. जोग

## आमचीं प्रकाशनें

## पुढील प्रकाशनें

### वि. स. खांडेकर

| | |
|---|---|
| अश्रु | छाया भाग १-२ |
| बुद्ध आणि हिटलर | वालुका |
| चल ये राणी | कालचीं स्वप्नें |
| विसावें शतक | चारभिंती |
| तिसरी भूक | मंजिऱ्या |
| वर्षाकाल | |

### ग. त्र्यं. माडखोलकर

तीन दिवस

व्यक्तिरेखा

ऋणभार

माझे आवडते कवी

चक्रवर्ती उदयन

उर्वशी

### चिं. वि. जोशी

गुंड्या भाऊ

### अनंत काणेकर

उघड्या खिडक्या

काळे आणि पांढरे

धुक्यांतून लाल ताऱ्याकडे

### ना. धों. ताम्हनकर

चकमकी | निवाडे भा. २ रा

### कृष्णाबाई मोटे

मवाली | कलाक्षेत्रांत

---

हितपत्रें–ना. म. पटवर्धन

आपुलकीची झळ–द. र. कवठेकर

बेबीची बहीण–वि. वि. बोकील

स्मरण यात्रा–काकासाहेब कालेलकर

# प्रस्तावना

अनुभवानें मनुष्य शहाणा होतो, म्हणतात. पण म्हणून कांहीं कोणी ठेंच लागल्यामुळें चालणें सोडीत नाहीं. तसाच थोडासा प्रकार 'चन्दनवाडी'ला प्रस्तावना लिहिण्याच्या बाबतीत घडत आहे. ' नवे संसार ' ही कादंबरी जप्त झाल्यावर आमचे मित्र, मध्यप्रांत सरकारचे प्रकाशनाधिकारी, श्री. मोहनराव शहाणे हे मला म्हणाले, " शांताबाई, 'नवे संसार'च्या प्रस्तावनेंत कादंबरींतलीं जीं वाक्यं तुम्हीं उद्‌धृत केलींत, त्यामुळं सरकारचं लक्ष त्या कादंबरीकडे गेलं. " मला स्वतःला त्यांचें हें म्हणणें कांहीं पटलें नाहीं. शिवाय त्यानंतर आम्हांला असें कळलें कीं, श्री. जयप्रकाश नारायण यांचीं पत्रें प्रसिद्ध झाल्यावर त्यांतील विचारसरणीशीं ' नवे संसार ' मधील विचारांचें सादृश्य आढळून आल्यामुळें सरकारची वक्रदृष्टि त्या कादंबरीकडे वळली. खरा प्रकार काय असेल तो असो. पण तो सारा पूर्वेतिहास मनांत येऊन या कादंबरीला प्रस्तावना लिहायला मी आज भीतभीतच लेखणी हातीं घेत आहे.

' नवे संसार ' प्रमाणें ' चंदनवाडी ' शींहि माझा संबंध जिव्हाळ्याचा आहे. ' अश्विनीचें औक्षण ' या गोष्टीच्या रूपानें १९२९ सालीं माडखोलकरांच्या कथालेखनाला प्रारंभ झाला. त्या वेळीं मीं त्यांना जीं कांहीं कथानकें सुचविलीं होतीं, त्यांत मालगुजारांच्या अमानुष जुलमाविषयींचा माझ्या पाहण्यांतला एक प्रसंग सांगितला होता. पण त्या कथानकाचा उपयोग त्यांनीं तेव्हां करून घेतला नाहीं. म्हणून मीं स्वतःच तो प्रसंग पुढें कथारूपानें लिहून काढला; व माझी ही पहिली वहिली एकुलती एक छोटेखानी गोष्ट ' मनोरमा ' मासिकाच्या १९३१ जूनच्या अंकांत ' सोन्याची साखळी ' या नांवानें प्रसिद्ध झाली. त्या गोष्टींतील मालगुजाराच्या आततायीपणाला बळी पडलेल्या आपल्या तरुण मुलाच्या शोकानें वेडी झालेली

म्हातारी असे उद्गार तळतळून काढते कीं, " या राक्षसाच्या रिठावर दिवा लावायला सुद्धा मनुष्य जिवंत राहणार नाहीं...या मेल्याचा सत्यानाश झालेला पाहून मी मरेन. " 'चन्दनवाडी'चें पहिलें प्रकरण वाचतांच हें लक्षांत येईल कीं, त्या कादंबरीचें कथाबीज ' सोन्याच्या साखळीं ' तील या उद्गारांत आहे.

हें कथाबीज माडखोलकरांच्या मनांत दहा वर्षे घोळत होतें. त्याला अंकुर फुटण्याचा योग चार वर्षांपूर्वी अचानक एक दिवस आला. स्वतःचें घर बांधायचें ठरवल्यानंतर आम्ही जागेच्या शोधांत होतों. त्या वेळीं नाग नदीच्या पुलापलीकडे उमरेड रस्त्यावर असलेली एक जुन्या बगीचाची उजाड पण रम्य जागा आमच्या पाहण्यांत आली. त्या जागेचें नांव ' चन्दनबाईची वाडी '. ती जागा कांहीं कायदेशीर अडचणींमुळें आम्हीं घेऊं शकलों नाहीं. पण ' चन्दनबाईची वाडी ' या नांवानें मात्र माडखोलकरांच्या मनाचा वेध घेतला; व श्री. रा. ज. देशमुख यांनीं जेव्हां नवी कादंबरी जाहीर करतांना तिचें नामकरण करण्याविषयीं त्यांच्यामागे निकड लावली, तेव्हां त्यांनीं ' चन्दनवाडी ' हें नांव त्यांना कळवून टाकलें.

माडखोलकरांच्या आजपर्यंतच्या सर्व कादंबऱ्यांपेक्षां ' चन्दनवाडी ' अगदीं वेगळ्या प्रकारची आहे. तिच्यांत शृंगार अजिबात नाहीं; व राजकारण आलें आहे, तेंहि अगदी बेताबातानें. गिरणींत काम करणाऱ्या अडाणी स्त्रीची सुशिक्षित मुलगी, आपल्या जातीच्या उन्नतीसाठीं तळमळणारा हरिजन युवक आणि राष्ट्रीय चळवळीशीं समरस झालेला कॉलेजांतील विद्यार्थी यांच्या जीवनांत जितकें राजकारण येऊं शकेल, तितकेंच या कादंबरीत आलें आहे. निव्वळ चर्चात्मक अशीं तीन चार प्रकरणें तींत आढळतील. पण राजकीय पारतंत्र्याच्या अहोरात्र मनाला लागलेल्या टोचणीमुळें आपल्या समाजांतल्या सगळ्याच विचारी व्यक्तीचें जीवन आज थोडेंबहुत चर्चामय झालेलें नाहीं का ? किंबहुना, आपल्या सुशिक्षित वर्गाला आज सर्वांत मोठें व्यसन जर कोणतें असेल, तर तें ज्या त्या गोष्टीची उठल्यासुटल्या चर्चा करण्याचें. कादंबरीच्या तेराव्या प्रकरणांत चंदननें सुशिक्षितांच्या या व्यसनाचें वर्णन ' बुद्धिविलास ' या शब्दानें केलें आहे. तेव्हां त्या बुद्धिविलासांत कादंबरीचीं थोडींशीं पानें खर्ची पडावींत, यांत काय गैर आहे ? ही चर्चा केव्हां केव्हां मुद्दाम घातल्यासारखी वाटत असली, तरी ' अग्रजन्माचा हक्क ', ' त्रिराष्ट्रवाद ' आणि ' राष्ट्रीय क्रान्तिवाद ' यांच्याविषयीं तीत व्यक्त झालेले विचार उद्बोधक आहेत. विशेषतः, हरिजनांची बाजू अभिमन्यूनें ज्या तडफेनें मांडली आहे, ती तडफ जितकी मनाला हलविणारी तितकीच बुद्धिग्राह्यहि पण आहे.

मधून मधून आलेली ही प्रासंगिक चर्चा सोडली, तर ‘ चन्दनवाडी ’ चें आपल्या वडील भावंडांशीं इतर कोणत्याच बाबतींत साम्य नाहीं. तिच्यांतील व्यक्ति वरिष्ठ दर्जाच्या नाहींत; वातावरण उंची किंवा विलासी नाहीं; व भाषाशैली किंवा वर्णनेंहि भरघोस नाहींत. सामान्यतः ज्यांना मागासलेल्या जाती म्हणण्यांत येतें, अशाच जातींतलीं बहुतेक प्रमुख पात्रें आहेत. मात्र या जातीतहि नव्या शिक्षणाच्या संस्कारामुळें जो त्यांतल्या त्यांत पांढरपेशा असा वर्ग सध्यां निर्माण होत आहे, त्या वर्गांतलीं हीं पात्रें आणि त्यांचा घरसंसार आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. त्या दृष्टीनें चन्दन, हिरा आणि अभिमन्यु हीं तिन्ही पात्रें त्या त्या जातींतील नव्या पिढीचीं प्रातिनिधिक म्हणतां येतील. अशा रीतीनें कादंबरींतील मुख्य पात्रें मागासलेल्या जातीतील असल्यामुळें भाषा, संवाद आणि वर्णनें या साऱ्यांनाच एक प्रकारचा गोड घरगुतीपणा आला आहे. फक्त अवधूत आणि अभिमन्यु हे दोघे जेव्हां वाद घालूं लागतात, तेव्हां मात्र माडखोलकरांच्या पूर्वीच्या कादंबरींतील एखादें चर्चेचें प्रकरण ‘ चन्दनवाडींत ’ गफलतीनें घुसलें आहे कीं काय, अशी शंका येते. कारण अवधूत हा त्यांच्या पूर्वीच्या कादंबऱ्यांतल्या उंची जगांतला आहे; व तो जेव्हां जेव्हां ‘ चन्दनवाडीं ’ त येतो, तेव्हां तेव्हां त्या उंची जगाची झुळूक आपल्या अंगावरून जाते. पण अवधूत हा जरी कादंबरीचा नायक असला, तरी ‘चन्दनवाडीं’ तील गरिबीच्या संसारांतला गोडवा बिघडून जाण्याइतकें महत्त्व त्याला सुदैवानें मिळालेलें नाहीं.

कारण ही कादंबरी स्त्रीप्रधान आहे. मी ‘ नायिकाप्रधान ’ मुद्दामच म्हणत नाहीं. कादंबरीची नायिका चन्दन हिचें व्यक्तित्व अव्याजमनोहर आहे, यांत शंका नाहीं; व तिच्या मरणाचा प्रसंग वाचून भरल्या डोळ्यांनीं वाचक कादंबरी खालीं ठेवील, हें खरें. पण कादंबरी वाचतांना त्या निष्पाप मुलीच्या व्यक्तित्वाचें माधुर्य जसें आपल्याला मुग्ध करून सोडतें, तसेंच तिच्यावर आपापल्या परीनें नितांत प्रेम करणाऱ्या येसू, रखमा आणि सिस्टर यांच्या व्यक्तित्वानेंहि आपण मोहून जात नाहीं का? देवाला वाहिलेल्या चमेलीच्या पांढऱ्या शुभ्र फुलांच्या नाजुक माळेचा सुवास देव्हाऱ्यांत दरवळलेला असला, तरी चन्दन, उदबत्ती आणि धूप यांचाहि परिमळ त्याच वेळीं आपल्याला जाणवत असतो. तसाच प्रकार चन्दन आणि तिचें व्यक्तित्व घडविण्यासाठीं निष्ठेनें झटणाऱ्या तिच्या भोंवतालच्या या तीन प्रेमळ स्त्रिया यांच्या बाबतींत झाला आहे. चन्दनच्या आकांक्षांचें कौतुक

करणारी गुलाब मध्येंच एकदा विजेसारखी चमकून जाते. पण तिच्या त्या ओझरत्या व्यक्तिदर्शनांतली तळप कांहीं और आहे. हिरा या सगळयांच्या मानानें गौण वाटण्यासारखी असली, तरी तिच्यामुळें चन्दनच्या व्यक्तित्वांतल्या कांहीं कोमल रेखा सुस्पष्ट झाल्या आहेत, हें विसरून चालणार नाहीं. अवधूत हा नायक आणि चन्दनचा प्रियकर असला, तरी त्याच्या साहचर्याचा फारसा परिणाम कॅथॉलिक मिशनच्या धार्मिक संस्कारांत वाढलेल्या त्या देहाती कुमारिकेवर होऊं शकला नाहीं, हें राजकारणाविषयींच्या तिच्या क्षणिक उत्साहावरून उघड दिसतें.

चन्दनच्या वृत्तींतील माधुर्य आणि ऋजुता यांच्यामुळें या कादंबरींत एक प्रकारचा अवीट गोडवा उत्पन्न झाला आहे. आपल्या आजीच्या आणि आईच्या सुखांत स्वतःचें सुखसर्वस्व मानणारी, नव्हे–तें आपलें कर्तव्य आहे असे समजणारी ही अश्राप मुलगी ज्या धैर्यानें अखेर मृत्यूला कवटाळते तें धैर्य खरोखरीच निरुपम आहे. पुष्कळांना ती दुबळी वाटेल हें मी जाणून आहे. पण, केव्हां आजीच्या आसऱ्यानें, तर केव्हां मावशीच्या मदतीनें आपल्या मानी आईच्या हट्टी स्वभावाला तोंड देऊन तिनें शिक्षण आणि लग्न या दोन्ही बाबतींत आपला निश्चय जवळ जवळ तडीला नेला. आईविषयीं तिच्या मनांत अढी होती ही गोष्ट खरीच. पण आईच्या अविचारामुळें आपल्यावर मरणाचा प्रसंग आला हें आपल्या आजीला, सिस्टरला आणि डॉक्टरला कळूं नये म्हणून तिनें घेतलेली दक्षता आणि मुकाट्यानें सोसलेल्या यातना खात्रीनें दुबळेपणाच्या निदर्शक नाहींत. आपल्या आई इतकीच तीहि मानी होती. पण आईच्या मानीपणाबरोबरच आजीचा प्रेमळपणाहि तिच्यांत ओतप्रोत भरलेला होता. तिचे आणि येसूचे बहुतेक सारे संवाद डोळ्यांना पाणी आणतात. गुलाबचें निःस्पृह तडफदार जीवन तिला आवडतें, आकर्षक वाटतें. पण तें आचरणांत आणण्याइतका खंबीरपणा त्या कोमल बालिकेच्या ठिकाणीं कोठून असणार? 'महालक्ष्म्यांचा दिवस' या हृदयंगम प्रकरणांत तिनें आपल्या आई–आजीला असा एक अगदीं लहानसा प्रश्न विचारला आहे कीं, "माय ग, मी तुझी मुलगी आहे, मोठ्या मायची नात आहे आणि माझी स्वतःची मात्र मी कोणीच नाहीं का ग?" या तिच्या भेदक प्रश्नांत तिच्या मनाचें प्रतिबिंब पडलेलें असून तिच्या जीवनाचें सार आणि मृत्यूचें मर्म सांठविलेलें आहे. तारकेचें मधुर तेज आणि फुलाची सुवासिक शुचिता यांचा मिलाफ तिच्या मनोज्ञ व्यक्तित्वांत झाला असून, तिची करुणसुंदर मूर्ति आपल्या आसवांनीं भरलेल्या डोळ्यांपुढून किती तरी वेळ हालत नाहीं.

तिचें जीवन येसू, रखमा आणि सिस्टर या तिघींनीं घडविलें. येसू हा आपल्या समाजांत सर्वत्र आढळणारा स्त्रीत्वाचा हृदयंगम नमुना आहे. आपलें स्वतःचें आयुष्य सर्व बाजूंनीं होरपळून गेलें असलें, तरी सुद्धां पुढल्या पिढीच्या आशेवर जगणारी आणि त्या पिढीचें संगोपन जिवाभावानें करणारी ही ' मोठी माय ' गरीब महाराष्ट्रांतल्या किती तरी घरांतून दृष्टीस पडेल. या भोळ्या भाबड्या आशावादी म्हातारीच्या प्रेमानेंच चन्दनचें आयुष्य रंगलें आहे; व रखमाच्या करारी, कठोर स्वभावाच्या पार्श्वभूमीवर तिचें वत्सल स्वभावचित्र फार खुलून दिसतें. रखमा पुष्कळांना निष्ठुर वाटेल. पण मला मात्र ती तशी वाटत नाहीं. तिच्या भोंवतालची परिस्थिति आणि आपल्या समाजाच्या नैतिक समजुती लक्षांत घेतां आई या नात्यानें तिनें आपलें कर्तव्य चोख बजावलें असेंच म्हणावें लागेल; व चन्दनलाहि या गोष्टीची पूर्ण जाणीव होती. चन्दनच्या नाशाला रखमा कारण झाली नाहीं किंवा दादासाहेबहि कारण झाले नाहींत. आपल्या समाजांत सध्या चालू असलेल्या संक्रमणानें तिचा बळी घेतला. कास्तकाराला मालगुजारानें देशोधडीला लावावें आणि मालगुजाराला भांडवलदारानें मातीला मिळवावें, ही जी आर्थिक घडामोड आज मध्यप्रांत–वऱ्हाडांत सर्रास चालू आहे, तिचें मर्म येसू, रखमा आणि दादासाहेब या तिघांनाहि कळलें नाहीं, कळणें शक्यहि नव्हतें. त्यांचा एकमेकां-विषयींचा दंश, रूढ नैतिक कल्पना व त्यांच्या भरीला आणखी जातिभेद यांमुळें अखेर चन्दनचा नाश झाला. कादंबरींतील कोणतेंहि पात्र निखालस दुष्ट किंवा नीच नसतां तिचें पर्यवसान चन्दनसारख्या गुणी मुलीच्या नाशांत व्हावें, ही घटना अत्यंत बोधप्रद आहे.

येसू आणि रखमा यांच्यापेक्षांहि ' चन्दनवाडी 'तील सिस्टरचें व्यक्तित्व अधिक प्रेमळ, अधिक प्रभावी, अधिक उदात्त आहे. त्या सास्वा-सुनांचें चन्दनवरील प्रेम एका परीनें नाहीं म्हटलें तरी आशायुक्त होतें. पण सिस्टर ख्रिश्चियाना हिच्या चंदनवरील प्रेमाला असें कोणतें कारण सांगतां येईल? अशी कोणती आशा चिकटवितां येईल? धर्मांतराच्या प्रयत्नाचाहि आळ तिच्यावर घेतां येऊं नये इतकें त्या माउलीचें वर्तन प्रांजळपणाचें आहे. ' माय मरो आणि मावशी उरो ' ही म्हण तिनें सगळ्या बाजूनीं खरी करून दाखवली; व चन्दननें मरतांना आपल्या भ्रम झालेल्या आजीला तिच्या हातीं निरवून हसतमुखानें प्राण सोडला, ही गोष्ट तिच्या आजीवरील नितांत प्रेमाइतकीच मावशीवरील नितांत विश्वासाचीहि निदर्शक आहे.

सिस्टरच्या निमित्तानें या कादंबरींत ख्रिस्ती मिशनें आणि त्यांची कार्यपद्धति यांचें जें मार्मिक वर्णन आलें आहे, त्याकडे आपल्या समाजाचें लक्ष वेधणें मला अवश्य वाटतें. हिंदुस्थानांतील लोकशिक्षण हें आजहि बऱ्याच प्रमाणांत मिशनरींच्या हातीं आहे, व त्याचे बरेवाईट संस्कार सुशिक्षितांवर गेलीं दीडशें वर्षें सारखे घडत आहेत. पण मिशनरींचें कार्य शिक्षणापुरतेंच मर्यादित नाहीं. आपल्या जीवनाच्या सगळ्या बाजू त्यांच्या धर्मप्रसाराच्या उद्योगानें या ना त्या रीतीनें व्यापून टाकल्या आहेत. कादंबरीच्या सातव्या प्रकरणांत अभिमन्यु अवधूतला असें म्हणतो कीं—

> "मला केव्हा केव्हा असं वाटतं कीं, या ख्रिस्ती मिशनरींच्या सूक्ष्म, सौम्य, सर्वव्यापी धर्मप्रसारापेक्षां मुसलमानांचा आडदांड धर्मप्रचार पुरवला. त्यांच्या बाबतींत मनुष्य सावध राहतो नेहमीं. पण शाळा, कॉलेजें, रुग्णालयें, अनाथाश्रम, कंगालखाने वगैरे नानाविध संस्थांतून हे ख्रिस्ती मिशनरी ज्या सात्त्विक पद्धतीनें आपल्या धर्माचा प्रसार अप्रत्यक्ष रीतीनें सारखा करीत आहेत त्याची जाणीव आपल्याला तीव्र-तेनें होत नाहीं; व म्हणून त्याला प्रतिकार करण्याची कल्पनाहि आपल्या मनांत येत नाहीं. त्यांचा आश्रय, त्यांचीं औषधं, त्यांच्या शिष्यवृत्त्या, त्यांचीं पुस्तकं, त्यांचं सौजन्य या सगळ्यांतून त्यांचा धर्म भरलेला असतो; न् तो सारखा कळत न कळत आपल्यावर आक्रमण करतो."

हे अभिमन्यूचे उद्गार प्रत्येकानें लक्षांत घेण्यासारखे आहेत. ख्रिस्ती धर्म हा दयाशील, सेवातत्पर आणि अनाथ–अपंगांचा कनवाळू आहे, याबद्दल वाद नाहीं. पण ही दया आणि सेवा निरपेक्ष नाहीं; व म्हणून ही खरी धर्मबुद्धिहि नव्हे असें मला तरी वाटतें. अन्न, शिक्षण आणि औषध या जीवनाला अत्यंत आवश्यक असलेल्या तीन वस्तूंच्या मोहानें माणसांना आपल्या धर्मांत ओढायचें, यांत दयेचें, सेवेचें किंवा धर्माचें निरपेक्ष तत्त्व आणि आचरण कुठें आहे ?

अर्थात्, ख्रिस्ती मिशनरींच्या या सर्वग्रासी कार्यानें आपल्या समाजाचें जीवन इतकें व्यापून टाकावें हा त्यांचा दोष नाहीं; सर्वस्वी आपला दोष आहे; आपलींच 'गत शतकांचीं घोर पापें' त्याबद्दल जबाबदार आहेत. सातव्या प्रकरणांत हिंदु समाजांतील कनिष्ठ जातींच्या स्थितीविषयीं अभिमन्यूनें जे उद्गार काढले आहेत, त्यांत हिंदु समाजाच्या सध्यांच्या दुर्दशेचें मर्म प्रतिबिंबित झालेलें आहे. तो म्हणतो—

"हिंदु समाज म्हणून तुम्ही ज्याला म्हणतां तो इतका अवाढव्य, अस्ताव्यस्त आणि परस्परविलग आहे कीं, त्याच्या एका टोंकाला काय चाललें आहे याचा पत्ता दुसऱ्या टोंकाला नसतो. मुसलमान आणि ख्रिस्ती या दोन्ही धर्मांचें आक्रमण आमच्या अस्पृश्य जातींवर किती प्रकारांनीं आणि केवढ्या प्रमाणांत सतत चालू आहे याची कल्पनासुद्धां नाहीं तुम्हां उच्च जातींतल्या लोकांना......अजगरानें गिळलेला पण पचनीं न पडलेला प्राणी जसा त्याच्या पोटांत अर्धमेला लोळागोळा होऊन राहतो, तसे आज या अवाढव्य हिंदु समाजाच्या पोटांत मृतप्राय स्थितींत आम्ही सडत पडलों आहोंत."

ही स्थिति जोंपर्यंत बदलत नाहीं, हिंदु धर्मातील 'कालपक्व' गोष्टी टाकून द्यायला जोंपर्यंत आपण तयार होत नाहीं, तोंपर्यंत आपल्या समाजाचें डोकें वर निघणें अशक्य आहे. ख्रिस्ती मिशनरींच्या कार्यपद्धतीचें सूक्ष्म वर्णन जसें 'चन्दनवाडी'त आलें आहे, तसाच महार आणि मुसलमान यांच्या गांवोगांव आढळणाऱ्या शेजाराचाहि ओझरता पण ठसठशीत निर्देश तींत आला आहे. त्याचेंहि मर्म वाचकांच्या लक्षांत येईल, अशी मला खात्री वाटते.

या कादंबरीचें सामर्थ्य तिच्यांतील ओजस्वी विचारांत नाहीं, तर हळुवार व्यक्तिदर्शनांत आहे. वत्सल आणि करुण हे दोनच रस तिच्यांत मुख्य आहेत; व सुंदर संगमरवरी पुतळ्याभोंवतीं जशा कारंजाच्या धारा उडत असाव्यात, तसे चंदनच्या निरागस व्यक्तित्वाभोंवतीं त्या रसांचे उद्रेक खेळविलेले असल्यामुळें तिच्यांतील अगदीं लहानसहान प्रसंगहि मनाला चटका लावतात. कादंबरींतील सर्वच पात्रें रेखीव आणि जिवंत वाटतात. दादासाहेब, दिवाणजी, अंजिरा, सिस्टर झेवियरा, सिराज आणि दशरथ यांच्यासारख्या अधूनमधून केव्हां तरी थोडा वेळ येऊन जाणाऱ्या दुय्यम पात्रांचें व्यक्तिदर्शनहि चित्तवेधक आहे.

माडखोलकरांची ही दहावी सामाजिक कादंबरी. त्यांच्या कादंबऱ्यांतून उद्भवलेले प्रश्न आणि वाद लोकांच्या आठवणींत आज अगदीं ताजेच आहेत. वीस वर्षांपूर्वी कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यावरील त्यांचा तिसरा लेखांक 'विविध-ज्ञानविस्तारां'त प्रसिद्ध झाल्यावर कै. अच्युतराव कोल्हटकर यांनीं आपल्या 'संदेश' पत्रांत त्या लेखमालेचा परामर्श घेतांना 'मराठी वाङ्मयांतील नवी शक्ति' या शब्दांनीं त्यांचें वर्णन केलें होतें. त्यांच्या कादंबऱ्यांतून उत्पन्न झालेले वाद त्या वर्णनाची यथार्थता दर्शवितात, असे उद्गार नुकतेच त्यांच्या मुंबईच्या एका विद्वान

मित्रानें काढले आहेत. पण, मला मात्र त्यांची ही कादंबरी वाचून, कै. अच्युतरावजींनीं केलेल्या या वर्णनापेक्षां त्यांच्या गुरूंनीं १९२४ च्या जुलैमध्यें ते नागपुरास यावयाला निघाले असतां त्यांना पाठविलेल्या पत्रांतील उद्‌गारांची समर्पकता जास्त जाणवली. कै. तात्यासाहेब कोल्हटकर यांनीं त्या पत्रांत असें लिहिलें होतें कीं,—

"नागपूर-वऱ्हाड प्रान्त हा राजकीय भेदामुळें महाराष्ट्रापासून विलग झाला असून, त्यामुळें महाराष्ट्राच्या पुण्यामुंबईकडील भागांतील लोकांस नागपूर-वऱ्हाडच्या मराठी जनतेबद्दल आस्था वाटत नाहीं; व इकडल्या लोकांना त्या भागांतील लोकांबद्दल आपलेपणा वाटत नाहीं. रा. ओगले यांच्या 'महाराष्ट्र' पत्रानें हा परस्पर दुजाभाव बराच कमी केला आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. आपण नागपुरास गेल्यावर त्यांचें हें काम अधिक दक्षतेनें पुढें चालवाल, नागपूर-वऱ्हाडांतील साहित्यविषयक प्रयत्नांना पाठिंबा द्याल आणि नागपूर-वऱ्हाडच्या वैशिष्ट्याचा परिचय आपल्या लेखणीनें पुण्यामुंबईकडील महाराष्ट्राला करून देऊन महाराष्ट्राच्या या दोन्ही भागांत सौहार्द उत्पन्न कराल, अशी मला आशा आहे."

आपण अगदीं सहजगत्या व्यक्त केलेली ही आशा पूर्ण करण्याचा प्रयत्न आपल्या शिष्याकडून निष्ठेनें केला जाईल, अशी तात्यासाहेबांची कल्पना कदाचित् नसेलहि. पण, महाराष्ट्राच्या या भागांत आल्यापासून गेल्या अठरा वर्षांत माडखोलकरांनीं आपल्या लेखनशक्तीचा उपयोग मुख्यतः महाराष्ट्र आणि महाविदर्भ यांच्यांत सौहार्द उत्पन्न करण्यासाठींच केला आहे. महाविदर्भांतील सृष्टिसौंदर्याचें आणि समाजजीवनाचें जितकें सहृदय वर्णन त्यांच्या कथावाङ्मयांत आलें आहे, तितकें तें दुसऱ्या कोणत्याहि लेखकाच्या वाङ्मयांत आलेलें आढळणार नाहीं.

वर्धेच्या कांठीं 'चंदनवाडी' या नांवाचें गांव खरोखरीच आहे कीं नाहीं, हें मला माहीत नाहीं किंवा कार्तिकीला वर्धेच्या कांठीं होणारा दीपोत्सवहि मीं पाहिलेला नाहीं. पण, माडखोलकरांनीं निर्माण केलेली ही 'चंदनवाडी' वाचून जर सौंदर्य आणि समृद्धि यांच्याबद्दल पुराण काळापासून प्रसिद्ध असलेले वर्धेचे रम्य परिसर पाहण्याची इच्छा एखाद्या वाचकाला झाली, तर मला नवल वाटणार नाहीं.

कार्तिक एकादशी १९४२ }
शांतानिवास, नागपूर शहर } शांता माडखोलकर

## तळतळाट

१

"दादासाहेब, गरिबाचं घर बुडवूं नका व ?"

देशपांड्यांच्या वाड्याच्या दिशेनें धांवत सुटलेल्या येसूच्या त्या आक्रोशानें सारी चंदनवाडी हलून गेली.

कावळ्यानें घरट्यांत घुसून पिलूं चोचींत धरून न्यावें आणि मग चिमणी चिव चिव करीत त्या कावळ्यामागून धांवत असतां इतर चिमण्या जशा तिला साथ देत तिच्याभोंवतीं उडतात, त्याप्रमाणें येसू रस्त्यानें धांवत जात असतां दोहों बाजूंचीं बायकामाणसें तिला सहानुभूतीनें कांहीं बाहीं विचारीत होतीं.

विशेषतः कुंभारवाड्यांतून बाहेर पडून गांधी चौकांतील आठवडी बाजारांत जेव्हां ती आली, तेव्हां आपल्या पुढल्या भाजीच्या जुड्या बाजारांतून ज्या त्या मालांत धट्टपणानें तोंड घालीत फिरणारीं गुरें ओढून नेतील याची पर्वा न करितां भाजी विकणाऱ्या बाया झट्दिशीं उठून पुढें आल्या आणि तिला कळवळून विचारूं लागल्या—

"काय झालं वो माय ? अशी रडत कोठं चालली रस्त्यानं ?— "

पण, अर्धवट जिज्ञासेनें आणि अर्धवट अनुकंपेनें विचारलेल्या त्या प्रश्नांना उत्तर देण्याइतकें भान किंवा उसंत येसूला होती कुठें ?

"काय सांगूं व माय ? दादासायबानं गळा कापला माझा— "

असें कांहींतरी मोघम उत्तर देत आणि पदराच्या शेवानें डोळे पुशीत ती न थांबतां धापा टाकीत धांवत होती.

पण, तिनें उत्तर न दिलें, तरी बाजारांत पालें लावून बसलेले माहितगार दुकानदार मात्र तिच्या मागून कणवेनें चार पावलें जाऊन परतणाऱ्या त्या बायकांकडे पाहून आपसांत गमतीनें तिच्याविषयीं बोलत होते.

" अरे, ही येसू नव्ह का त्या किसन देशमुखाची माय? तो तर गिरणीच्या पट्टयांत सांपडून खतम झाला पांच सहा वर्षांपूर्वी. तेव्हांपासून ही म्हातारी न् तिची सून कुंभारवाड्यालगतच्या त्या पडक्या घरांत रहातात; न् शेतमजुरी करून पोट भरतात कसं बसं. गेल्या दोन तीन सालांत वायदा भरला नाहीं हिनं म्हणून बेदखलीची कारवाई करून जप्ती आणली असेल दादासायबांनीं हिच्या घरावर. तेव्हां आतां निघाली ही म्हातारी रडत ओरडत सगळा गांव गोळा करीत त्यांच्या वाड्याकडे—"

त्यांपैकीं एक धान्याचा दुकानदार ज्वारीच्या राशींत तोंड घालण्याच्या बेतांत असलेल्या सांडाला हातांतल्या काठीनें रट्टा देत म्हणाला.

" अरे, हा मोर्चाच समज तिचा मालगुजाराच्या वाड्यावर !—"

त्याच्या समोर कापडाचें दुकान लावून बसलेल्या इसमानें, तोंडांतली तंबाकूची पिंक दोन बोटांतून रस्त्यांत अचूक उडवून, हंसत हंसत म्हटलें.

" बाकी मोर्चा न्यायला लायक आहे येसू अगदीं! घरांत गाडग्यामडक्यांशिवाय कांहीं राह्यलेलं नाहीं आतां. पण तिच्या नवऱ्यानं दादासायबांच्या बापाला विकलेली ही चंदनवाडी त्यांच्यापासून परत मिळवायचं वेड कांहीं निघत नाहीं अद्याप तिच्या डोक्यांतून. पाह्यला गेलं, तर या दोन रंडक्या सास्वासुना न् सात आठ वर्सांची एक नात आहे घरांत हिची. मग कशाच्या जोरावर चंदनवाडी पुन्हा परत मिळवणार आहे ही बक्राबाई कोण जाणें! मोठी जिद्दी न् बडबडी आहे बया—"

" बडबडी कसली आली आहे ? अरे, डोक्यांत फरक पडलाय तिच्या. एकुलता एक मुलगा गिरणीच्या पट्टयांत सांपडून मेल्यामुळं हिच्या बुड्ढयानं हाय खाल्ली न् तोहि मरून गेला लेकाच्या मागोमाग. तेव्हां पासून फरक पडलाय म्हातारीच्या डोक्यांत. मी पाहतों ना केव्हांहि बाजारांत भेटली म्हणजे चंदनवाडीच्या गोष्टी—"

" तसं तिनं बोलावं, हें साहजिक आहे अगदीं. तिचा नवरा नंदू हाच खरोखरी मालक मूळचा या चंदनवाडीचा. पण, नापिकी न् कर्जे यांच्यापायीं ही चंदनवाडी विकावी लागली त्याला देशपांड्यांना. तीस वर्षांपूर्वी या वाडीची मालकीण होती ती. कां नये वाटूं तिला आपली वाडी आपल्याला परत मिळावी असं ?—"

त्यांचा तो संवाद ऐकून पलिकडल्या बाजूला बसलेल्या एका भाजीवालीनें मध्येंच विचारलें—

" पण या म्हातारीचीं गाडगीं मडकीं घेऊन काय मिळायचंय् दादा, मालगुजा-

राला ? त्याच्या येथं पानविड्यावर जेवढा खर्च होत असेल वर्साला तेवढी सुद्धां बाकी नाहीं निघायची म्हातारीकड. कां गरिबाला गांजावं असं उगाच ?—"

" उगाच कोण कुणाला गांजील बाई ? मालगुजारानं जर असं प्रत्येक कुळाला सोडून द्यायचं ठरवलं, तर तो स्वतःच भिकेला लागेल उद्यां. व्यवहारांत दया माया अगदीं कामाची नाहीं. ही आंधळी मघापासून ओरडून राह्यली आहे तुझ्या जवळच्या कांद्यांसाठीं. पण तूं एक तरी कांदा टाकलास का तिच्या पदरांत ? जगांत कोणी कोणाला उपदेश करूं नये न् नांवंहि ठेवूं नयेत—"

इतकें बोलून आपण कांहीं तरी नवीन तत्त्व सांगितलें अशा दिमाखानें त्यानें आपल्या कनवटीच्या डबींतून तपकिरीची भली थोरली चिमूट घेतली आणि ती आपल्या फेंदारलेल्या नाकाच्या दोन्ही पुड्यांत ठांसली.

" बरोबर बोललास, भाऊ ! पण, दादासायबांनीं ही जी जप्ती आणली आहे म्हातारीच्या घरावर न् वावरावर ती मात्र कांहीं केवळ थकलेली बाकी वसूल करण्यासाठीं नव्हे हो ! त्यांचा डोळा तिच्या तरण्याताठ्या सुनेवर आहे. तिची सून ती रखमा काळी सांवळीच पण अशी रेखीव आहे बघ !—"

त्यानें बोलतां बोलतां आपल्या नाकपुडीवर डाव्या हाताच्या तर्जनीनें हंसत हंसत खूण केली.

आठवडी बाजारांत ही चर्चा चालू असतांनाच येसू देशपांड्यांच्या वाड्यापर्यंत जाऊन पोंचली. तिच्या पाठोपाठ नाहीं म्हटलें तरी दहाबारा माणसें तेथपर्यंत आलीं होतीं. पण, वाड्याच्या त्या मोठ्या थोरल्या दिंडीदरवाजापाशीं येतांच बाकीचीं माणसें तेथेंच थांबलीं; व एकटी येसू मात्र दिंडींतून तडक आंत गेली.

दादासाहेब देशपांडे यांचा तो चारचौकी वाडा हें चंदनवाडीचें एक भूषण होतें. येसूचा नवरा नंदू याच्याकडून वर्धा नदीच्या काठचा तो छोटेखानी, सुपीक, स्वच्छ गांव विकत घेतल्यावर दादासाहेबांच्या वडलांनीं गांवांतल्या उंच मैदानावर हा भव्य वाडा बांधला; व वर्धा जिल्ह्यांतील आपल्या सर्व व्यवहारांचें केंद्र फुलगांवापासून चार मैलांच्या अंतरावर असलेल्या या चंदनवाडींत आणलें. स्वदेशी चळवळीच्या हंगामांत स्थापन केलेली वर्धा मिल, सर्व जिल्हाभर पसरलेली सावकारी आणि वर्धेच्या कांठाकांठानें असलेलीं मालगुजारी गांवें यांचा कारभार ते चंदनवाडीला राहून पहात असत. शहरांत राहिल्यानें, नाहीं म्हटलें तरी, कुळें, कामगार आणि सार्वजनिक चळवळी यांचा उपद्रव सारखा होत असे. पण, शहरापासून फार दूर

नसलेल्या चंदनवाडीला रहावयाला आल्यावर त्यांना सर्व प्रकारचें स्वास्थ्य मिळालें. दौऱ्यावर किंवा शिकारीला निघालेला सरकारी अधिकारी काय क्वचित् येऊन त्रास देईल, तेवढाच. पण त्याचा त्रास हा पुढें मागें लाभदायक होण्याची खात्री असल्यामुळें ते तो आनंदानें सहन करीत असत. किंबहुना, दवाखाना, प्राथमिक शाळा, सहकारी पतपेढी, ग्रामपंचायत वगैरे संस्था काढून, चंदनवाडी हें आपण कसें ‘ आदर्श खेडें ’ बनविलें आहे हें सरकारच्या निदर्शनाला यावें, अशी दादासाहेबांची इच्छा असल्यामुळें त्यांना बड्या सरकारी अधिकाऱ्यांचें आगमन ही एक इष्टापत्तीच वाटे. त्यामुळें चंदनवाडीचा पाहुणचार घेणें हें बड्या अधिकाऱ्यांच्या दौऱ्यांतील कार्यक्रमाचें एक महत्त्वाचें कलम असे.

येसू दिंडींतून आंत गेली, ती तडक दादासाहेबांच्या दिवाणजींपुढें जाऊन उभी राहिली.

वाड्याच्या या पहिल्या चौकांतील सदरेंत सावकारी, मालगुजारी, वर्धा मिल आणि ठिकठिकाणचे जिन या सगळ्या खात्यांच्या कचेऱ्या थाटलेल्या होत्या. दिंडींतून आंत शिरल्याबरोबर भिंतीला टांगलेलीं देशपांड्यांच्या घराण्यांतील पिढीजात हत्यारें दृष्टीस पडत असत. त्या जुन्या हत्यारांना जरी आतां गंज चढला होता, तरी देशपांड्यांचा मालगुजारी दरारा जागृत ठेवावयाला त्यांचें प्रदर्शन उपयोगी पडत असे. शिवाजी, रघोजी, रामदास, टिळक, गांधीप्रभृति कांहीं राष्ट्रपुरुषांच्या तसबिरा आणि देशपांडे घराण्यांतील प्रमुख पुरुषांचीं तैलचित्रें भिंतीवर लटकत होतीं; व या ऐतिहासिक पार्श्वभूमीला शोभेल अशा बिछायतीच्या बैठकीवर सर्व खात्यांचा प्रपंच देशी पद्धतीनें चालला होता.

येसू जरी दिवाणजींच्या समोर जाऊन उभी राहिली, तरी त्यांचें लक्ष कांहीं तिच्याकडे गेलें नाहीं. ते एका पांढऱ्या शुभ्र लोडाला ओठंगून अगदीं हलक्या आवाजांत आपल्यापुढें बसलेल्या दोघा कुळांशीं बोलत होते. दोन भुवयांच्या मध्यें लावलेला शेंदूर, कपाळावरील उभें रव्याचें गंध, मानेवर लोंबणारी शेंडीची गांठ, हजामतीच्या इष्ट दिवसाची वाट पाहात वाढलेली दाढी आणि आंकड्यांसाठीं बोटेमोड करतांना झळकणारें माणकाचें पवित्रक या साऱ्या गोष्टी दिवाणजींच्या धार्मिकतेची साक्ष चढाओढीनें देत होत्या.

त्यांचें लक्ष आपल्याकडे वेधण्यासाठीं येसूनें खाकरल्यासारखें केलें. पण नाकाच्या शेंड्यावर ठेवलेल्या चांदीच्या काड्यांच्या चष्म्यांतून पुढें असलेल्या कागदाकडे एकाग्रतेनें पहात असलेली त्यांची तीक्ष्ण नजर कांहीं तिच्याकडे वळली नाहीं.

पण तिनें दोन तीन मिनिटांपेक्षां जास्त वेळ वाट पाहिली नाहीं.

" दिवाणजी—"

ती हांक कानांवर पडतांच ते नाकावरला चष्मा हातांत घेऊन अगदीं थंड मुद्रेनें तिच्याकडे बघत विचारते झाले—

" कशाला आलीस, येसू ?—"

" माहितच नाहीं तुम्हांला जणूं—"

तिनें रागानें म्हटलें.

पण दिवाणजींवर त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं. उलट त्यांनीं आपल्या आवाजांत शक्य तितका गोडवा भरून विचारलें—

" वायदा पटवायला आलीस व्हय ?—"

" का अन्त पहातां गरिबाचा ? जमीला माणसं पाठवलींत घरावर न् इथं आल्यावर वायदा पटवायची गोष्ट काढतां ?—"

येसूचा आवाज प्रत्येक शब्दागणिक चढत होता

पण दिवाणजी अगदीं शांत होते. हातांतल्या अडकित्त्यानें तबकांतली लाल सुपारी कातरून ती त्या कुळांना देत ते तिला म्हणाले—

" मग इथं कशाला आलीस आतां कामाच्या वेळीं ?—"

" तुमचे पाय धरायला. माझीं म्हातारीचीं गाडगीं मडकीं घेऊन काय मिळणार आहे दिवाणजी, तुम्हांला ?—"

" हा प्रश्न मला नको विचारूंस तूं न् माझे पायहि धरूं नकोस. दादासाहेबां-कडे जा—"

आणि ते मुकाट्यानें पुन्हा कुळांशीं बोलावयाला लागले.

पण येसू उभीच होती. तिच्या मनाची पक्की खात्री होती कीं, या ब्राह्मणाच्या हुकमाशिवाय कांहीं आज आपल्या घरावर जप्ती आलेली नाहीं. ती पुन्हा अजीजीनें त्यांना म्हणाली—

" दिवाणजी, आम्ही गरीब माणसांनीं आपले पाय धरायचे नाहींत, तर कुणाकडे जायचं ? आज सकाळच्या प्रहरीं माझीं गाडगीं मडकीं घरांतून बाहेर काढायला माणसं पाठवलींत तुम्हीं—"

" मीं सांगितलं ना तुला एकदां माझ्याशीं बोलून कांहीं उपयोग नाहीं म्हणून इथं कटकट करूं नकोस माझ्या कामाच्या वेळेला—"

दिवाणजींनीं आपल्या सिंदूररंजित भुवया चढवून म्हटलें.

येसू क्षणमात्र स्तब्ध उभी होती.

पण तिथें जाणारा एक एक क्षण तिला पृथ्वीमोलाचा होता. मालगुजाराच्या माणसांनीं सामानाचा कब्जा करून घर ताब्यांत घेण्यापूर्वी तिला तिथें परत जाणें जरूर होतें. म्हणून ती तडक तिथून निघून आंतल्या चौकांत आली.

पहिल्या चौकांतील सार्वजनिक कचेऱ्यांपेक्षां आंतल्या चौकांतील दादासाहेबांच्या या खास कचेरीचा थाट अगदीं निराळा होता. चामड्यानें मढविलेल्या मऊ प्रशस्त खुर्चीवर बसून दादासाहेब सुंदर तावदानी टेबलावर ठेवलेलें सकाळचें टपाल पहात होते. त्यांच्या उजव्या बाजूला असलेल्या कांचेच्या तिपाईवर चांदीचें नक्षीदार पानदान आणि सिगारेटचा डबा ठेवलेला होता; व समोर खुर्च्या आणि कोचें मांडलेलीं होतीं. त्यांच्या शिकारीच्या शोकाचीं जणूं निर्जीव साक्षीदारच अशीं हरिण आणि वाघ यांचीं मस्तकें भिंतीला लावलेलीं होतीं; व इंग्लंडांतील वनश्रींच्या देखाव्यांचीं छापील रंगचित्रें त्यांच्या निसर्गप्रियतेचें प्रदर्शन करित होतीं.

त्यांच्यासमोर उभा असलेला कारकून एक एक पत्र कात्रीनें उघडून त्यांच्या हातीं देत होता.

येसू सदरेच्या खांबापाशीं उभी राहून दादासाहेबांची दृष्टि आपल्याकडे वळण्याची वाट पहात होती.

कारकुनानें तिच्याकडे डोळे फाडून पाहिलें. पण दादासाहेब मात्र मुंबईहून आलेलें एक लांबलचक टंकलिखित पत्र वाचण्यांत निमग्न होते. तें वाचून झाल्यावर आपल्या तोंडांतली अर्धवट जळलेली सिगारेट रक्षापात्रांत टाकून ते कारकुनाला म्हणाले—

" सेन्ट्रल कॉटन कमिटीच्या कागदपत्रांचं फाईल आज दुपारीं आल्याबरोबर काढून ठेव तूं. मी निजून उठल्यावर प्रथम सर होमसजींना पाठवायचं पत्र सांगेन. आजच्या संध्याकाळच्या मेलनं गेलं पाहिजे तें—"

" जी—"

कारकुनानें म्हटलें.

दादासाहेबांनीं आपल्या उजव्या कानशिलावर क्षणमात्र दोन बोटें घासलीं आणि डावा खांदा किंचित् उंचावून डब्यांतून एक सिगारेट घेतली. ती पेटवून ते झुरका घेणार तोंच येसू म्हणाली—

" दादासाहेब— "

" कोण येसू ?— "

त्यांनीं तिच्याकडे बघून विचारलें; व सिगारेट घ्यावयाला सुरवात केली.

" हो जी— "

" कशाला आलीस आज सकाळच्या प्रहरीं ?— "

" आपले पाय धरायला— "

" माझे पाय धरायला न् ते कशासाठीं ?—"

तोंडांतली सिगारेट काढून तिच्याकडे मिस्किल नजरेनें पहात दादासाहेबांनीं विचारलें.

" आज सकाळींच माणसं आलीं आपलीं न् त्यांनीं सामान बाहेर काढायला सुरवात केली घरांतलं. म्हणून आलें आपले पाय धरायला—"

" तुझ्या घरावर जप्ती गेली म्हणतेस ?—"

" हो—"

" असं कसं होईल ? मी दिवाणजींना बोलावून घेतों—"

आणि त्यांनीं टेबलावरली घंटा दाबून पुन्हा सिगारेटचे झुरके घ्यावयाला सुरवात केली.

घंटा खणखणतांच धांवत आलेल्या चपराशाला ते म्हणाले—

" दिवाणजींना सांग मी जरा बोलावतोंय् म्हणून—"

" जी—"

आणि अर्धे मिनिटाच्या आंतच दिवाणजी त्यांच्या समोर येऊन उभे राहिले.

" येसूची काय तक्रार आहे ही ? आपल्या घरावर जप्ती गेली आहे म्हणून सांगून राह्यली आहे ती मला—"

" मलाहि सांगितलं तिनं—"

" हे माझा अर्ज ऐकत ना म्हणून तर मी आपल्याकडे आलें, दादासाहेब—" येसू मध्येंच उद्गारली.

" मग काय भानगड आहे ही ?—"

दादासाहेबांनीं अगदीं तिऱ्हाइताचा आव आणून दिवाणजींकडे पहात विचारलें.

क्षणैक त्या दोघांत नेत्रपल्लवी झाली आणि दिवाणजी अदबीनें म्हणाले—

" भानगड अगदीं साधी आहे. तीन सालांचा वायदा थकलेला आहे हिच्या-

कडे. मी हिला गेलीं दोन वर्षं सांगतोंय तूं रखमाला सालाच्या बोलीनं लावून दे आमच्या शेतावर कामाला म्हणजे वर्ष दोन वर्षांत देणं फिटून जाईल तुझं. पण सून आपलं ऐकत नाहीं असं सांगते ही म्हातारी. लोकांच्या शेतावर कामाला जातात या सास्वासुना रोज. पण आपलं देणं फेडायची कांहीं बुद्धि नाहीं होत यांना आपल्याकडे काम करून. आम्हीं तरी किती दिवस थांबावं? म्हणून माणसं पाठवलीं आज अखेर नाइलाजानं—"

"बरोबर आहे तुमचं म्हणणं—"

दादासाहेब सिगारेटचा धूर नाकातोंडांतून बाहेर काढीत म्हणाले.

दिवाणजींची ती मखलाशी ऐकून येसूच्या अंगाचा अगदीं संताप झाला. पण आपला सारा राग गिळून ती अत्यंत नम्रतेनें म्हणाली—

"मी आपल्या शेतावर कामाला राह्यला तयार आहे दादासाहेब, पांच वर्साच्या बोलीनं. पण माणसांना परत बोलावून घ्या आत्तांच्या आत्तां—"

"तूं बुड्ढी काय काम करणार शेतावर? रखमाच्या पाव हिश्शानं तरी काम होईल का तुझ्याच्यानं? तिला कामावर न यायला काय झालं?—"

दिवाणजी मध्येंच म्हणाले.

येसू स्तब्ध उभी होती. तिचें जर्जर शरीर मात्र लटलटा कांपत होतें.

"खरं सांग, येसू. रखमाचा तरी माझ्या शेतावर काम न करण्याचा एवढा हट्ट का असावा? मी न् तुझा लेक किसन भावासारखे एकत्र खेळलों आहोंत लहानपणीं. मी तिला वडील दिरासारखाच आहे खरोखरी. पण ती गांवांतल्या सगळ्या शेतांवर काम करिते; न् आमच्या शेतावर मात्र काम करायला तयार नाहीं. हा तरी हट्ट काय म्हणून तिचा?—"

येसू कांहीं बोलली नाहीं.

"हें पहा, तिला कामावर यायचं कबूल करूं दे न् आत्तां जप्ती उठवतों मी तुझ्या घरावरली. ती आमच्या शेतावर काम करायचं नाकारते, म्हणून लोक भलभलतं बोलतात माझ्याविषयीं—"

तरीहि येसू कांहीं बोलली नाहीं.

"मग ती तयार आहे का कामावर यायला? बोल. म्हणजे मी आत्तांच्या आत्तां परत बोलावून घेतों माझ्या माणसांना—"

तो त्यांचा उद्गार कानांवर पडतांच इतका वेळ लटलटां कांपत असलेलें येसूचें

शरीर एकदम ताठरलें आणि त्यांच्या नजरेला नजर देऊन ती शांतपणानें म्हणाली—

" नाहीं, ती येणार नाहीं कामाला शेतावर तुमच्या— "

" कां ? कां बरं ?— "

" तुम्हांला माहित आहे कारण— "

" अस्सं ! तूंहि सामील आहेस काय थेरडे, माझ्या बदनामींत ? मग आलीस कशाला माझ्यासारख्या वाईट माणसाचे पाय धरायला ? थांब, पहातों कशा तुम्ही दोघी रहातां या चंदनवाडींत तें. गेलीं तीन चार वर्षें मीं गय केली तुमची. पण देशमुखीचा माज आहे ना ? अजूनहि उतरली नाहीं त्या माजाची धुंदी डोळ्यां-वरून ! थांब, चंदनवाडींत पाऊलभर जागा उभं राह्यला मिळणार नाहीं तुम्हांला असा बंदोबस्त करतों तुमचा आजच्या आज !— "

" करा, करा ! तुम्हांला काय करायचं असेल, तें खुशाल करून घ्या ! पण देवाचे डोळे कांहीं फुटलेले नाहींत. तुम्ही आज आम्हांला देशोधडीला लावाल. पण, लक्षांत ठेवा, तुमच्याहि रिठावर दिवा लावायला शिल्लक राह्यचं नाहीं कुणी— "

येसू हातवारे करून कडकडत उद्गारली.

आणि तिचें तें अनपेक्षित उत्तर ऐकून स्तिमित झालेले दादासाहेब भानावर येण्यापूर्वीच तिनें दरवाजा गांठला.

# येसू २

येसू घरीं आली, तेव्हां चंदनला पुढें घेऊन दारांत बसलेली रखमा तिच्या दृष्टीस पडली.

मालगुजाराच्या माणसांनीं घरांत काय होतें नव्हतें तें सारे सामान बाहेर काढून अंगणांत अस्ताव्यस्त टाकलें होतें; व ते आतां छपरींत बसून पान खात चकाट्या पिटीत होते. येसूला पहातांच त्यांच्यापैकीं एक पुढें येऊन मिस्किलपणानें विचारता झाला—

" काय झालं येसू ? आणला हुकूम दादासाहेबांचा ? हुकुमाचा कागद दाखव कीं निघालों आम्ही परत— "

" नाहीं. तुम्ही येथेंच रहा आतां. आम्हीच जातों येथून— "

तिनें शांतपणानें उत्तर दिलें. मघांशीं बाजारांतून रडत ओरडत जातांना ज्यांनीं तिला पाहिलें होतें, त्यांनीं जर आतां तिचा तो गंभीर आणि निग्रही चेहरा बघितला असता, तर त्यांच्या मनांत आलें असतें, मघांशीं आपण पाहिलेली येसू ती हीच का ?

" सूनबाई, ऊठ बेटा ! आपल्याला राह्यचं नाहीं आतां येथं. तूं म्हणत होतीस इतके दिवस तेंच बरोबर. हा प्रसंग ओढवण्याच्या आधींच ही वाडी सोडून जायला हवं होतं आपण ! पण माझा म्हातारीचा चिवट जीव निघतां निघेना या वाडींतून— "

आणि तिनें एकदम आवंढा गिळला. तिच्या डोळ्यांत आंसवें तरारून आलीं होतीं. पण तीं त्या माणसांच्या दृष्टीस पडूं नयेत, असें तिला वाटलें आणि मोठ्या निग्रहानें तिनें आवंढा गिळला.

" मोठी माय, कोठं चालली तूं घेऊन आम्हांला ?— "

आईच्या पुढून उठलेल्या चंदननें तिच्या कमरेला मिठी मारून विचारलें.

येसूनें तिला उचललें आणि तिच्या टपोऱ्या, निर्भय डोळ्यांत आपली क्षीण, त्रस्त दृष्टि मिसळून ती जणुं स्वतःशींच उद्गारली—

" चंदन ! माझी चंदन ! माझी चंदनवाडी !— "

पण लगेच ती भानावर आली आणि चंदनला खालीं ठेवून तिनें रखमाला म्हटलें—

" चल सूनबाई ! रस्त्याला लागल्यावर ठरवूं आपण पुढं काय करायचं तें— "

" मग असंच निघायचं का बरोबर कांहीं घेतल्याशिवाय ?— "

समोर पडलेल्या सामानाच्या ढिगाकडे पहात रखमानें विचारलें.

" येथं काय राह्यलंय आपलं आतां बरोबर घ्यायला, सूनबाई ? हें सगळं मालगुजाराच्या मालकीचं झालं नव्हे कां ? नेसूंचीं धडोतीं न अंगांत असलेलं कष्ट करायचं बळ येवढंच काय तें आपल्या मालकीचं उरलंय आतां जगांत, रखमा ! पांडव जुगारांत हरल्यावर त्यांचीं नेसतीं वस्त्रंसुद्धां छिनावून घेतलीं त्यांच्या वैऱ्यांनीं म्हणून सांगतात हरदासबुवा. तसं मालगुजार करित नाहींत आपल्या बाबतींत हें नशीब आहे खरोखरी आपलं ! चल, निघ इथून आतां लवकर—"

तिनें सुनेला म्हटलें आणि मागें न पहातां चंदनचा हात धरून ती झपाझप चालावयाला लागली.

रखमाला वाटलें, बरोबर कांहींहि घेतल्याशिवाय आणि पुढला कसलाहि विचार केल्याशिवाय आपली सासू निघाली तरी कुठें ? पण येसूचा जिद्दी स्वभाव तिला माहित होता. म्हणून एका अवाक्षरानेंहि तिला न हटकतां ती मुकाट्यानें सासूच्या मागून चालूं लागली.

गांवाच्या अगदीं टोंकाला नदीलगत असलेल्या कुंभारवाड्यांतील त्या पडक्या घरांत येसूच्या आयुष्याचीं, नाहीं म्हटलें तरी, तीस वर्षें गेलीं होतीं. नंदूनें दादासाहेबांच्या वडलांना चंदनवाडी विकल्यावर त्याचा पहिला विचार नागपूरला जाऊन कांहींतरी निराळा उद्योग करण्याचा होता. ज्या चंदनवाडींत आपलें घराणें पिढ्या न् पिढ्या मालक म्हणून रुबाबानें नांदलें, त्या या वाडींत आपण या पुढें कास्तकार किंवा शेतमजूर म्हणून दिवस काढावेत, ही कल्पना त्याच्या मनाला सहन होईना. पण येसूनें नागपूरला जाण्याच्या त्याच्या या विचाराला मोडता घातला. तिला वाटे, एकदां ही चंदनवाडी सोडून आपण गेलों, म्हणजे पुन्हा कांहीं ती आपल्या

नजरेस पडण्याची आशा नाहीं. तिच्या दृष्टीनें चंदनवाडी हा गांव नव्हता; तर ती एक सचेतन, सजीव व्यक्ति होती; व अंगावर पिणाऱ्या मुलाला आईचें जसें विलक्षण वेड असतें, तसें वेड तिला चंदनवाडीचें होतें. देशपांडयांच्या तगाद्याला कंटाळून नंदूनें जेव्हां चंदनवाडी विकावयाला काढली, तेव्हां येसूनें आकाशपाताळ एक करून सोडलें होतें. तिचें माहेर आणि सासर हीं दोन्ही त्या वाडींत होतीं; व चंदनवाडीला अर्धचंद्राकार वळसा घालून वहाणाऱ्या वर्धा नदीच्या प्रवाहांत तिच्या जीवनाचा लहानसा निर्मळ प्रवाह मिसळून गेला होता. ती वर्धा आणि ती चंदनवाडी—येसूच्या जीवनाचा सगळा जिव्हाळा त्या वर्धेच्या प्रवाहांत आणि चंदनवाडीच्या परिसरांत सामावलेला होता.

विशेषतः गांवाच्या बाहेर नदीच्या कांठीं जो सतीचा बगीचा होता, तिथें जाऊन सांजसकाळ तिथल्या महादेवाचें दर्शन घेतल्याशिवाय तिनें कधीं अन्न घेतलें नव्हतें. नंदूच्या कोणा रणशूर पूर्वजानें पहिल्या रघूजी भोसल्याच्या बंगालवरील स्वारींत जी मर्दुमकी गाजविली, तिच्याबद्दल या गांवची देशमुखी त्याला बक्षीस मिळाली होती. तो वारल्यावर त्याची बायको सती गेली. त्या दोघांचें वृंदावन नदीकांठच्या महादेवाच्या देवळासमोर बांधलेलें होतें; व म्हणून त्या जागेला लोक ' सतीचा बगीचा ' म्हणत असत. तें सतीचें वृंदावन म्हणजे एक जागतें देवस्थान होतें. लग्नानंतर येसूला अपुऱ्या दिवसांचीं एकामागून एक चार मुलें होऊन तीं गेलीं. म्हणून तिनें सतीला नवस केला आणि नंतर तिला पूर्ण दिवस जाऊन किसन झाला. तेव्हां पासून तिची त्या स्थानावर विशेष भक्ति जडली; व तें वृंदावन आणि तो महादेव यांचें दर्शन घेतल्याशिवाय अन्नग्रहण करावयाचें नाहीं, असा नेम तिनें केला. सतीच्या बागेंतलें तें पांढरेशुभ्र वृंदावन, त्याच्या समोरचें तें तांबूस रंगाच्या दगडाचें महादेवाचें सुबक मंदिर आणि त्याच्या पाठीमागून वहाणाऱ्या वर्धेला बांधलेला काळ्या पाषाणांचा तो घाट—येसूच्या दृष्टीनें सगळ्या जगांतलीं तीर्थक्षेत्रें, सगळ्या जगांतलें पावित्र्य आणि मांगल्य एकवटलेलें होतें तिथें !

इतरांना वर्धा ही एक सामान्य नदी होती. वऱ्हाड आणि नागपूर या सलग प्रान्ताची ताटातूट करणारी ती एक कृत्रिम सीमारेषा, महाविदर्भाचीं दोन शकलें करणारें तें एक खड्गाचें लखलखीत पातें होतें. पण येसूच्या दृष्टीनें वर्धा नदी हें सर्व तीर्थांचें तीर्थ होतें, सर्व मातांची माता होती. नदीच्या पलिकडल्या बाजूला वऱ्हाडची हद्द सुरू होते असें कोणीं सांगितलें, म्हणजे ती हंसून म्हणे, " आमचीं वांवरं

जशीं या थडीला आहेत तशींच त्याहि थडीला आहेत; न् त्या नांगरलेल्या काळ्याशार वावरांतून संथ वहात जाणारी नदीची चकचकीत निमुळती धार पाहिली, म्हणजे मला काळ्या भोर केसांतून काढलेल्या भांगाच्या रेघेची आठवण होते ! ”

वर्धा आणि विदर्भ यांचा जो संबंध व्युत्पत्तिशास्त्री जोडतात, तो तिच्या कानांवर कधीं गेलेला नव्हता; व गेला असता, तरीहि तो तिला समजता ना. पण व्युत्पत्ति आणि इतिहास यांना अनाकलनीय असा जो जीवनाचा अनंत, अखंड धागा माणसाला निसर्गाशीं निगडित करीत असतो, त्या अदृश्य धाग्यानें तिचा सगळा जीवभाव वर्धा नदीशीं गुंतून गेला होता. तिचें मन हें वर्धेच्या बाबतींत जणूं नाळ न तोडलेल्या तान्हुल्यासारखें होतें. शहरांतल्या माणसांचीं नागर, सुसंस्कृत मनें हीं नाळ तोडलेल्या मुलांसारखीं असतात. वाढत्या वयाबरोबर मुलांचा आईविषयींचा ळळा जसा कमी कमी होत जातो, तसा शहरांतील नागर मनांना सृष्टिमातेशीं असलेल्या आपल्या नात्याचा विसर पडत जातो. पण, येसूला वर्धा ही आईसारखी, नव्हे आईच वाटे; व तिचें अनागर, अनघ मन त्या आईचा पदर सोडून जावयाला तयार नव्हतें.

आई ? हो, आईच. वर्धा कितीहि रोडावली, कितीहि फोफावली, तरी येसूच्या दृष्टीनें ती आईच होती. उन्हाळ्यांत खडकांतून चकाकत वहाणाऱ्या तिच्या त्या कृश जीवनधारेवर चंदनवाडीचा प्रपंच अवलंबून असे; व पावसाळ्यांत महादेवाच्या मस्तकावरून कोसळणाऱ्या गंगेप्रमाणें गर्जत सैरावैरा धांवणाऱ्या तिच्या त्या प्रचंड पाणलोटावर चंदनवाडीची समृद्धि गरगरून पिकत असे. उन्हाळ्याचा कहर होऊन नदीच्या पात्रांत जेव्हां पाण्याचीं लहान लहान डबकीं शिल्लक रहात आणि साऱ्या गांवाचा जीव जेव्हां पाण्यासाठीं कासावीस होऊन जात असे, तेव्हां येसू अभिमानानें म्हणायची, “ नदीला पाणी असो नसो. पण तिच्या कृपेनें नदीकांठच्या माझ्या नांदींतलं पाणी मात्र कधीं कमी पडायचं नाहीं ! ” आणि खरोखरीच तिच्या त्या दोन नांदींवर, नदीच्या पात्रालगत बांधलेल्या त्या दोन विहिरींवर, केव्हां केव्हां उन्हाळ्यांत साऱ्या गांवाची गुजराण होत असे. आषाढांत आर्द्रांची झड सुरू होऊन तीन तीन चार चार दिवस पाऊस सारखा धो धो पडत असला, म्हणजे चंदनवाडींतल्या लोकांच्या काळजाचा ठाव सुटून जावयाचा. नदीच्या कवेंत असलेली आपली ती चिमुकली वाडी तिच्या त्या क्षणाक्षणाला चढणाऱ्या भयानक पुरांत गडप होऊन जाते कीं काय, अशी भीति त्यांना वाटे. पण अशाहि वेळीं येसू म्हणे, “ वर्धा

चढली तरी किती चढेल? महादेवाच्या पिंडीपर्यंत! त्या पिंडीचा स्पर्श पाण्याला होतांच तिला खालीं उतरलंच पाहिजे!" येसूच्या आठवणींत तिचा हा भोळा भाव कधीं लटका ठरला नाहीं. आईनें डोक्यावर पाण्याचा तांब्या ओतावयाला घेतला म्हणजे तिच्या पायांवर उताणें पडून न्हात असलेलें मूल जसें भीतीनें क्षणमात्र डोळे मिटून घेतें, आणि डोक्यावरून पाणी निथळून गेल्यावर जसें तिच्याकडे पाहून खदखदां हांसतें, तशी वर्धेच्या पुराची ती चढतउतार पहातांना अवस्था होत असे येसूच्या मनाची. पुराचें भय तिला कधींच वाटलें नाहीं. उलट, उतूं आलेल्या दुधाच्या साईसारखा नदीच्या पात्रांतील गाळाचा मऊ रवाळ थर पुरामुळें दोन्ही तीरांवरील वावरांवर पसरलेला बघितला, म्हणजे येसूच्या मनांत येई कीं, वारंवार पीक काढल्यामुळें निकस होणाऱ्या जमिनींत पुन्हा नवा जोम उत्पन्न करण्यासाठींच वर्धा आषाढाच्या आरंभीं आपलें वैभव दोन्ही थड्यांवर उधळीत असावी. कपाशीचीं दुधिया रंगाचीं पांढरीं पांढरीं बोंडें आणि ज्वारीच्या पाचूला लाजविणाऱ्या कणसांतला हिरवा हिरवा मोतीचूर जेव्हां नवरात्राच्या सुरवातीला दिसूं लागे, तेव्हां आषाढांतल्या त्या पहिल्या पुरानें केलेली जादुगिरी फळाला आल्यासारखी वाटत असे तिला. पुराच्या वेळीं वर्धेची खणानारळांनीं ओटी भरतांना किंवा कार्तिकीच्या चांदण्या रात्रीं पुरणपोळीच्या नैवेद्यासह तिच्या पात्रांत दिवे सोडतांना जो हर्ष येसूच्या मनाला होत असे, तो जन्मदात्या आईलाहि औक्षण करितांना तिला कधीं झाला नसेल.

आणि आपल्या आईला कोणीं कमी लेखलेलें आपल्याला कधीं आवडलें आहे का? गंगाकांठच्या विश्वेश्वराचें आणि गोदाकांठच्या त्र्यंबकेश्वराचें माहात्म्य कोणीं येसूच्या समोर वर्णन केलें म्हणजे ती लगेच म्हणावयाची, "आमच्या वर्धेच्या कांठचा रुद्रेश्वरहि कांहीं कमी थोर न् कमी पावन नाहीं!" पण तिच्या स्वतःच्या दृष्टीनें मात्र वर्धेची थोरवी त्या रुद्रेश्वराच्या स्थानांत नव्हती; व शिवरात्रीला तिथें भरणाऱ्या यात्रेलाहि ती कधीं गेली नव्हती. महादेव बिचारा काय भोळा सांब! भरतखंडांतल्या अगदीं लहान सहान नद्याहि त्यानें आपल्या वास्तव्यानें पुनीत केल्या आहेत; व त्याचीं नामरूपें अनंत असल्यामुळें कोणतेंहि नांव आणि रूप धारण करून तो एखाद्या क्षुद्र ओहोळाच्या कांठींहि लीलेनें प्रकट होतो. त्याला न देवळाची गरज, न भोगाचे सोहाळे. भस्माची चिमूट, बेलाचें पान आणि पाण्याची संतत धार येवढ्यावर निभतें त्याचें. त्याच्या सान्निध्यानें वर्धेला मोठेपणा आला

तरी तो कितीसा येणार ? वर्धेची अद्वितीय श्रेष्ठता, तिची शुचिता आणि तिचें सौंदर्य या गोष्टींत होतें कीं, रुक्मिणीचें माहेर तिच्या कांठच्या कौंडिण्यपुरांत होतें आणि त्या त्रिभुवनसुंदरीच्या रूपावर लुब्ध होऊन श्रीकृष्णभगवानानें कौंडिण्यपुरास येऊन तिचें हरण केलें. गंगा आणि गोदा या कितीहि मोठ्या असल्या, तरी त्यांच्या तीरावर कांहीं असें स्त्रीरत्न निर्माण झालें नाहीं, देशोदेशींच्या सम्राटांत त्या रत्नाच्या लाभासाठीं कांहीं रणें माजलीं नाहींत किंवा प्रत्यक्ष भगवंतानेंहि त्याच्या मोहानें आपली सुवर्णद्वारका सोडून तेथें धांव घेतली नाहीं ! येसू म्हणे, सगळ्या जगाच्या माऊलीचें स्वयंवर जिथें झालें, जगाची माऊली जिच्या कांठांवर लहानाची मोठी झाली, त्या आमच्या वर्धा नदीइतकें दुसरें पवित्र तीर्थ कोणतें असणार आहे पृथ्वीच्या पाठीवर ? गंगा आणि गोदा या कितीहि मोठ्या असल्या, तरी जगन्माऊलीचें माहेर होण्याचें भाग्य कांहीं त्यांना लाभलेलें नाही. कौंडिण्यपुरची कार्तिकीची यात्रा आणि दीपोत्सव—येसूच्या खेडवळ जीवनांतलें रम्य स्वप्न होतें तें एक !— जगन्माऊलीनें ज्या वर्धेच्या कांठीं जन्म घेतला, बाललीला केल्या आणि अनुरूप वराच्या प्राप्तीसाठीं अंबेची आराधना केली ती वर्धा—ती कितीहि लहान असली, तरी तिची सर इतर नद्यांना काय येणार ? आणि तिच्या कांठीं सर्व समृद्धि नांदावी यांत तरी नवल काय ! येसू मोठ्या अभिमानानें म्हणावयाची, महालक्ष्मीचें माहेर हें माझें माहेर आहे न् मी इथं असेपर्यंत तिच्या कृपेनें मला कधीं कांहीं कमी पडायचं नाहीं !

वर्धेशिवाय तिनें फक्त आणखी एकच नदी पाहिली होती. आणि ती म्हणजे नागपूरची नागनदी. तिची सगळ्यांत धाकटी बहीण अंजिरा ही नागपुरला दिलेली होती. लग्नानंतर तिची पाठराखीण म्हणून येसू नागपूरला गेली असतां नागनदीचा तो घाणेरडा नाला तिच्या दृष्टीस पडला होता. नदी हा शब्द उच्चारल्याबरोबर पात्रांतून खळाळत वाहाणाऱ्या पाण्याचें, तीरावरील घाटांचें आणि देवळांचें व दोन्ही थड्यांवरून दूर दूर पसरत गेलेल्या हिरव्यागार शेतांचें जें रम्य दृश्य तिच्या डोळ्यांपुढें उभें रहात असे, त्याचा कांहींच आढळ तिला नागनदी पाहून झाला नाहीं. त्यामुळें लोकांना जीवनदान देणाऱ्या नदीच्या शुचितेचा आणि सौंदर्याचा खातेरा करणाऱ्या शहरी संस्कृतीविषयीं जो एक उबग तिच्या मनांत उत्पन्न झाला, तो कायमचाच. शरीराला जशा रक्तवाहिन्या तशा देशाला नद्या आहेत, अशीच जणूं भावना होती तिच्या खेडवळ मनाची; व शरीरांतलें रक्त बिघडूं देणें हें जितकें अनर्थावह, तितकेंच नदीचा ओघ दूषित होऊं देणें हेंहि तिला भयंकर वाटत असावें.

म्हणून नंदूचा नागपूरला जाण्याचा विचार तिनें हट्टानें हाणून पाडला होता.

पण, ती वर्धा आणि ती चंदनवाडी यांना मागें टाकून, कायमची पाठमोरी होऊन आज येसू आपल्या सुनेला आणि नातीला घेऊन रस्ता चालूं लागली होती.

तिच्या पायांत गोळे येत होते, पोटांत गोळे उठले होते. आणि आंसवें सगळीं आटून जाऊन जळजळत असलेल्या खोल डोळ्यांपुढें गेल्या पंचवीस तीस वर्षांतले अनेक प्रसंग पिशाचांप्रमाणें वेडेविद्रे नाचत होते.

वाडी विकल्यावर नंदू जेव्हां नागपुरला जावयाला निघाला, तेव्हां आपण किती त्रागा केला आणि देशपांड्यांचें देणें फेडून उरलेल्या पैशांतून त्याला हें कुंभारवाड्यांतलें जुनें घर आणि नदीकांठचें वावर विकत घ्यावयाला लावून चंदनवाडीलाच रहावयाला कसें भाग पाडलें, याची तिला आठवण झाली. त्या वेळीं आपल्याला केवढी आशा होती कीं, आपला किसन मोठा झाल्यावर कांहींतरी व्यापारधंदा करून चंदनवाडी पुन्हा परत मिळवील. पण, किसनला कापसाच्या दलालींत ठोकर बसली; व शेवटीं दादासाहेबांच्या वडलांनीं आपल्या नवऱ्याच्या आग्रहास्तव त्याला वर्धा मिलमध्यें लावून दिला. त्याच्यापेक्षां थोडे मोठे असलेले दादासाहेब वकिलीची परीक्षा दिल्यावर आतां चंदनवाडीला येऊन इस्टेटीची व्यवस्था पाहूं लागले होते; व त्यांचा धाकटा भाऊ बॅरिस्टर होऊन नागपुरास स्थायिक झाला होता. तरी सुद्धां आपल्या वेड्या मनाला त्या वेळीं वाटे कीं, आज ना उद्यां आपली स्थिति बदलून चंदनवाडी पुन्हा आपल्या ताब्यांत येईल.

आणि याच आशेनें आपण आपल्या एकुलत्या एका नातीचें नांव 'चंदन' असें ठेवलें.

आपल्याप्रमाणेंच रखमालाहि एकामागून एक चार मुलें अपुऱ्या दिवसांनीं होऊन गेलीं. त्यानंतर सतीला आपण नवस केला आणि ही मुलगी झाली. हा सतीचा प्रसाद म्हणून नंदू तिचें नांव सतीच ठेवणार होता. पण, आपण हट्टानें तिचें नांव 'चंदन' ठेवलें. नंदू त्या वेळीं आपल्याला हंसून म्हणाला देखील, "नातीचें नांव चंदन ठेवल्यानं का वाडी पुन्हा परत मिळणार आहे तुला? उलट तिचें नांव उच्चारल्याबरोबर दर क्षणाला आठवण होईल तुला वाडी आपण गमावल्याची— "

पण, आपण त्याचें ऐकलें नाहीं आणि हट्टानें नातीचें नांव 'चंदन' ठेवलें. तिच्या नशिबानें तरी वाडी आपल्याला परत मिळेल असा भरंवसा त्या वेळीं वाटला होता आपल्या मनाला—

परंतु, चंदनचा पहिला वाढदिवस होतो न होतो, तोंच उन्हाळ्याच्या ऐन कहरांत एक दिवस संध्याकाळीं पुलगांवहून लॉरींत घालून किसनचें प्रेत गिरणीच्या लोकांनीं घरीं आणलें. आपल्या आयुष्यांतली काळरात्र ती. देशपांड्यांनीं न मागतां नुकसानभरपाई दिली. पण, जिवाच्या मोबदल्यानेंहि भरपाई न व्हावी, असें नुकसान होतें तें.

त्या वेळीं पुन्हा नंदूनें आपल्याला म्हटलें कीं, आतां तरी चंदनवाडी सोडून आपण नागपुरला जाऊं या. पण आपण त्याचें ऐकलें नाहीं आणि येथेंच राहिलों. किसनच्या अपघाती मरणानें वीज पडलेल्या झाडासारखी अवस्था झाली नंदूची. तो नागपूरला जाण्याची गोष्ट पुनःपुन्हा काढी आणि आपण पुनःपुन्हा त्याला नकार देत असूं. त्या वेळीं जर त्याच्या आग्रहाप्रमाणे आपण नागपूरला गेलों असतों तर त्या थारेपालटामुळें नंदूचा मृत्यु कदाचित् टळला असता.

तो वारल्यावर आपली स्थिति अगदींच खालावली आणि देशपांड्यांच्या शेतावर मजुरी करण्याचा प्रसंग आपल्यावर आला. आपली तरणीताठी विधवा सून रखमा जेव्हां प्रथमच देशपांड्यांच्या शेतावर कामाला गेली, तो दिवस—त्या दिवसाची आठवण तापलेल्या सळयांनीं जणूं रेखलेली होती येसूच्या हृदयावर. त्या दिवशीं संध्याकाळीं रखमा घरीं आल्यावर तिला म्हणाली—

"सासूबाई, आपण उद्यांच्या उद्यां चंदनवाडी सोडून नागपुरला जाऊं या—"

"काहून ?—"

आपण तिला थोडें रागानेंच विचारलें.

"आज मी काम करीत असतां दादासाहेब शेतावर आले होते. त्यांनीं माझी विचारपूस केली. त्यांची नजर न् वागणूक कांहीं चांगली नाहीं वाटली मला—"

बोलतां बोलतां तिचा चेहरा अगदीं उतरून गेला.

"दुसरा माणूस कसा का असेना, सूनबाई ? आपण चांगले असलों, म्हणजे कुणाचंहि भय नाहीं आपल्याला— "

"भय कसं नाहीं ? ते मालक आहेत. तिथलीं सगळीं माणसं मिंधीं न् ताबेदार आहेत त्यांचीं. ते काय वाटेल तें करूं शकतील. म्हणून मी म्हणतें आपण अशा स्थितींत इथं रहाण्यांत कांहीं अर्थ नाहीं— "

पण, त्याहि वेळीं सुनेचें आपण ऐकलें नाहीं. आणि आज अशा रीतीनें घरांतून बाहेर पडण्याचा प्रसंग अखेर आपल्यावर आला.

" मोठी माय, कोठं घेऊन चालली व तूं आम्हांला ?—"

कांहीं अंतर चालून गेल्यावर चंदननें तिला परत विचारलें.

उन्हाळ्याच्या सुरवातीचे दिवस होते ते. त्या थोड्याशा वाटचालीनें चंदनचा चेहरा कोमेजून जाऊन तिच्या कानशिलांवर घामाचे ओघळ आले होते.

" नागपूरला— "

येसूनें तिच्याकडे न पहातांच म्हटलें. ती आपल्याच विचारांत चूर होती.

" किती लांब आहे ग नागपूर येथून ?— "

" पुष्कळ लांब आहे— "

" आपण पायदलच जायचं का इतक्या लांब, मोठी माय ?— "

तो प्रश्न विचारतांना चंदनच्या आवाजांत उत्पन्न झालेला रडवेपणा येसूला जाणवला आणि तिला झटदिशीं उचलून घेऊन तिचें तोंड पुशीत ती म्हणाली—

" उन्हानं कोमेजून गेली पोर ! आपण बाजारांत जाऊन रेगी करूं न् रेगींतूनच जाऊं पुलगांव स्टेशनवर— "

" आणि तेथून आगगाडीनं नागपूरला जायचं ?— "

" हो— "

आजीचें तें उत्तर कानांवर पडतांच चंदन आपला सारा शीण विसरली आणि हर्षभरानें टाळ्या पिटून म्हणाली—

" रघुजी राजाचं नागपूर ! रघुजी राजाचं नागपूर ! आम्ही आगगाडींत बसून नागपूरला जाणार, नागपूरला जाणार !— "

## गिरणींतील पहिला दिवस

## ३

त्या दिवशीं संध्याकाळीं रखमा जेव्हां गिरणींतून परत घरीं आली, तेव्हां कापसाच्या तंतूंनीं पांढरे झालेलें तिचें डोकें बघून चंदनला वाटलें, आपली आईसुद्धां मोठ्या मायप्रमाणेंच एकाएकीं म्हातारी झाली कीं काय ?

रखमानें आजवर फक्त शेतमजुरी केलेली होती. गिरणींतील मजुरीचा तो पहिलाच दिवस होता तिचा. ती जी घरांत आली, ती पायांवर पाणी न घेतां किंवा तोंडावरून पाण्याचा हात न फिरवतां, मधल्या खोलींत नरट घालून त्याच्यावर एकदम आडवी झाली.

नागपूरला येऊन त्या सास्वासुनांना आतां पाऊण महिना होत आला होता. आल्यावर त्या प्रथम अंजिराच्या घरीं उतरल्या. अडीअडचणीच्या प्रसंगासाठीं वेगळे काढून ठेवलेले जे पंचवीस तीस रुपये येमूजवळ होते, ते तिनें मालगुजाराचीं माणसें जप्तीला आलेलीं दिसतांच ज्वारीच्या कोठयांतून काढून त्यांची पुरचुंडी आपल्या निऱ्यांत खोवून ठेवली. घरांतून पाऊल बाहेर ठेवल्या क्षणापासून त्या पैशांच्या उपयोगाला प्रारंभ झाला.

आपली थोरली वहीण किती तरी वर्षांनीं सुनेला आणि नातीला घेऊन आपल्याकडे आली, म्हणून अंजिराला फार आनंद झाला. पण येमू टांग्यांतून खालीं उतरल्याबरोबर तिला जो गहिंवर दाटून आला, त्यांत मात्र हर्षाच्या उमाळ्यापेक्षां दुःखाचा कढच जास्त होता. तिचा नवरा पंजाबराव याला कायदेभंग केल्याबद्दल नुकतीच अटक झाली होती; व त्याला झालेल्या दंडाच्या वसुलीसाठीं घरांतली दुभती म्हैस आणि इतर कांहीं सामान पोलिसांनीं बेहिशेबी जप्त करून नेल्यामुळें अंजिरा अगदीं जिकिरीला आली होती. दंडाचे शंभर रुपये तिनें कोणाकडून तरी उसनें आणून भरले असते. पण, आपल्याला दंड झाल्यास तो भरला जाऊं नये, अशी सक्त

ताकीद पंजाबरावानें तिला शिक्षेच्या वेळीं देऊन ठेवलेली असल्यामुळें, तिचा कांहीं इलाज चालला नाहीं; व नवरा तुरुंगांत जाऊन पंधरा दिवस होतात न होतात, तोंच घरावर जप्ती येऊन दुभतें जनावर आणि कांहीं किंमती सामान यांना मुकण्याचा प्रसंग तिच्यावर आला.

त्यामुळें आपल्या थोरल्या बहिणीला पहातांच अंजिराला एकदम रडें कोसळलें. नंदूच्या मरणानंतर त्याच्या तेराव्या दिवशीं ती दुखवट्याचा अहेर घेऊन नवऱ्यासह येसूला भेटावयाला गेली होती. त्यानंतर पांच सहा वर्षांनीं त्या दोघी बहिणी आज पुन्हा एकमेकींना भेटत होत्या. दोघीहि आपआपल्या परीनें पोळलेल्या होत्या. मुलगा आणि नवरा हे दोघेहि मरून गेल्यामुळें एकीचा संसार उघडा पडला होता; तर नवरा राष्ट्रीय चळवळींत पडल्यामुळें दुसरीच्या संसाराची घडी बिघडून गेली होती.

येसूनें घरांत पाऊल ठेवल्याबरोबर अंजिराच्या संसाराची ती विस्कटलेली घडी तिच्या ध्यानांत आली. नाग नदीच्या कांठीं काशीबाईच्या देवळामागें पंजाबरावाचें जुनें पिढीजाद घर होतें; व नागपूरपासून सहा मैलांवर चिचभुवनला त्याची थोडी शेतीहि होती. तो संत्र्याची दलाली करित असे. पण, संत्र्याचा व्यापार हा मुख्यतः मुसलमानांच्या हातीं असल्यामुळें, संत्रा मार्केटांत त्याचा जम फारसा कधींच बसला नाहीं. असहकरितेच्या चळवळींत सामील झाल्यापासून हा खुट्टरुट्ट चालणारा दलालीचा धंदाहि बसला; व घरच्या शेतीच्या उत्पन्नावर वाढत्या संसाराचा व्याप निभावण्याची पाळी अंजिरावर आली. असहकारितेच्या, झेंडा सत्याग्रहाच्या आणि नंतर आतां कायदेभंगाच्या चळवळींत पंजाबरावानें जो भाग धडाडीनें घेतला, त्यामुळें अंजिराचें जीवन जास्त जास्त कष्टमय होत गेलें. तिची थोरली मुलगी गुलाब ही वर्ध्याच्या महिलाश्रमांत शिकत होती; व तिच्या खालचीं चार मुलें आईला फी द्यावयाला परवडेल त्याप्रमाणें केव्हां शाळेंत जात तर केव्हां घरींच असत.

अंजिराची ती खालावलेली स्थिति पाहून येसूनें तिला दुसऱ्या दिवशीं जेवतांना म्हटलें—

" तूं कांहीं तरी काम पाहून दे आम्हां दोघींना लवकर, अंजू ! तूं इथली जुनी रहाणारी आहेस. तुझ्या ओळखीदेखी आहेत पुष्कळ. तूं शब्द टाकलास तर आम्हांला काम मिळेल चांगल्या ठिकाणीं--"

" पण तुझं वय आहे का काम करायचं आतां, येसूताई ? आणि सूनबाई झाली,

तरी ती काम कसलं करणार ? आपल्यासारख्यांना महिनेदारणीचं काम करून भांडीं घांसता येणार आहेत का लोकांकडचीं ?—"

" वयाचा काय सवाल आहे, अंजू ? शरीर चालेल तोंपर्यंत कष्ट हे केलेच पाहिजेत माणसानं. आम्ही तीनच जीव असलों, तरी या पोरीचं सगळं यथास्थित व्हायचं म्हणजे आम्हां दोघींना पैसा कमवायलाच हवा. माझी सारी आशा आतां तिच्यावर आहे—"

" जगांत कुणाची आशा धरायचे दिवस आतां राहयलेले नाहींत, येसूताई ? देवाधर्माच्या साक्षीनं ज्याला माळ घातलेली असते, तो नवरासुद्धां केव्हां सोडून जाईल याचा नेम नाहीं या जगांत ! तुझ्या डोक्यावरलं छत्र गेलं म्हणून तूं दुःखी कष्टी. पण माझ्या डोक्यावरलं छत्र कायम असूनहि मी उघडी पडल्यासारखी दिवस काढतें आहे गेलीं दहाबारा वर्सं—"

" अग, पण तुझी गुलाब शिकून आली कीं पांग फेडील बरं तुझे—"

" गुलाब ? ती गोष्टच सोडून दे तूं, येसूताई. घर, कुटुंब, आई, भावंडं हें कांहीं हिशेबांतच नाहीं मुळीं तिच्या. पुराणांतल्या त्या मदालसा राणीचे मुलगे जन्मतःच आईच्या उपदेशानं विरक्त होऊन अरण्यांत जात ना, तसा प्रकार झालाय आमच्या गुलाबचा ! तिची खादी, चरखा, महारमांगांचा उद्धार न् तें सेवेवरलं व्याख्यान ऐकलें नाहींस तूं अजून ! ती सुटींत इथं आली, म्हणजे घरांत कांहीं सागुती किंवा अंडं आणायची सोय नाहीं सणावारालासुद्धां ! ती पांग जरूर फेडील. पण माझे नव्हे, तर आपल्या मायभूमीचे ! म्हणून म्हणतें आपले हातपाय चालतील तोंवर कष्ट उपसावेत आणि नाहीं त्या दिवशीं अंथरुणावर पडून मुकाट्यानं मरणाची वाट पहावी—"

तिचे ते अत्यंत कडवट उद्गार ऐकून येसूनें एक उसासा टाकला आणि ती म्हणाली—

" कष्ट न् दुःख हीं कुणालाच सुटलेलीं नाहींत या जगांत. पण म्हणून काय स्वतःच्या डोक्यावरली जबाबदारी टाकली आहे का कुणी ? ज्यांना आपण जगांत आणलंय, त्यांचं आपल्या हातून होईल तितकं केलंच पाहिजे माणसानं. देवच बोलून चुकलाय तें. तूं कांहीं तरी काम पाहून दे आम्हां दोघींना लवकर—"

" कामाला काय तोटा आहे शहरांत ? ही समोरची गिरणी म्हणजे मायपोट आहे देशोधडीला लागलेल्या कास्तकारांचं. पण माझी खरंच इच्छा नाहीं तुम्ही असलं कांहीं काम करावंत अशी—"

अंजिरा हें बोलली खरें, पण तिला आपल्या थोरल्या बहिणीचा करारी स्वभाव माहित होता. दुसऱ्याच दिवशीं शुक्रवार बाजार होता. येसूनें लगेच जरूरीपुरतें प्रपंचाचें सामान आणि दाणादुणा विकत घेतला; व स्वतंत्र घर पहावयालाहि सुरवात केली. अंजिराला तिची ही घाई आवडली नाहीं. पण, रखमाला नागपूर मिल-मध्यें कोणतें काम मिळूं शकेल, याच्या तपासाला तीहि लागली. त्या गिरणींतला एक जॉबर पंजाबरावाचा स्नेही होता. त्याच्या मार्फत खटपट करून तिनें रख-माला रहाट खात्यांत नोकरी मिळवून दिली. येसूनें गिरणींत काम करावें, अशी तिची इच्छा नव्हती. शिवाय, या नव्या संसाराची घडी नीट बसेपर्यंत तरी येसूनें नोकरी करूं नये, असा रखमाचाहि आग्रह पडला. त्यामुळें ती घरींच राहिली.

रखमा नोकरीवर रुजू होण्यापूर्वीच येसूनें राजाबक्षाच्या वाटेवर असलेल्या उंट-खान्याच्या गरीब वस्तींत एका जुन्या घरांतल्या तीन लहान लहान खोल्या भाड्यानें घेतल्या; व अंजिरा नको नको म्हणत असतां आपलें स्वतंत्र बिऱ्हाड तिथें थाटलें. तिच्या घरांतून निघतांना मुलांच्या हातीं खाऊसाठीं म्हणून जे चकचकीत दोन रुपये येसूनें ठेवले, त्याचा तर अंजिराला फार राग आला. पण, तो सगळा राग तिनें मुकाट्यानें गिळला आणि सबंध दिवसभर खेपा घालून आपल्या बहिणीचा संसार नव्या बिऱ्हाडांत नीट लावून दिला.

नागपूरला आल्यावर अंजिराच्या घरीं जे हे पंधरा दिवस येसूनें घालविले, ते जरी फारसे सुखांत गेले नाहींत, तरी आपल्या परिस्थितींत एकाएकीं झालेला बदल तिला तितकासा जाणवला नव्हता. पण नागनदीच्या कांठावरील या उंटखान्याच्या ओंगळ वस्तींत रहावयाला आल्यावर मात्र तिला त्या दिवशीं रात्रीं ब्रह्मांड आठवलें. चंदनवाडींतलें त्यांचें घर पडकें असलें, तरी स्वच्छ वस्तींत होतें; व घराभोंव-तालच्या आवारांत त्यांनीं लहानसा बगीचाहि केलेला होता. शिवाय, सांजसकाळ महादेवाच्या दर्शनासाठीं जेव्हां ती नदीकांठच्या सतीच्या बगीचांत जात असे, तेव्हां तिथल्या त्या प्रसन्न वातावरणांत असतांना आपल्या दुर्दैवाचा तिला थोडा वेळ तरी विसर पडल्याशिवाय रहात नसे.

पण, आज उंटखान्यांतल्या त्या भिकार सडकेला लागून असलेल्या जुनाट घराच्या छपरींत जेव्हां ती संध्याकाळीं येऊन बसली, तेव्हां भोंवतालच्या बकाल वस्तीचें गलिच्छ दारिद्र्य, पलिकडल्या कांठावरील नागपूर मिलच्या चिमण्यांचा धूर आणि नागनदीच्या पात्रावरून वहात येणारा दुर्गंधी वारा यांची जाणीव होऊन तिला

आपण इहलोकींच्या नरकांत येऊन राहिलों आहोंत कीं काय, असा भास झाला. उंटखान्याची ती वस्ती भेसळ होती. गिरणींत नोकरी करणारे महार, समोर असलेल्या कॅथलिक मिशननें बाटविलेले खालच्या जातींचे खिस्ती लोक व मोलमजुरी करणारे ढीवर, राऊत आणि गोंड यांचीं घरे आणि खोपटें सभोंतीं दाटीवाटीनें भिडलेली होतीं. येसूनें घेतलेल्या घरासमोरच मिशनची तुरुंगासारखी लांबच लांब भिंत होती. त्या मिशनच्या मोठ्या दरवाजाला असलेल्या दिंडींतून जीं आंधळीं पांगळीं, लंगडीं, वेडसर, महारोगी वगैरे नाना प्रकारचीं अपंग अनाथ माणसें दिवस-भर जात येत असत, त्यांचें भेसूर रूप आणि वेडेविद्रे हावभाव हे त्या वस्तीच्या भयाणतेंत भर घालीत असत. चंदनवाडीच्या निसर्गरम्य वातावरणांत आयुष्य घालविलेल्या येसूला ती वस्ती म्हणजे जर मूर्तिमंत नरक वाटला असला, तर त्यांत नवल काय ?

पण, त्या घाणेरड्या वस्तीची तिला जितकी किळस वाटली, त्याहिपेक्षां भीति जास्त वाटली. तिच्या मनांत आलें, माझी चंदन जर या वस्तीत वाढली, तर ती या रस्त्यांत खेळणाऱ्या आणि एकमेकांना भलभलत्या अभद्र शिव्या देणाऱ्या मुलांसारखीच निपजणार नाहीं का ? आपल्या देशमुखीच्या रुबाबाची आणि चंदनवाडीच्या वैभवाची तिला या अमंगळ परिस्थितींत काय आठवण रहाणार ? या परिस्थितींतून डोकें वर काढावयाला जी स्वतःच्या उच्चतेची जाणीव मनांत सतत जागृत असावयाला हवी, ती तरी तिच्या ठिकाणीं कशी उत्पन्न होणार ?

छे ! इहलोकींच्या या नरकवासांत त्या अल्लड पोरीला आणण्यांत चूक झाली आपली. या नरकवासांत जर ती राहिली, तर तिलाहि भविष्यकाळ नाहीं, आपल्यालाहि पुन्हा भाग्याचे दिवस नाहींत—

तो दारुण विचार तिच्या मनांत थैमान घालीत असतांनाच चंदन तिच्या जवळ आली आणि तिच्या गळ्याला मिठी मारून म्हणाली—

" मोठी माय, आपण चंदनवाडीला पुन्हा कधीं ग परत जायचं ?—"

तिच्या त्या प्रश्नानें येसूच्या पोटांत भडभडून आलें. पण तें सगळें गिळून तिच्या अंगावरून हात फिरवीत येसू म्हणाली—

" का बरं ? येथं करमत नाहीं का माझ्या बाईला ? —"

" छे ग ! आपली वर्धा नदी किती सुंदर होती ! नाहींतर ही नागनदी ! किती घाण येते ग मागल्या दारीं बसलं म्हणजे ! आणि या समोरच्या मोठ्या थोरल्या दरवाजाच्या दिंडींतून किती वेडींवांकडीं माणसं जात येत असतात दिवसभर—"

" अग, तो की नाहीं कंगालखाना आहे. भिकारी रहातात तिथं सारे—"

" नाहीं ग. मी तर आज दुपारीं दोन गोऱ्या गोऱ्या मडमा बाहेर जातांना पाह्यल्या बैलांच्या टांग्यांतून—"

" हो. त्याच सांभाळ करतात बरं का त्या भिकाऱ्यांचा—"

" त्यांना कोणीं सांगितलं हें काम ?—"

" त्यांच्या धर्मानं—"

" आपला धर्म नाहीं सांगत भिकाऱ्यांचा सांभाळ करायला ?— "

" सांगतो ना. चंदनवाडीला नाहीं पाह्यलंस का तूं दर सोमवारीं न् गुरुवारीं भिकाऱ्यांची कशी गर्दी होत असे मालगुजाराच्या अंगणांत भिक्षेसाठीं ती ?—"

" हो. पण या मडमा भिकाऱ्यांतच रहातात ना ? असं का ?— "

" त्यांच्या धर्मानं सांगितलंय त्यांना तसं— "

पण, येसूला ती आणखी कांहींतरी विचारील, अशी भीति वाटली. म्हणून तो विषय टाळण्यासाठीं ती म्हणाली—

" तुला शाळेंत जावं लागेल बरं कां आतां लवकरच— "

" पण शाळा आहे कुठं इथं ?— "

" अंजु मावशीच्या मुली जातात त्याच शाळेंत घालणार आहें मी तुला— "

" पण का ग मोठी माय, तूं मोठ्या मावशीच्या शेजारींच का नाहीं घर पाह्यलंस आपल्यासाठीं ? तिच्या घराच्या माडींतून ते काशीबाईच्या देवळाचे घुमट किती छान दिसत असत ! मला नाहीं आवडत या घाणेरड्या जागीं राह्यला— "

" जाऊं बरं, आपण लवकरच तिथं राह्यला जाऊं. तुझ्या आईला पगार सुरू झाला, म्हणजे राह्यला जाऊं आपण दुसऱ्या चांगल्या ठिकाणीं— "

येसूनें तिची कशीबशी समजूत घातली.

पण त्या दिवशीं सारी रात्र तळमळत काढली तिनें चंदनचें पुढें कसें होणार या काळजीनें.

त्या नंतर पांच दिवसांनीं संध्याकाळीं रखमा जेव्हां कामावरून घरीं परत आली, तेव्हां तिच्या केंसावर पडलेले ते कापसाचे तंतु आणि तिचा तो एकंदर अवतार पाहून चंदननें आपल्या मोठया आईला नाना प्रकारचे प्रश्न विचारून भंडावून सोडलें.

त्या दिवशीं दुपारी येसू एकटीच सुनेला शिदोरी पोचविण्यासाठीं गिरणींत गेली

होती. तेथील कामाचा तो अमानुष प्रकार आपल्या नातीच्या दृष्टीस पडावा, अशी तिची इच्छा नव्हती; व म्हणून तिनें गिरणींत जातांना चंदनला अंजिराच्या घरीं ठेवलें. पण, संध्याकाळीं रखमा घरीं परत आल्यावर, तिचा तो अवतार पाहून चंदननें दुसऱ्या दिवशीं शिदोरी नेण्याच्या वेळीं आजीबरोबर गिरणींत जाण्याचा हट्ट धरला.

आईचें एकाएकीं पांढरें झालेलें डोकें पाहून चंदनला जितकें आश्चर्य वाटलें, त्याहिपेक्षां जास्त आश्चर्य तिला आईच्या घरीं आल्याबरोबर तरट पसरून त्यावर तासभर लोळत पडण्याचें वाटलें. मोठ्या आईच्या समोर आपल्या आईला अशा रीतीनें लोळतांना तिनें आजवर कधींहि पाहिलें नव्हतें.

रखमानें तरटावर अंग टाकलेलें पाहतांच चंदन हळूच तिच्याजवळ आली आणि आईच्या कुशींत शिरण्याचा तिनें प्रयत्न केला. पण रखमानें एक शब्दहि न बोलतां तिला मुकाट्यानें बाजूला लोटली; व अतिश्रमानें आलेला थकवा घाल-विण्यासाठीं आपले डोळे मिटले. आपण आईच्या जवळ गेलों असतां तिनें आपल्याला दूर लोटल्याचा चंदनच्या आयुष्यांतला तो पहिलाच प्रसंग होता.

तिच्या त्या चमत्कारिक वर्तनाचा कांहींच अर्थ चंदनला समजेना. आईला कांहीं तरी होत असावें, एवढेंच फक्त तिच्या मनांत आलें; व तें आजीजवळ बोलून दाखवावें म्हणून ती स्वयंपाकाच्या खोलींत आली.

येसू चुलीशीं बसून भाकऱ्या भाजीत होती. चंदनला आलेली पहातांच ती म्हणाली—

" ताजी उनउनित भाकरी खाते का बेटा ? तुझ्यासाठीं चांदोली भाजतें बघ मी— "

पण आईच्या त्या चमत्कारिक वर्तनामुळें चंदनची सगळी भूक मरून गेली होती. तिनें येसूच्या प्रश्नाला उत्तर न देतां विचारलें—

" माय, असं काहून करून राह्यली कामावरनं आल्यापासून ?— "

" काय केलं व ?—"

" निजलीय् तरटावर; न् बोलत नाहीं एक शब्दसुद्धां माझ्याशीं— "

" ती कीं नाहीं फार थकून आली आहे बेटा—"

" एवढं काम करावं लागतं तिला गिरणींत ?—"

" हो—"

" आणि तें डोक्यावर पांढरं पांढरं काय आहे तिच्या ?— "

" ते कीं नाहीं कापसाचे धागे—"

" आणि अंगाला कसा विलक्षण वास येतोय तिच्या—"

" अग, तिथं घाणींत, धुरांत, वाफेंत काम करावं लागतं, बेटा. त्यामुळं खराब झालंय अंग तिचं. आतां ती अंग धुईल, भाकर खाईल न् मग घेईल जवळ तुला—"

" पण ती शेतावर दिवसभर काम करीत असे पावसापाण्यांत तरी सुद्धां कधीं थकत नव्हती इतकी न् घाणहि येत नव्हती अशी तिच्या अंगाला— "

" तें शेतांतलं काम निराळं न् हें गिरणींतलं काम निराळं! शेतांतले कष्ट हे किती झालं तरी उघड्या स्वच्छ हवेंतले कष्ट. तिथं कापसाचे धागे नाहींत, कोळशाचा धूर नाहीं, पाण्याची वाफ नाहीं किंवा यंत्रांचा कानठळ्या बसवणारा खडखडाटहि नाहीं. तास न् तास एका जागेवर उभंहि रहावं लागत नाहीं दगडी पुतळ्यासारखं काम करितांना. गिरणींतल्या कामाची सगळीच तऱ्हा निराळी—"

" मग मला दाखवशील उद्यां हें काम कसं असतं तें ! तूं शिदोरी घेऊन जाशील, तेव्हां येईन मी तुझ्या बरोबर— "

" उद्याचं उद्यां पाहूं. पण तूं मायला त्रास देऊं नकोस आतां आपल्या. तिला पडून राहूं दे स्वस्थ कांहीं वेळ. मग तूं खाते का ही चांदोली ?— "

गरगरून फुगलेली लहानशी भाकरी निखाऱ्यांवरून उचलीत येसूनें तिला विचारलें.

" नको, मायबरोबरच खाईन भाकर मी— "

चंदननें म्हटलें. तें उत्तर देतांना तिच्या त्या सांवळ्या उंच कपाळाला पडलेली आठी आणि टपोऱ्या डोळ्यांत एकाएकीं उमटलेली विषादाची झांक पाहून येसूच्या मनांत आलें, ही पोर आपल्या आईसारखीच आंतल्या गांठीची आणि मानी होणार का ?

दुसऱ्या दिवशीं दुपारीं अकरा वाजतां शिदोरी घेऊन येसू जेव्हां गिरणींत जावयाला निघाली, तेव्हां चंदननें तिला म्हटलें—

" मोठी माय, मी नाहीं आज मोठ्या मावशीकडे बसून रहाणार कालच्यासारखी. गिरणींत येईन तुझ्या बरोबर— "

" तिथं येऊं देत नाहींत लहान्या मुलांना, बेटा— "

" तूं कांहीं तरी सांगून राह्यलीस मला ! मी कालच पाह्यलं आपल्या शेजारचीं कितीतरी मुलं शिदोरी घेऊन जातात तिथं आपल्या आईबापांसाठीं. तान्ह्या मुलांची सुद्धां सोय आहे म्हणतात तिथं—"

" तुला कोणी सांगितलं, पोरी ?— "

" मला त्या चिंधीनं सांगितलं. तिची माय चार महिन्यांचं लेकरूं घेऊन जाते रोज सकाळीं कामावर. मग तूं नेते ना मला आपल्या बरोबर ?— "

येसूच्या मनांत चंदनला गिरणींत न्यावयाचें नव्हतें. पण, चंदनच्या चौकस स्वभावामुळें तिला फसवणेंहि शक्य झालें नाहीं. म्हणून येसू शेवटीं रागाचा आव आणून म्हणाली—

" मोठी ढालगज आहेस तूं, पोरी ! साऱ्या गांवाच्या चौकशा करायला हव्यात तुला— "

" पण तूं नेतेस का नाहीं सांग मला ?— "

चंदन फुरंगटून म्हणाली.

" बरं, चल चल ! रागावायला नको एवढं. पण तिथं गडबड नाहीं करायची हं— "

गिरणीच्या छोट्या फाटकानें त्या दोघी आंत शिरल्या. चंदन जर बरोबर नसती, तर येसू परस्पर बाहेरल्या बाजूनें स्त्रीमजुरांच्या मुलें ठेवण्यासाठीं बांधलेल्या लेकुरघरांत गेली असती. पण आंत शिरल्याबरोबर चंदननें तिला हळूच म्हटलें—

" मोठी माय ग, आम्हांला गिरण दाखव ना सगळी हिंडून— "

" परवानगीशिवाय आंत जाऊं देत नाहींत, बेटा "

" तूं कांहीं तरी सांगतेस. आपल्या वस्तींतल्या बहुतेक मुलांनीं गिरण पाह्यली आहे सगळी. तुझ्या मनांतच नाहीं मला दाखवायचं—"

तिनें बोलतां बोलतां एकदम येसूचा हात सोडून दिला. तिचे डोळेहि पाण्यानें डबडबले.

" रडूं नकोस, बेटा. आपण शिदोरी देऊं न् मग तुझ्या मायला पुसून गिरण पाह्यला जाऊं—"

त्या दोघी मागल्या वाटेनें लेकुरघरांत गेल्या. गिलावा आणि सफेती न केलेली ती तांबड्या विटांची लाल इमारत भर दुपारच्या कडक उन्हांत भेसूर दिसत होती. समोरच्या अंगणांत उघडीं नागडीं मुलें खेळत होतीं; व आंत कांहीं बायका

फरशीवर बसून तान्ह्या मुलांना पाजीत होत्या. पाळण्यांतलीं कांहीं मुलें झोंपी गेलेलीं होतीं, तर कांहीं रडत होतीं. कांहीं बायका मुलांना घेऊन शिदोरी खात होत्या, तर कांहीं खाणें संपल्यामुळें चंची सोडून पानतंबाखूचा समाचार घेत होत्या. इमारतीच्या एका कोपऱ्यांत दोन सरक पडदे लावून जो आडोसा केला होता, त्यांत एक काळगेली, माताचे वण तोंडावर असलेली, लठ्ठ तरुण स्त्री नट्टापट्टा करून टेबलापाशीं बसली होती; व तिच्या समोरल्या खुर्चीवर बसलेला एक फाटक्या अंगाचा छचोर तरुण सिगारेट फुंकीत तिच्याशीं गप्पा छाटीत होता.

चंदननें त्या आडोशांत डोकावून पाहिलें आणि येसूला आश्चर्यानें विचारलें—

" मोठी माय, हे कोण जोडपं बसलंय ग इथं ?—"

" अग, जोडपं नव्हे तें. ती नर्स आहे मुलांची काळजी घेण्यासाठीं ठेवलेली न् तो दवाई देणारा कंपाउंडर आहे. मुलांना सांभाळायला, औषध द्यायला, त्यांच्या आयांना मदत करायला मुद्दाम ठेवलंय त्यांना इथं—"

" पण ते तर गोष्टी करून राह्यले आहेत—"

" हं—"

येसू एक उसासा टाकून उद्गारली.

साडे अकराचा पोंगा होतांच रखमा धांवतच तिथें आली. चंदनला पहातांच तिला परमावधीचा आनंद झाला; व सासू जवळ उभी आहे याचें भान न राहून तिनें चंदनला एकदम उचलून पोटाशीं धरलें.

येसूनें शिदोरीचा डबा उघडला; व त्यांतली भाकरी, ढेणसांची भाजी, भाजलेला कांदा, फोडणीची मिरची वगैरे वस्तु नीट काढून त्या सुनेच्या पुढें ठेवल्या.

" तूं सुद्धां चंदन, माझ्याबरोबर खा थोडंसं—"

भाजीला लावलेला भाकरीचा तुकडा तिच्यापुढें करीत रखमा म्हणाली.

" नाहीं माय, मी जेवलें आहे घरीं पोटभर—"

" पण इथं खा माझ्याबरोबर थोडंसं—"

आणि रखमानें भाजलेल्या कांद्याच्या गाभ्यांतली लुसलुशीत कळी तिच्या तोंडांत घातली.

" मी आल्यामुळं तूं कांहीं खात नाहींस आज, माय. सगळं मलाच देऊन राह्यली—"

" तुला पाहूनच पोट भरलं माझं, बेटा—"

रखमा पाण्याचा घोट घेत उद्गारली.

येसूला वाटलें, आपल्या डोळ्यांतून टिपें पडतात कीं काय? म्हणून ती मध्येंच उद्गारली—

" तूं बोलूं नकोस, सूनबाई ! बोलण्यांतच वेळ चाललाय तुझा. खाऊन घे पोट-भर आधीं--"

पण रखमाला चंदनशीं बोलण्यापुढें शिदोरी खाण्याचें सुचेना. चंदन नाना प्रका-रचे प्रश्न तिला विचारीत होती आणि ती सुचतील तस तशीं उत्तरें तिला देत होती.

" माय व, आम्हांला गिरण दाखव ना सगळी—"

" मग मी आतां कामावर नको जाऊं म्हणतेस?--"

" तसं नाहीं म्हणत मी. मोठी माय येईल बरोबर माझ्या. तूं फक्त परवानगी काढून दे आम्हांला— "

" तूं आतां माझ्याबरोबर आंत ये न् जेवढं दिसेल तेवढं पाहून जा आजच्या दिवस— "

रखमानें झटदिशीं हात धुतले; कनवटीचें सुपारीचें खांड काढून तोंडांत टाकलें आणि ती लगबगीनें आंत गेली.

तिच्या मागोमाग त्या दोघी आंत आल्या.

त्या खात्यांत शेकडों रहाट यंत्रानें चालले होते; व त्या प्रत्येक रहाटापाशीं उभ्या राहून बायका सुताचा गुंडाळा तयार करित होत्या. त्यांच्या डोक्यावर कापसाचे बारीक बारीक तंतु जमले होते. उन्हानें सर्व गिरण तापून गेली होती. त्यांतच, फरशीवर टाकलेल्या पाण्याच्या वाफा निघून, रहाटाशीं काम करणाऱ्या बायकांना घामाच्या धारा लागल्या होत्या. त्या पाण्यावरून जपून पाय टाकीत चंदननें रखमाला विचारलें—

" माय व, पाणी कसं सांडलंय इतकं इथं?—"

" पाणी सांडलेलं नाहीं हें. मुद्दामच टाकलंय, बेटा—"

" मुद्दाम? न् तें कशासाठीं?—"

" हवा दमट नसली, तर धागा तुटतो. म्हणून हवेंत ओलसरपणा आणण्या-साठीं फरशीवर पाणी टाकलंय मुद्दाम हें—"

" पण त्यामुळं उकडतंय् न् कससंच वाटतंय् ग—"

" म्हणून तर सांगत होतें तुला इथं येऊं नकोस म्हणून—"

येसूनें मध्येंच रागानें म्हटलें.

"पण मी जर आज इथें आलें नसतें, तर माय काल इतकी थकून का गेली होती हें कळलं नसत मला, मोठी माय—"

आणि ती पुन्हा रहाटापाशीं उभ्या असलेल्या रखमाला म्हणाली—

" माय ग, तूं उभी असतेस सारखी इथं ?—"

"हो—"

"असं सारखं उभं राह्यल्यानं पाय दुखत नाहींत तुझे ?—"

तिच्या त्या प्रश्नाला काय उत्तर द्यावें या विवंचनेंत रखमा असतां येसू रागानें म्हणाली—

" आतां तिला काम करूं देशील का चौकशा करीत बसशील ? चल, घरीं जाऊं या आतां आपण—"

आणि, चंदनला एक शब्दहि बोलण्याची संधि न देतां, येसू तिचा हात धरून चालावयाला लागली.

गिरणीच्या फाटकाबाहेर पडेपर्यंत चंदन कांहीं बोलली नाहीं. पण रस्त्यावर येतांच तिनें येसूला विचारलें—

" मोठी माय, तूं मायला गिरणींत कशाला ठेवलंस कामाला ?—"

" मग काय करूं ? इथं शहरांत शेतकाम थोडंच मिळणार आहे ?—"

" पण माझा बाबा गिरणीच्या पट्ट्यांत सांपडून मेला असं तूंच सांगत असतेस नेहमीं. मग जिथं माणसं अशा रीतीनं मरतात, तिथं का ठेवलीस तूं माझ्या मायला कामाला ?—"

येसू कांहीं बोलली नाहीं.

तिनें पदराच्या शेवानें आपले डोळे पुसले.

# हम पर दया करो ४

संध्याकाळीं पांचच्या सुमारास घंटेचा संथ गोड आवाज कानांवर येऊं लागला, म्हणजे त्या दिंडींतून आंत जाण्याचा विलक्षण मोह चंदनला पडत असे.

घंटेचे ठोके पडूं लागले, म्हणजे भोंवतालच्या त्या वस्तींतील अनेक स्त्री–पुरुष रोज त्या दिंडींतून आंत जातांना तिला दिसत आणि कांहीं वेळानें त्यांना परत येतांनाहि ती पहात असे. पण, घंटा कां वाजते, ती वाजल्याबरोबर माणसें आंत कां जातात आणि कांहीं वेळानें परत बाहेर कां येतात, याची मात्र तिला कांहींच कल्पना नव्हती.

येसूला एकदां तिनें विचारलें, तेव्हां ती इतकेंच म्हणाली, ''त्या कंगालखान्याच्या जागेंत इसाई लोकांचं देऊळ आहे, त्याची घंटा वाजते ती— ''

पण, त्या उत्तरानें चंदनची जिज्ञासा शमली नाहीं. रोज ती घंटा वाजूं लागली, म्हणजे तिला आंत जावेसें वाटे. पण जाण्याचा हिय्या मात्र होत नसे.

कारण, त्या दिंडींतून जेम तेम तीन फूट उंचीचा, फेंगड्या आंखूड पायांचा आणि दोन्ही डोळ्यांनीं फारसें दिसत नसलेला जो एक काळा, केसाळ भिकारी हातांतील कांब्यांच्या आधारानें खुरडत खुरडत बाहेर पडत असे किंवा रस्त्यावरील पुलाच्या कठड्यावर बसून विव्हळत असे, त्याची चंदनला फार भीति वाटे. धड वानर नव्हे, धड माणूस नव्हे किंवा धड पिशाचहि नव्हे, असा तो चमत्कारिक दिसणारा भिकारी, त्याच्या गळ्यांत लोंबणारें तें भिक्षापात्र, त्याचे ते बेढब बुडखे चवडे, अस्वली पंजे असलेले आखूड हात आणि विव्हळत भिक्षा मागण्याची त्याची ती तऱ्हा–तो रस्त्यांत दृष्टीस पडतांच चंदन भीतीनें घरांत धूम ठोकावयाची.

पण, त्या भीतीपेक्षांहि, त्या बंदिस्त आवारांत काय चाललें आहे, हें जाणण्याची तिची उत्सुकता जास्त प्रबळ होती. त्या आवाराच्या दिंडींतून जसे दिवसभर

नाना प्रकारचे कुश्चळ भिकारी बाहेर पडत असत, तशाच पांढरे सफेत झगे घातलेल्या काळ्या गोऱ्या मडमाहि जातां-येतांना दिसत असत. विशेषतः, बैलांचा टांगा आंत येण्यासाठीं किंवा बाहेर जाण्यासाठीं जेव्हां तो मोठा थोरला पत्र्याचा दरवाजा सताड उघडला जाई, आणि तीन चार काळ्या गोऱ्या मडमा हातांतल्या जपमाळेचे मणी ओढीत टांग्यांतील मडमांना निरोप देण्यासाठीं रस्त्यापर्यंत येत, तेव्हां चंदन मोठ्या कुतूहलानें दरवाजासमोर जाऊन उभी राही आणि आंतलें जें काय दृष्टीस पडेल तें मोठ्या उत्कंठेनें पहात असे. त्या मडमा, ते भिकारी, घंटेचा आवाज होतांच आंत जाणारे ते वस्तींतले लोक—त्या जुनाट भिंतींच्या आड दुनियेवेगळें वैचित्र्यपूर्ण जग असलें पाहिजे, अशी चंदनची भावना होऊन गेली होती.

दरवाजा सताड उघडलेला असला, म्हणजे तिला मोठें मनोहर दृश्य दिसत असे. त्या आवाराच्या मधोमध असलेली जुन्या पद्धतीची दुपाखी बंगली, उजव्या बाजूला ओझरती दिसणारी काळ्या पाषाणांची गुहा, पटांगणांतील हिरवळीवर डुलत डुलत सावली करणारे निंबाचे उंच उंच वृक्ष, लाल, पांढऱ्या फुलांच्या घोसांनीं बहरलेल्या चित्रांगाच्या दाट वेली आणि हिरव्यागार पटांगणाला गालिचाची शोभा आणणारे फुलझाडांचे ताटवे—तें दृश्य पाहिलें म्हणजे चंदनला सतीच्या बगीचाची आठवण होई.

उंटखान्याच्या त्या दरिद्री ओंगळ वस्तीत रहावयाला आल्यापासून चंदनचा जीव गुदमरल्यासारखा झाला होता. आजवर तिचें सगळें आयुष्य वर्धा नदीच्या कांठीं शेतांत किंवा बगीचांत उघड्या स्वच्छ हवेंत खेळण्यांत गेलें होतें. खडकांतून खळखळ वाहणारी पाण्याची धार, शेतांतलें सळसळ करणारें हिरवें गार पीक, फुलाफळांनीं बहरलेलीं टवटवीत झाडें, शेंपट्या उंच करून बागडणारीं गोजिरवाणीं वासरें आणि दिवसभर नाना प्रकारचे गोड आवाज काढणारे चित्रविचित्र पक्षी यांच्या सान्निध्यांत तिच्या मनाची आणि शरीराची वाढ झाली होती. अंजिराच्या घरीं रहात असतांना तिला आपल्या भोंवतालच्या परिस्थितींत झालेला विलक्षण फरक फारसा जाणवला नाहीं. त्या घरांतून दिसणारे ते काशीबाईच्या देवळाचे सुंदर घुमट, भोसल्यांच्या राजस्मशानांतल्या त्या टुमदार समाध्या, त्यांच्या भोंवतालच्या बागेंतले ते सुरूचे डौलदार वृक्ष-चंदनवाडीहून फारशा निराळ्या ठिकाणीं आपण आलों आहोंत, असें चंदनला कधींच वाटलें नाहीं मोठ्या मावशीच्या घरीं असतांना.

पण उंटखान्यांत रहावयाला आल्यावर भोंवतालची ती ओंगळ वस्ती, पुढला तो

ओबडधोबड रस्ता आणि मागला तो नदीचा घाणेरडा प्रवाह पाहून तिला कसेसेंच वाटलें. खारी आणि मैना यांचे खेळ दिवसभर पहाण्याची, त्यांचे गोड आवाज सकाळपासून संध्याकाळपर्यंत ऐकण्याची संवय झालेल्या तिच्या मनाला रस्त्यांत खेळणाऱ्या पोरांच्या अभद्र शिव्या आणि घरांत भांडणाऱ्या नवराबायकोंची किळस-वाणी कचकच पाहून उबगल्यासारखें झालें. तिला घरांत बसावेसें वाटेना आणि घरांतून बाहेर पडावेसेंहि वाटेना.

त्यामुळें मिशनचा तो मोठा थोरला दरवाजा उघडला, म्हणजे ती उत्सुकतेनें समोर येऊन उभी राही आणि आंतला हिरवागार बगीचा तिच्या दृष्टीस पडला, म्हणजे त्या हिरवळीवर आपण मनसोक्त जाऊन खेळावें अशी विलक्षण इच्छा तिला होई.

विशेषतः, संध्याकाळीं तिचें मन जेव्हां अबोध, उदास विचारांनीं भरून येई आणि तिला अगदीं एकटें एकटें वाटूं लागे, तेव्हां तो घंटेचा आवाज कानांवर पड-तांच तिच्या मनांत येई कीं, या आवाजाबरोबर वस्तींतील इतर अनेक माणसें जशीं आंत जातात, तसे जर आपण आंत गेलों तर काय होईल ?

घंटांचा आवाज तिला अत्यंत प्रिय होता. गोठ्यांतल्या गुरांच्या गळ्यांतल्या घंटांचा आवाज, बंडीला जोडलेल्या बैलांच्या गळ्यांतल्या घंटांचा आवाज, देवळांत आरतीच्या वेळीं वाजणाऱ्या घंटांचा आवाज—हृदयांतल्या सगळ्या कोमल, वत्सल आणि मंगल भावना आपल्या गोड निनादांनीं जागृत करित असत जणुं त्या घंटा. त्यामुळें मिशनमधील घंटेचा तो संथ आवाज कानांवर येऊं लागला, म्हणजे तिचें मन उंचबळून येई, ती घंटा जिथें वाजत आहे, तिथें आपण धांवत धांवत जावें, असें तिला वाटे.

ती तिच्या आईची कामावरून घरीं येण्याची वेळ असे; व म्हणून आपले केस आणि कपडे नीटनीटके करून ती त्या वेळीं घराच्या पायऱ्यांवर येऊन उभी रहात असे. पांचच्या पोंग्याबरोबर गिरणींतील बायका सुटत आणि त्याच वेळीं मिशनमधील घंटानादालाहि सुरवात होई. वातावरण हादरवून सोडणारा तो भेसूर कर्कश पोंगा आणि वातावरणांत मधुर कंप निर्माण करणारा तो सुरेल घंटानाद—चंदनच्या चिमु-कल्या हृदयांत सारखीच खळवळ उडत असे ते दोन्ही आवाज ऐकून.

तिच्या आईची जर ती घरीं येण्याची वेळ नसती, तर चंदन कदाचित् पहिल्याच दिवशीं त्या घंटेचा आवाज कानावर पडतांच आंत गेली असती. पण, कामावरून परत येणाऱ्या आईच्या प्रथम आपण दृष्टीस पडावें, तिला दारांतच हातपाय धुवा-

वयाला पाणी द्यावें आणि ती आंत तरटावर येऊन पडली म्हणजे तिच्या शिणलेल्या अंगावर हळुहळू रेलावें अशी जी उत्कट इच्छा चंदनला असे, तिच्यामुळेंच ती त्या आवारांत आजवर गेली नव्हती.

परंतु, त्या दिवशीं घंटा सुरू झाली, तेव्हां तो मोठा दरवाजा उघडलेला होता आणि त्यांतून बैलांचा टांगा बाहेर पडतांनाहि चंदननें पाहिला होता. दरवाजा उघडलेला दृष्टीस पडतांच ती समोर जाऊन उभी राहिली. आंतलें तें हिरवेंगार पटांगण, ते फुलझाडांचे ताटवे आणि त्या बहरलेल्या वेली—तें सगळें दृश्य बाहेरून दिसत होतें आणि घंटेचा आवाजहि सारखा कानांवर पडत होता.

चंदनच्या मनांत आलें, एकवार धांवत धांवत आंत जावें आणि सगळीकडून फिरून झटदिशीं परत यावें. आईला घरीं यावयाला अद्याप थोडा वेळ आहे. तेवढ्या वेळांत आपण सहज परत येऊं शकूं.

तो विचार मनांत आला आणि ती लगेच आंत गेली. आपल्याला कुणी अडवील, कुणी कदाचित् हटकील, अशी भीति तिला सारखी वाटत होती. म्हणून ती सगळी-कडे पहात थबकत थबकत एक एक पाऊल टाकीत होती. दरवाजाच्या दोहों बाजूंनीं ज्या ओवऱ्या होत्या, त्यांत बसलेले भिकारी तिच्या दृष्टीस पडले. पण, तिला कोणीहि अडवलें नाहीं किंवा कांहीं विचारलेंहि नाहीं.

ती पटांगणाच्या मधोमध आली आणि अगदीं विलक्षण देखावा तिच्या नजरेस पडला.

पटांगणाच्या उजव्या बाजूला असलेल्या छोटेखानी बगीचांत काळ्या दगडांची मोठी गुहा होती. रानगुलाबाचा हिरवा वेल त्या गुहेवर पसरलेला होता; व त्या वेलाच्या एका डहाळीवर आपले नाजूक अनवाणी पाय ठेवून कोणी देवता त्या गुहेंत उभी होती. त्या मूर्तीच्या पायांशीं रंगीबेरंगी मेणबत्या जळत होत्या आणि समोर जी मोकळी जागा होती, तींत बसलेले स्त्रीपुरुष हात जोडून आणि गुडघे टेकून प्रार्थना करीत होते.

चंदननें आजपर्यंत अनेक देवतांच्या मूर्ती पाहिल्या होत्या. पण ही मूर्ति त्या सर्व मूर्तींहून अगदीं निराळी होती. तिचा वेष हिंदी नव्हता किंवा देवतांच्या अंगावर नेहमीं असतात तशा प्रकारचीं कोणतीं आभरणेंहि तिच्या अंगावर नव्हतीं. पांढरा शुभ्र घोळदार झगा, खांद्यांवर रुळणारें शुभ्र शिरोवस्त्र आणि निळ्या रंगाचा सैल कटिबंध एवढींच वस्त्रें तिच्या अंगावर होतीं. तिनें दोन्ही हात जोडलेले होते

आणि त्या हातांतून जपमाळ खालीं पावलांपर्यंत लोंबत होती. त्या मूर्तीचें सगळें सौष्ठव तिच्या रेषांतून आणि वेषांतून व्यक्त होणाऱ्या मार्दवांत आणि अनघतेंत होतें.

चंदन त्या मूर्तीकडे पहात उभी राहली. त्या गुहेपुढे बसलेले अनाथ, अपंग, दुबळे रोगी स्त्री-पुरुष तोंडानें जें पुटपुटत होते, तें तिला समजत नव्हतें. पण उपासकानें प्रार्थनेचा पाठ म्हटल्यावर, ते सर्व स्त्री-पुरुष 'हम्पर दया करो' अशी जी करुणा एकमुखानें भाकीत, ती मात्र तिला ऐकूं येत होती.

त्या सर्व दृश्यांत जें गांभीर्य आणि कारुण्य ओतप्रोत भरलेलें होतें, तें जरी तिला कळलें नाहीं, तरी ती भारल्यासारखी होऊन त्या दयामय मूर्तीकडे आणि तिच्या-पुढें बसून करुणा भाकणाऱ्या त्या हीन दीन स्त्री-पुरुषांकडे एकाग्रतेनें पहात होती. प्रार्थनेच्या दर पाठागणिक अगदीं हळुवार, करुणपूर्ण आवाजांत उच्चारले जाणारे 'हम् पर दया करो' हे शब्द मात्र सारखे तिच्या कानांवर आदळत होते, तिच्या ध्यानमग्न मनाला धक्के देत होते.

तिनें अनेकदां रस्त्यावर पाहिलेले किती तरी भिकारी आणि भिकारणी तिथें बसलेल्या होत्या. आंधळे, पांगळे, लंगडे, महारोगी आणि महार, गोंड, राऊत, ढीवर वगैरे नाना प्रकारचे आणि नाना जातींचे भिकारी त्या जमावांत होते. जणुं कांहीं, हिंदु समाजांत ज्याला आसरा नाहीं आणि निवारा नाहीं असें हिंदु धर्मातलें सगळें दैन्य आणि पंगुत्व तिथें एकवटून त्या गुहेंतल्या देवतेला आळवीत होतें-" हम् पर दया करो— "

चंदनचे पाय त्या जागेवर, डोळे त्या मूर्तिवर आणि कान त्या करुण वाणीवर खिळल्यासारखे झाले होते. आपली आई आतां इतक्यांत घरीं येईल आणि आपण त्या वेळीं नेहमींप्रमाणें दारांत तिच्या दृष्टीस पडणार नाहीं, याचें भान कांहीं तिला उरलें नव्हतें. आपल्या अंजलींत माळ घेऊन मानव जातीकडे दयार्द्र दृष्टीनें पहाणाऱ्या त्या मूर्तिवर तिचा सर्व जीवभाव गुंतून गेला होता. त्या मूर्तिशिवाय तिला कांहींहि दिसत नव्हतें, त्या करुण हांकेशिवाय तिला कांहींहि ऐकूं येत नव्हतें.

ती तिची ध्यानसमाधि कदाचित् लवकर उतरली नसती. पण, त्या संमूढ स्थितींत ती उभी असतांना अत्यंत ममतेनें उच्चारलेले पुढील मराठी शब्द तिच्या कानांवर पडले.

"बेटा, तूं कोण ? तुझं नांव काय ? इथं कुठून आलीस ?— "

त्याबरोबर चंदन दचकून मागें वळली आणि आपल्याला ते प्रश्न विचारून आपल्या पाठीवर मायेनें हात ठेवणाऱ्या त्या स्त्रीकडे तिनें पाहिलें.

त्या स्त्रीला तिनें अनेकदा बैलांच्या टांग्यांतून जातां येतांना पाहिलें होतें. तो पांढरा शुभ्र झगा, डोक्यावरली ती काळी शेपटेदार टोपी, छातीवर रुळणारा तो चांदीचा क्रॉस, हातांतली ती जपमाळ, सुरकुत्या पडलेल्या चेहऱ्यावरलें तें प्रेमळ हास्य आणि वात्सल्यानें ओथंबलेले ते प्रसन्न डोळे!—चंदनच्या मनांत आलें, आपण किती तरी वेळा पाहिलेली आहे ही काळी मडुम टांग्यांतून जातांना.

" भिऊं नकोस, बाळ. तूं कुठं रहातेस? कुणाबरोबर येथें आलीस?—"

त्या मडमेनें पुन्हा विचारलें आणि तिला जवळ घेतली.

" माझं नांव चंदन. मी इथंच रहातें या भिंतीसमोरल्या घरांत—"

" तुला कोणी आणलं इथं?—"

" मी एकटीच आपणहोऊन आलें. घंटा वाजत होती. बाहेरले लोक आंत येत होते. मीहि आलें त्यांच्या मागोमाग—"

" तुझे वडील काय करतात?— "

" वडील नाहींत मला— "

" माय काय करते तुझी?— "

" ती नागपूर मिलमध्यें कामाला जाते— "

" आणि तूं एकटीच असतेस दिवसभर घरीं! —"

" नाही. माझी मोठी माय न् मी असतों— "

" मग शाळेंत का नाहीं येत तूं आमच्या?— "

" कुठं आहे शाळा तुमची?— "

" ती. त्या भिंतीच्या टोंकाला जें घर दिसतं ना, ती शाळा आमची. उद्यां रविवार आहे. तूं येशील परवांपासून शाळेंत आमच्या!"

" मोठ्या मायला विचारून सांगेन— "

" मी भेटेन तुझ्या मायला उद्यां न् सांगेन तुला आमच्या शाळेंत घालायला—"

तिच्या त्या प्रेमळ वर्तनानें धीर येऊन चदननें विचारलें—

" ही कोणत्या देवीची मूर्ति आहे?— "

" मरिया माउलीची— "

" मरिया माउली! ही कोणती देवी?— "

" तिची कथा सांगितली नाहीं तुला इथं कोणी ? बर्नादेत नांवाची एक गरीब चक्कीवाल्याची मुलगी होती. तुझ्याहून थोडीशी मोठी. ती आपल्या धाकट्या बहिणी-बरोबर सर्पण आणायला रानांत गेली असतां तिथल्या डोंगराच्या गुहेंत ही देवी प्रकट झाली तिच्यापुढं—"

" म्हणजे गरीब मुलींची देवी आहे ही ?-- "

" हो. ही जगांतल्या सगळ्या दीनांची, दुबळ्यांची माउली आहे. हिचा मुलगा प्रभु येशू हा दीनांचा, दुबळ्यांचा न् पतितांचा उद्धार व्हावा म्हणून स्वतः सुळावर गेला. त्याला तुझ्यासारखीं लेकरं फार प्रिय होतीं, बेटा-- "

ती आणखी कांहीं चंदनला सांगणार, तोंच प्रार्थना करित असलेल्या त्या जमावंतली एक वेडसर मुलगी तिच्याजवळ आली आणि तिला बिलगून म्हणाली—

" अम्माजी, अम्माजी, मला भूक लागली—"

तिनें त्या मुलीच्या पाठीवरून हात फिरवून म्हटलें—

" थोडी थांबून जा, बाई. आतां मरिया माऊलीची प्रार्थना संपली, म्हणजे जेवायचं हां-- "

ती मुलगी लगेच धांवत धांवत प्रार्थनेच्या जागीं परत गेली.

" ही कोण मुलगी आहे ?-- "

चंदननें तिच्याकडे पहात विचारलें.

" ही आमचीच मुलगी आहे. आम्ही वाढवलेली-- "

" हिला आईबाप नाहींत ?-- "

" तिच्या आईनं तिला उपजल्याबरोबर आमच्या ओटींत घातली. आतां आमचीच आहे ती— "

" तुम्ही सांभाळतां या भिकाऱ्यांना ?— "

" नाहीं. देव सांभाळतो. आम्ही फक्त काळजी घेतों त्यांची— "

" तुम्ही कां काळजी घेतां ?— "

चंदनचा तो भाबडा प्रश्न ऐकून ती हंसली आणि आपले खांदे किंचित् हलवून म्हणाली–

" कुणी तरी काळजी नको घ्यायला गरिबांची ? तीं झालीं तरी देवाचींच माणसं आहेत ना ? समाजाला त्यांच्याकडे लक्ष द्यायला वेळ नाहीं. म्हणून आम्ही काळजी घेतों त्यांची— "

तिचें तें बोलणें चंदनला नीटसें समजलें नाहीं. म्हणून ती आणखी कांहीं तिला विचारणार, तों समोरून आपली आजी येत असलेली तिच्या दृष्टीस पडली.

" हीच माझी मोठी माय—- "

चंदननें तिला म्हटलें. तोंच येसू गडबडीनें तिथें आली आणि चंदनला जवळ घेऊन उद्गारली—

" कशी आली बाई येथं तूं ! तुला सगळीकडे शोधून दमलें. तुझी माय घाबरून गेली आहे अगदीं. चल आधीं घरीं— "

आणि येसू चंदनला घेऊन चालावयाला लागणार, तोंच त्या काळ्या मडमेनें येसूला विचारलें—

" तुम्ही कुठं राहातां, बाई ?—"

" इथंच रहातों समोरल्या घरांत— "

" मग या आपल्या नातीला शाळेंत का नाहीं घालीत तुम्ही आमच्या ?— "

" कुठंशी आहे शाळा तुमची ?— "

" त्या शेवटल्या इमारतींत. तुमची नात मोठी चौकस न् चुणचुणीत आहे. तुम्ही तिला शिकवलीत, तर नांव काढील ती— "

येसूला आपल्या नातीची ती तारीफ ऐकून अंगावर मूठभर मांस चढल्यासारखें वाटलें. पण ती एक उसासा टाकून उद्गारली—

" पण मायबाई, हिला शिकवायचं म्हणजे पैसा नाहीं का लागणार ? आम्हां गरिबांना तर पोटापुरतं मिळवतां मिळवतांच मुष्किल होते— "

" नाहीं बाई, तुम्ही जर हिला आमच्या शाळेंत घालाल, तर एक पैचाहि खर्च येणार नाहीं तुम्हांला. हिच्या पुस्तकांची सुद्धां व्यवस्था करूं आम्ही. आज शनिवार आहे. परवां घेऊन या तुम्ही हिला आमच्या शाळेंत— "

" केव्हां आणूं ?—"

" बरोबर दहाला आणा. मी असेनच तिथं—"

हें ती येसूला सांगत आहे, तोंच एक गोरी मडम तिथें आली आणि त्या दोघींना पाहून तिनें हिंदींत विचारलें—

" लूर्ड्स माउलीची प्रार्थना पाहयला आल्या होत्या का या ?—"

" हो, ही मुलगी आली होती. आणि हिच्या शोधाला म्हणून हिची आजी आली मागाहून—"

त्याबरोबर त्या म्हाताऱ्या गोऱ्या मडमेनें येसूकडे बघून हिंदींत म्हटलें--

" आमच्या लूईस माऊलीची प्रार्थना केली, म्हणजे ती सगळ्या कामना पूर्ण करते भक्तांच्या--"

" आमच्या अंबाबाईसारखीच आहे तुमची माउली ही--"

येसू त्या मूर्तिकडे पहात हात जोडून म्हणाली.

" हो. तुमच्या अंबाबाईला जशी तुम्ही जगाची माउली समजतां, तशी ही खरीखुरी जगाची माउली आहे सगळ्या. पुष्कळ हिंदु लोक हिच्या दर्शनाला येतात न् नवसहि बोलतात या माउलीला-- "

तिनें हातांतल्या माळेचे मणी ओढीत हंसून म्हटलें; व ती त्या दुसऱ्या काळ्या मडमेला उद्देशून चंदनकडे पहात फ्रेंच भाषेंत कांहींतरी बोलली.

चंदन त्या दोन्ही मडमांकडे टकमकां पहात होती. त्यांचे पोषाख अगदीं सारखेच होते. फक्त कातडीच्या रंगांत काय तो फरक होता. त्या काळ्या मडमेपेक्षांहि गोरी मडम जास्त उतार दिसत होती. बारीक बारीक आंठया पडलेलें तिचें गोरेपान उंच कपाळ सागाच्या पांढऱ्या पडून विरलेल्या पानासारखें दिसत होतें; व तिचा एक दांत पडलेला असल्यामुळें बोलण्यांतहि थोडा फरक वाटे. बोलतांना हिंदी शब्द चटकन् न सुचल्यामुळें ती जेव्हां डोळे आणि कपाळ किंचित् आकसून हात-वाऱ्यानें आपल्या मनांतला आशय व्यक्त करी, तेव्हां तिचें मुरकुतलेलें, टकटकीत गोरे गोरें तोंड मोठें मजेदार दिसत असे. तिच्या निळ्या डोळ्यांत ओथंबलेलें वात्सल्य आणि लाल ओंठांवर उमललेलें स्मित यांनीं चंदन मोहित होऊन गेली. पण तिच्याकडे पाहतांना तिला एक प्रकारचा भीतियुक्त संकोच वाटत होता.

तोंच तिनें चंदनची हनुवटी धरून तिचें तोंड वर उचललें आणि तिच्या कपा-ळाचें भांगाजवळ चुंबन घेऊन ती हिंदीत म्हणाली—

" तूं जरूर शाळेंत ये परवांपासून बेटा आमच्या— "

आणि लगेच तिनें येसूकडे वळून म्हटलें—

" तुम्ही कांहीं काळजी करूं नका, बाई. आम्ही करूं हिच्या शिक्षणाची व्यवस्था— "

नंतर चंदनच्या डोक्यावर तिनें हात ठेवला आणि ती म्हणाली—

" परमेश्वर तुझें कल्याण करो, बाळ. आज रात्रीं प्रार्थनेच्या वेळीं मी जरूर आठवण करीन तुझी— "

आणि हातांतल्या माळेचे मणी ओढीत ती झपाट्यानें बंगलींत गेली. तिला चालतांना थोडा त्रास होत होता. तरीहि तिच्या चालण्यांत जी विलक्षण तडफ होती, तिचें चंदनला आश्चर्य वाटलें.

ती गेल्यावर ती दुसरी मडम येसूला म्हणाली—

" मग घेऊन या हं परवां हिला दहा वाजतां शाळेंत. जा बाळ आतां. देव तुझं भलं करो— "

" आपले फार उपकार झाले, मेमसाहेब— "

येसूनें अदबीनें म्हटलें.

त्याबरोबर ती जावयाला निघालेली मडम चटकन् येसूच्या जवळ आली आणि तिच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाली—

" बाई, तुम्ही मेमसाहेब म्हणूं नका पुन्हा आम्हांला. आम्ही मेमसाहेब नाहीं. आम्ही भगिनी आहोंत तुमच्या, सगळ्या दुनियेच्या. आम्ही प्रभूच्या सेविका आहोंत. त्याचं दयाधर्माचं काम आम्ही करितों. आमच्या मठाला ' सिस्टर्स ऑफ चॅरिटी ' म्हणतात इंग्रजींत. आपल्या मराठींत त्याचा अर्थ 'दयेच्या भगिनी' असा होतो. मी बहीण आहें एक तुमची, बाई. म्हणून उपकारहि मानायचे कारण नाहींत तुम्ही माझे— "

तिच्या त्या कळकळीच्या बोलण्याला काय उत्तर द्यावें, हें येसूला समजेना. पण, कांहीं तरी बोललें पाहिजे या जाणिवेनें ती म्हणाली—

" आपण फार वर्सं काम करितां आहांत का हें ?— "

" हो. वयाच्या विसाव्या वर्षीं मी या मठांत आलें. माझीं तीस वर्षें तर या नागपूर शहरांतच गेलीं आहेत. बरं, जातें आतां हं मी. मग परवां नक्की घेऊन या आपल्या नातीला— "

आणि ती लगेच चालावयाला लागली.

दिंडींतून बाहेर आल्यावर चंदननें येसूला विचारलें—

" मोठी माय, मडमांत सुद्धां काळ्या मडमा असतात काग ?— "

" हो. विलायतेहून येतात त्या गोऱ्या मडमा आणि या देशांत त्यांच्या हाताखालीं शिकून त्यांच्यासारख्या बनतात त्या काळ्या मडमा— "

" मग मला सुद्धां मडम बनवतील त्या नाहीं का ?— "

" छे ! तूं काय त्यांच्याकडे रहाणार आहेस थोडीच ? ज्या त्यांच्याकडे राहतात, त्यांचा देवधर्म पत्करतात, त्या होतात त्यांच्या सारख्या— "

चंदनला त्या बोलण्याचा अर्थ नीटसा कळला नाहीं. ती फक्त येवढेंच म्हणाली–

" मला त्यांच्या बंगल्यांत रहायला फार आवडेल, मोठी माय— "

त्या दोघी घरीं गेल्याबरोबर तरटावर लोळत पडलेल्या रखमानें चटकन् उठून चंदनला आपल्या जवळ घेतलें आणि तिच्या तोंडावरून हात फिरवून विचारलें—

" कुठं गेली होतीस बाई, तूं आज मोठ्या मायला सांगितल्याशिवाय ?— "

" मी त्या मडमांच्या बंगल्यांत गेलें होतें— "

" मग त्या रागावल्या नाहींत तुला ?— "

" नाहीं. त्या उलट मला आपल्या शाळेंत घेणार आहेत सोमवारपासून— "

" पण त्या इसाई तर नाहीं ना करणार हिला ?— "

तिचें तें उत्तर ऐकतांच रखमानें एकदम सासूकडे पाहून विचारलें.

" छे ग ! वस्तींतल्या इतक्या मुली जातात शाळेंत. त्या कुठं इसाई झाल्या आहेत ?— "

" असं कसं म्हणतां ? वस्तींत इतकीं इसाई माणसं आहेत, तीं तर यांनींच बाटवलेलीं असलीं पाहिजेत सगळीं— "

" अनाथ, अपंग न् महारमांग बाटतात अन्नाच्या लालचीनं. पण चंदन त्यांच्या शाळेंत गेली, तरी तिला कांहीं धोका नाहीं, सूनबाई— "

त्यांच्या त्या आपसांतल्या बोलण्याकडे चंदनचें लक्ष नव्हतें. ती रखमाला म्हणाली—

" माय व, त्यांची मरिया माउली कीं नाहीं फार छान आहे न् नवसाला पावते म्हणे. तूं येशील का तिच्या दर्शनाला उद्यां संध्याकाळीं ? तुला तर सुटीच आहे उद्यां— "

तिचा तो प्रश्न ऐकून रखमानें पुन्हा येसूच्या तोंडाकडे पाहिलें. तेव्हां ती सुनेला म्हणाली—

" त्या मडमांचा फार लोभ जडलाय् हिच्यावर न् हिच्या शिक्षणाचा सगळा खर्च करूं म्हणतात त्या— "

" पण त्यांनीं उद्यां हिला बाटवली तर ?— "

" माय, बाटवतात म्हणजे काय करतात ग ?— "

" गप बस पोरी ! लागली चौकशा करायला. आपण नीट नजर ठेवली म्हणजे कांहीं नाहीं होणार, सूनबाई ! मी परवां दहा वाजतां घेऊन जाईन हिला त्यांच्या शाळेंत— "

रखमा कांहीं बोलली नाहीं.

पण त्या दिवशीं रात्रीं त्या दोघी जेवणानंतर अंगणांत खाटा टाकून बोलत बसल्या असतां येसूच्या खाटेवर निजलेली चंदन झोपेंत एकदम चाळवली आणि निजल्याच निजल्या हात जोडून उद्गारली—

" हम् पर दया करो ! हम् पर दया करो !— "

" हें काय भलतंच बडबडते आहे ही पोरगी आज ! "

रखमानें घाबरून जाऊन विचारलें.

येसू चंदनला थोपटीत होती. ती सुनेच्या नजरेला नजर न देतां म्हणाली—

" ती प्रार्थना आहे तिनं संध्याकाळी तिथं ऐकलेली— "

# शाळेंत मिळालेली मैत्रीण ५

सोमवारीं सकाळीं दहाच्या सुमारास येसू चंदनला घेऊन शाळेंत गेली.

शनिवारीं त्यांना भेटलेली ती काळी सिस्टर दारांत उभी राहून आपल्या भोंवतीं जमलेल्या मुलांमुलींशीं हसत मुखानें बोलत होती. पांढऱ्या सफेत कोंबडीभोंवतीं जसा पिलांचा घोळका किलबिल करीत असावा, तसा तो मुलामुलींचा जमाव वाटला तिला; व त्यांच्यांत मिसळण्यासाठीं तिचें बालहृदय उचंबळून आलें.

चंदनकडे पाहून त्या सिस्टरनें आपले दोन्ही हात पसरले आणि ती पुढें येऊन उद्गारली—

" छान, छान, ! वेळेवर आलीस तूं अगदीं. मला वाटलं, बाई विसरून जातील तुला इथं आणायचं—"

" तिच्या कुठं लक्षांत होतं ? पण मी सकाळीं उठल्यापासून सारखी पाठीला लागलें होतें तिच्या—"

चंदननें हर्षभरानें तिच्या त्या पसरलेल्या हातांत शिरून म्हटलें.

" पण आज आतां नांव सांगितलं पाहिजे हो तूं मला आपलं—"

तिनें चंदनच्या कपाळाचें चुंबन घेऊन म्हटलें.

" मी तर त्या दिवशींच सांगितलं तुम्हांला माझं नांव. पण तुम्हांला काय म्हणायचं हें मात्र माहीत नाहीं मला अजून— "

" माझं नांव जाणून घ्यायची इच्छा आहे तुझी ? माझं नांव सिस्टर लिथियाना. पण हीं सगळीं मुलं मला नुसतं 'अम्माजी' म्हणतात. तूं काय म्हणशील मला?—"

" मी नाहीं अम्माजी म्हणणार— "

" पण मी कुठं सांगतेय् तुला तूं मला ' अम्माजी ' म्हण असं ? तूंच ठरव तूं मला काय म्हणायचं तें— "

" मी ' मावशी ' म्हणेन तुम्हांला— "

" छान, छान ! चांगलं नातं जोडलं हिनं हें बाई ! पण फार मोठी जबाबदारी टाकली तूं या नात्यानं माझ्यावर. आपल्या मराठींत म्हण आहे—' माय मरो न् मावशी उरो ! ' मला आईपेक्षांहि जास्त काळजी घेतली पाहिजे तुझी नाहीं ?—"

सिस्टर ख्रिश्चियानानें हंसत हंसत विचारलें आणि ती येसूला म्हणाली—

" तुम्ही आंत या बाई. हिचं नांव मला दाखल करून घेतलं पाहिजे. हिची सगळी माहिती दिल्यावर मग जाऊं शकतां घरीं तुम्ही—"

सिस्टरच्या मागोमाग त्या दोघी आंत गेल्या. त्या टुमदार इमारतींत चार मोठ्या खोल्या होत्या; व शिवाय दोन्ही बाजूंना प्रशस्त छपरी काढलेली होती. अगदीं बिगारींतल्या मुलामुलींचा वर्ग मागल्या छपरींत होता; व बाकीचे तीन वर्ग तीन खोल्यांतून होते. चवथ्या खोलींत शिक्षिकांची बसण्या-उठण्याची जागा होती; व तिच्यांतच मध्यें नक्षीदार जाळीचा शिसवी पडदा ठेवून सिस्टरची बसण्याची स्वतंत्र व्यवस्था केलेली होती. छपरीच्या समोर जें छोटें क्रीडांगण होतें, त्यांत मुलांसाठीं झोला व इतर खेळण्याच्या सोयी केलेल्या होत्या. या अंगणांतील निंबाच्या झाडाखालीं रोज आळीपाळीनें मुलांना जमवून मधल्या सुटीनंतर गोरी सिस्टर ख्रिस्ताच्या चरित्रांतील गोष्टी सांगत असे.

चंदन आंत आल्याबरोबर सिस्टरच्या खुर्चीमागें बैठकीवर उभा केलेला ख्रिस्ताचा सुंदर पुतळा तिच्या दृष्टीस पडला. त्या पुतळ्याचे दोन्ही हात पसरलेले असल्यामुळें तो जणुं कांहीं मुलांना आशीर्वाद देत आहे, असा भास होत असे. एका कोपऱ्यांत मॅडोनाचा आणि दुसऱ्या कोपऱ्यांत सेंट अँथनीचा पुतळा होता. कडेवर मूल घेतलेला तो मरियाचा पुतळा पाहून चंदनला गंमत वाटली आणि तिनें सिस्टरला विचारलें—

" हा कुणाचा पुतळा आहे, मावशी ?— "

" ओळख पाहूं ! परवां तूं जिचं दर्शन घेतलंस ना तीच आहे ही— "

" मरिया माउली ? आणि मग हें मूल कुठलं तिच्या कडेवर ?—"

" तो बाळ येशू आहे. तो प्रभुसुद्धां लहान मूल होता तुझ्यासारखाच एका काळीं— "

" त्या खोलींत आणखी चार मध्यम वयाच्या स्त्रिया बोलत बसल्या होत्या. सिस्टर आंत येतांच त्या उठून उभ्या राहिल्या; व ती आपल्या टेबलाजवळ गेल्यावर त्या पुन्हा आपसांत बोलूं लागल्या. त्या चौघी स्त्रिया काळ्या होत्या. पण, त्यांच्या कपाळीं जरी कुंकू नव्हतें, तरी हातांत बांगड्या होत्या; व त्या गोल साड्या नेसलेल्या होत्या. अशा रीतीनें रंग सोडल्यास सिस्टरपेक्षां त्या सर्वच बाबतींत निराळ्या असल्यामुळें चंदननें त्या मडमा नाहींत असें आपल्या मनाशीं ठरवून टाकलें.

सिस्टरनें तिचें संपूर्ण नांव, जन्मतारीख, जात वगैरे माहिती लिहून घेतली आणि नंतर ती येसूला म्हणाली—

" आतां ही संध्याकाळीं चारच्या सुमारास घरीं येईल— "

" मधली सुटी नाहीं का शाळेला ?— "

" आहे ना. त्या वेळीं तिला वाटलं, तर ती येईल घरीं— "

" बरं, मी जातें आतां. लक्ष ठेवा मात्र आपण जरा तिच्यावर. भारी ढालगज आहे ती— "

येसूनें चंदनकडे पहात कौतुकानें म्हटलें.

सिस्टर नुसती हंसली.

तोंच शाळेची घंटा झाली.

त्याबरोबर सिस्टरनें गुडघे टेकले, तिच्या खोलींतील त्या चौघी शिक्षिकांनीं गुडघे टेकले आणि त्यांचें पाहून चंदननेंहि गुडघे टेकले; व तत्क्षणींच त्या शाळेंतून

आवे, आवे, आवे मरिया ॥
निर्दोषी कुमारी, देवाचे माते ।
तुझ्या ह्या लेंकरांस टाकूं नको गे ॥
आवे, आवे, आवे, मरिया ॥

या इंग्रजी चालीवरील मराठी प्रार्थनागीताचे सूर किनऱ्या कंपयुक्त आवाजांत उठले.

सुमारें सात आठ मिनिटें ती प्रार्थना झाल्यावर सिस्टरनें क्रुसाची खूण केली आणि मग ती चंदनला म्हणाली—

" आतां शाळेचें काम सुरू झालं बरं का—"

" पण आत्तां आपण गुडघे टेकून कसलं गाणं म्हटलं हें ?—"

" ती प्रार्थना आहे मरिया माउलीची. रोज प्रार्थनेनं सुरवात होते शाळेच्या कामाला —"

" आमच्या चंदनवाडींतल्या शाळेंतहि आम्ही " आनंदकंद ऐसा ! हा हिंद देश माझा " हें राष्ट्रगीत म्हणत असूं प्रथम—"

चंदननें आपला स्वतःचा अनुभव सिस्टरला सांगितला. त्यावर ती म्हणाली—

" देवाच्या प्रार्थनेनं कामाला आरंभ केला म्हणजे तें तडीस जातं नीट म्हणून त्याची करुणा भाकायची प्रथम— "

चंदन कांहीं बोलली नाहीं. थोड्या वेळानें तिनें विचारलें—

" मग आतां बसूं कुठं मी ?—"

" सांगतें हं. आज तुझा पहिला दिवस आहे शाळेचा. मी एकदां तुला सगळी शाळा दाखवतें आणि मग सांगतें कुठं बसायचं तें— "

" तुम्ही नाहीं शिकवणार मला ?—"

" शिकवीन ना. तुला इतिहास न् मराठी मीच शिकवीन. शिवाय काल तूं जी मोठी सिस्टर पाह्यलीस ना, ती अंगणांतल्या झाडाखालीं बसून रोज गोष्टी सांगते दुपारीं प्रभूच्या— "

" त्यांना काय म्हणतां तुम्ही, मावशी ?—"

" मावशीला कधी अहो जाहो म्हणतात का चंदन ?—"

" नाहीं—"

" मग तूं मला अहो का म्हणतेस ?—"

चंदन कांहीं बोलली नाहीं. तिनें लाजून परकराचा शेव तोंडापाशीं नेला.

" त्या सिस्टर इथल्या मुख्य आहेत. त्यांचं नांव झेवियरा. इथले सगळे लोक त्यांना ' बडी अम्मा ' म्हणतात—"

" मग मी मोठी मावशी म्हणेन त्यांना—"

" छान, छान ! त्यांना फार आनंद वाटेल—"

सिस्टरच्या खोलीला लागूनच दुसरा वर्ग होता. त्या दोघी प्रथम त्या वर्गांत गेल्या. वर्ग नुकताच सुरू झाला होता. सिस्टर आंत जातांच सर्व मुली उठून उभ्या राहिल्या.

तिनें ' गुड मॉर्निंग ' म्हणून हंसतमुखानें एकवार सर्व वर्गाकडे पाहिलें आणि

मग पहिल्या बाकावर बसलेल्या एका थोराड, काळ्यासांवळ्या, तोंडावर माताचे वण असलेल्या पण नाकींडोळीं नीटस मुलीला उद्देशून ती म्हणाली—

" हिरा, तूं जरा वेळानं खोलींत ये माझ्या. थोडं काम आहे. बसा मुलींनों—"

आणि लगेच त्या दोघी बाहेर पडल्या.

सिस्टरनें चंदनला चारी वर्गांतून नेऊन सर्व शाळा दाखवली.

शाळेची इमारत जरी जुनी आणि लहानशीच होती, तरी ती आंतून मुलांना आकर्षक वाटेल अशा रीतीनें सजविलेली होती. पहिल्या वर्गाच्या खोलींत ख्रिस्ताच्या बाळपणाचे मनोहर देखावे भिंतीवर लावलेले होते; व बाकीच्या वर्गांतून त्याच्या पुढील आयुष्यांतील निरनिराळ्या प्रसंगांचीं चित्रें लावलेलीं होतीं. वर्गांतून आणि छपरींत मरीया, जोसेफ, अँथनी, झेवियर वगैरे व्यक्तींचे पुतळे ठेवलेले होते. त्या-बरोबरच फिरता रंगीत भूगोल, निरनिराळ्या जातीचे मानव आणि प्राणी यांचीं चित्रें, जगांतील उत्कृष्ट दृश्यांचीं छायाचित्रें वगैरे मुलांची जिज्ञासा वाढवनील अशा चित्रांची, चित्राक्षरांची आणि उपकरणांची सुबक मांडणी प्रत्येक वर्गांत केलेली होती. ती शाळा, तो वस्तुसंग्रह आणि तें क्रीडांगण पाहून चंदनच्या मनाला जो हर्ष झाला, तो चंदनवाडी सोडल्यापासून आतांपर्यंत कधींहि झाला नव्हता.

शाळा पाहून झाल्यावर क्रीडांगणाच्या मधोमध असलेल्या निंबाच्या मोठ्या थोरल्या झाडापाशीं सिस्टरनें तिला नेलें. तेथें दगडांच्या राशीवर सुळावर चढवलेल्या ख्रिस्ताचा पुतळा उभा केलेला होता. सिस्टरनें त्या पुतळ्यापाशीं गेल्याबरोबर गुडघे टेकले आणि ती कांहींतरी पुटपुटली.

" हा कसला पुतळा आहे, मावशी ?—"

तिच्या मागें उभ्या असलेल्या चंदननें विचारलें.

" आमच्या प्रभूचा—"

" मग तो असा खांबावर का लटकतो आहे ?—"

" जगाच्या तारणासाठीं प्रभू सुळावर गेला, त्याचं चित्र आहे हें—"

" देवाला सुळावर दिलं ? असं कसं होईल ? देवाला कोण सुळावर देईल ?—"

तिच्या त्या प्रश्नानें सिस्टर प्रथम घोटाळली. पण क्षणार्धेच. लगेच तिनें हंसून म्हटलें—

" देव किंवा त्याचा पुत्र हा जेव्हां लोकांच्या उद्धारासाठीं पृथ्वीवर अवतरतो

तेव्हां त्यालाहि माणसासारखं वागावं लागतं, माणसासारखीं संकटं भोगावीं लागतात. रामानें चवदा वर्षं वनवास भोगला हें माहित आहे ना तुला ?—"

" हो— "

" तसाच जगाच्या कल्याणासाठीं प्रभु सुळावर गेला आमचा—"

चंदन कांहीं बोलली नाहीं.

क्रीडांगणांतून त्या परत सिस्टरच्या खोलींत आल्या. आंत आल्यावर तिनें आलमारी उघडून एक पाटी, लांब पेन्सील आणि दोन पुस्तकें काढलीं; व तीं टेबलावर ठेवून चंदनला म्हटलें—

" हीं तुझीं पुस्तकं. मग आवडली का तुला आमची शाळा ?—"

" हो—"

चंदननें लाजून उत्तर दिलें आणि विचारलें—

" पण मी बसूं कुठं आतां ?—"

" तूं शाळेंत जात होतीस का पूर्वी ?—"

" हो. आमच्या गांवांतल्या शाळेंत वर्षभर गेलेली आहे मी—"

" मग थांब जरा. हिरा आली म्हणजे सांगतें मी तुला कुठल्या वर्गांत बसायचं तें—"

तोंच उदी रंगाची गोल साडी नेसलेली हिरा आंत आली. तिला सिस्टरनें म्हटलें—

" हिरा, ही तुझी नवी मैत्रीण. हिचं नांव चंदन देशमुख. हिला तूं आपल्याच वर्गांत बसव सध्यं. हिचा अभ्यास झालेला नाहीं. पण तो मी करून घेईन रोज थोडथोडा. ही माझी चिठी तूं आपल्या वर्गावरल्या बाईंना दाखव. चंदन, तूं जा आतां हिच्या बरोबर. हिचं नांव हिरा कुसरे—"

चंदन टेबलावरलीं पाटी पुस्तकें उचलून हिराच्या मागोमाग बाहेर पडली. सिस्टरनें दिलेली चिठी हिरानें वर्गशिक्षिकेला दाखवली; व चंदनला आपल्याजवळ बसविलें.

दुपारीं एक पर्यंत त्यांचा वेळ वर्गांतील अभ्यासांत गेला. एक वाजतां मधली सुटी झाली, तेव्हां आपण उभ्या उभ्या घरीं जाऊन यावें असें चंदनच्या मनांत आलें आणि ती जावयाला निघणार तोंच हिरा तिला म्हणाली—

" कुठं निघालीस तूं ?— "

" घरीं जाऊन येतें. तूं नाहीं जात घरीं सुटींत ?— "

" माझं घर लांब आहे इथून शिरसपेठेंत— "

" मग मीहि नाहीं जात— "

" तूं ये ना जाऊन चटकन्. भूक लागली असेल तुला. तूं आल्यावर मग खेळूं आपण अंगणांत— "

" तुला नाहीं लागली भूक ?— "

" छे ! मला संवय आहे सकाळीं दहा पासून संध्याकाळीं चार पर्यंत इथं राह्यची— "

हिरानें हंसून म्हटलें. त्याबरोबर चंदन म्हणाली—

" मग मीहि नाहीं जात. कंटाळा आला जायचा— "

" बरं तर आपण त्या निंबाच्या झाडाखालीं बसूं या— "

हिरा म्हणाली आणि तिनें चंदनच्या गळ्यांत हात घालून तिला जवळ ओढलें.

इतक्यांत समोरून गोरी सिस्टर येत असलेली त्यांच्या दृष्टीस पडली.

त्याबरोबर चंदननें हिराचा आपल्या गळ्यांतला हात चटकन् बाजूला केला आणि तिला हळूच म्हटलें—

" इकडे नको. दुसरीकडे चल कुठं तरी. मला या गोऱ्या मडमेची की नाहीं भीति वाटते फार— "

" का ग, भिण्यासारखं काय आहे तिच्यांत ?— "

" अग, आमच्या गांवांत मालगुजाराकडे कोणी गोरा मेहमान आला, म्हणजे रस्त्यानं फिरकण्याची सोय नसे. वाटेल त्याला बिगारीला धरीत, वाटेल त्याची गाडी घेत. त्याची मोटार एकदां गांवांतून गेली, म्हणजे लोकांना मार्बत गेल्यासारखी वाटायची—"

" अग, पण हें नागपूर आहे, चंदन. तुझं खेडेगांव नव्हे गोऱ्या लोकांची इतकी भीति वाटायला. त्यांतून ही बडी अम्मा तर फारच प्रेमळ आहे अगदीं—"

" तुला कसं माहित ?—"

" हिनंच तर आणलं मला या शाळेंत—"

" तुझी कशी ओळख झाली हिच्याशीं ?— "

" ओळख अगदीं चमत्कारिक रीतीनं झाली. पावसाळ्याच्या आरंभीचे दिवस होते. माझा बाबा पटकीनं आजारी झाला एकाएकीं. संध्याकाळीं गिरणींतून

आल्यावर तासाभरानं जेवला न् तेव्हांपासून उलट्या व्हायला सुरवात झाली. अभि डॉक्टरला आणायला गेला— ”

“ अभि कोण ?— ”

“ माझा थोरला भाऊ अभिमन. डॉक्टरनं त्याला साफ सांगितलं मी तुमच्या-कडे येणार नाहीं म्हणून— ”

“ कां बरं ?— ”

“ अग, आम्ही महार आहोंत ना ?— ”

“ काय ? तूं महार ? खरोखरी महार आहेस तूं ? पण महारासारखी दिसत नाहींस, ग हिरा !—”

चंदननें एकदम तिच्यापासून दूर सरून आश्चर्यानें तिच्याकडे पहात म्हटलें.

“ महारासारखी दिसत नाहीं म्हणजे काय ग ? महार काय इतर माणसांपेक्षां निराळे असतात का ? त्यांना काय जनावरांप्रमाणं शेपटं असतात कीं भुतांप्रमाणं त्यांचे पाय उलटे असतात ? इतर माणसं आणि महार यांत काय फरक पाह्यला आहेस तूं ? तुमच्याप्रमाणंच महारांचं कातडं केव्हां गोरं, केव्हां काळं तर केव्हां सावळं असतं. तुमच्याप्रमाणेंच त्यालाहि लिहितां वाचतां येतं, तोहि कामधंदा करून पैसे कमावतो. मग त्याच्यांत न् इतर माणसांत काय फरक आहे ? महार झाला, तरी तो माणूसच नाहीं का ? तूं कांहीं ब्राह्मण नाहींस, चंदन. पण, आपल्या वर्गांत ज्या ब्राह्मणाच्या मुली आहेत, त्यांच्यापेक्षां कोणत्या दृष्टीनं कमी आहेस तूं ? तशीच मी महार असलें, अस्पृश्य असलें, तरी तुझ्यापेक्षां किंवा त्या ब्राह्मण मुलीं-पेक्षां कमी नाहीं कोणत्याहि बाबतींत. म्हणून तुला मी महार वाटत नाहीं, महारा-सारखी दिसत नाहीं असंच ना !— ”

हिराच्या त्या भडिमारानें बिचारी चंदन अगदीं गांगरून गेली. आपण काय बोलावें हें तिला सुचेना. तोंच हिरा हंसून म्हणाली—

“ तुलाच काय, पण कोणत्याच वरच्या जातींतल्या मुलीला मी महार आहें असं वाटत नाहीं— ”

“ बरं, पण डॉक्टरनं यायचं नाकारल्यावर काय केलंत तुम्ही ?— ”

“ आमच्या वस्तींत त्या वेळीं पटकीची साथ जोरांत होती. ही बडी अम्मा न् तुळशीबागेंत त्यांची दुसरी शाळा आहे त्यांतल्या दोन तीन मडमा आमच्या वस्तींत औषधपाणी द्यायला येत असत. माझ्या मायची ओळख होती या अम्माशीं.

बाबाचं जास्त होत चाललेलं पाहून ती धांवत इथं आली न् तिनं या अम्माचे पाय धरले. रात्रीची वेळ. पाऊस सारखा पडत होता. पण अम्मा ताबडतोब औषधांची पेटी घेऊन आली आणि अभीला तुळशीबागेंत पाठवून तिनं आणखी एका सिस्टरला बोलावून घेतलं. सारी रात्र त्यांनीं बाबाला उपाय केले. पहांटे असं वाटलं कीं, जातो आतां बाबा. तेव्हां अम्मानं घरांतल्या सगळ्या माणसांना बोलावलं न् हात जोडून त्याच्या पायाशीं बसवलं. ती स्वतः गुडघे टेकून कितीतरी वेळ प्रार्थना करीत होती. तिची प्रार्थना देवानं ऐकली न् उजाडण्याच्या सुमाराला डोळा लागला बाबाचा. तेव्हांपासून गेलीं चार वर्षं मी येतें आहे इथं—"

"पण मला कीं नाहीं भीति वाटते तिची—"

"छे ग, इथल्या प्रत्येक मुलीला ती हवीहवीशी वाटते. आतां सुटी संपल्यावर या झाडाखालीं जमतील सारीं मुलं न् ती मग गोष्ट सांगेल कसली तरी प्रभूची. ती गोष्टी फार छान सांगते, चंदन—"

पण चंदनला त्या विषयावर बोलण्याची इच्छा नव्हती. म्हणून तिनें मध्येंच विचारलें—

"तुझा बाबा गिरणींत कामाला जातो रोज ?—"

"हो—"

"न् माय काय करते ?—"

"मायहि गिरणींत कामाला जाते आणि मोठी माय घर सांभाळते—"

"मग माझ्याचसारखं आहे तुझं अगदीं. आमच्याकडे सुद्धां मोठी मायच घर सांभाळते. तूं येशील का जातां जातां आमच्याकडे आज ?—"

"आणि तुझ्या मोठ्या मायला नाहीं आवडलं म्हणजे मग ?—"

"न आवडायला काय झालं ?—"

"माझा विटाळ नाहीं का व्हायचा ?—"

"आणि मी घरीं गेल्यावर काय अंघोळ घालणार आहे आज मला मोठी माय ?—"

"शाळेंत कुणालाहि शिवलेलं, कुणाहि बरोबर बसलेलं चालतं. पण घरीं गेल्यावर मात्र विटाळ सुरू होतो. तुला अजून अनुभव नाहीं आलेला या गोष्टीचा, चंदन—"

" नाहीं ग, माझी मोठी माय तशी नाहीं. ती कांहीं म्हणायची नाहीं तुला. तूं ये आज शाळा सुटल्यावर थोडा वेळ घरीं आमच्या—"

" मी तुझ्या घरीं येईन, पण एकाच अटीवर—"

" कोणती अट ?—"

" तूंहि आलं पाहिजेस घरीं आमच्या—"

" येवढंच ना ? त्यांत काय कठीण आहे ग ?—"

" हो खरंच ! तुझ्या घरीं येणं मला जितकं कठीण आहे, तितकं कांहीं माझ्या घरीं येणं तुला कठीण नाहीं. तुझ्या घरांतून तुझी मोठी माय मला एकादे वेळीं बाहेर काढून देईल. पण माझ्या घरीं कांहीं तसा प्रकार व्हायची धास्ती नाहीं. उलट माझ्या मोठया मायला फार आनंद होईल तुला पाहून—"

" माझी मोठी माय कांहीं इतकी वाईट नाहीं, हिरा—"

" अग, हा वाईट किंवा चांगलं असण्याचा प्रश्न नाहीं, चंदन. आम्ही बोलून चालून महार. आमच्याशीं वाईट वागायचं ही रीतच आहे तुमच्या लोकांची. त्यांत आपण कांहीं वाईट करतों याची जाणीवच नसते मुळीं त्यांना—"

" पण माझी मोठी माय वाईट नाहीं वागणार तुझ्याशीं—"

इतक्यांत घंटा झाली. त्यावरोबर त्या दोघी धांवतच निंबाच्या झाडाजवळ ती गोरी सिस्टर बसली होती तिथें गेल्या. त्यांच्या वर्गांतल्या सगळ्या मुली तिच्या भोंवती अर्धचंद्राकार बसल्या होत्या. तिनें अगदीं सोप्या हिंदींत ख्रिस्ताच्या चरित्रांतल्या दोन तीन गोष्टी मुलींना सांगितल्या. तिचे चमत्कारिक हिंदी उच्चार ऐकून चंदनला गंमत वाटली. विशेषतः 'य' च्या ऐवजीं 'ग' 'ट' च्या ऐवजीं 'त' किंवा 'र' च्या ऐवजी 'ह' असे उच्चार जेव्हां ती करी, तेव्हां चंदनला हंसूं आवरत नसे. गेसू, पीतर, श्वग्गाचें हाज्य वगैरे तिचे हिंदी मराठी उच्चार इतर मुलींना जरी संवयीचे झाले होते, तरी चंदनला ते नवीनच होते. त्यामुळें, ती गोष्टी सांगत असतां मधला एकच दांत पडल्यामुळें तिच्या दंतावलींत दिसणारी खिंड, बोलतांना ती वारंवार हाताळीत असलेला गळ्यांतल्या क्रॉस आणि वाऱ्यानें उडणाऱ्या तिच्या टोपीच्या काळ्या शेपट्या यांच्याकडे जसें चंदनचें लक्ष जास्त होतें, तसेंच त्या गोष्टींच्या आशयापेक्षां सिस्टरच्या उच्चारांतील गमतींतच तिचें मन जास्त रमलें होतें.

गोष्टी सांगून झाल्यावर ती चंदनच्या जवळ आली आणि तिला म्हणाली—

" तुला आवडली का आमची शाळा ?— "

" हो— "

" मग येशील ना तूं रोज ?— "

" हो— "

" तुला पाटी पुस्तकं दिलीं का सिस्टरनं ?— "

" हो— "

" रात्रीं निजायच्या वेळीं आभार मान प्रभूचे. त्याच्या दयेनं हें सगळं मिळालं तुला— "

तिनें खालीं वांकून चंदनच्या कपाळाचें चुंबन घेतलें आणि आपल्या भोंवतीं किलबिल करणाऱ्या मुलांशीं एकाददुसरा शब्द हांसत हांसत बोलून ती बंगली-कडे गेली.

सायंकाळीं साडेतीन वाजतां शाळा सुटल्यावर चंदन सिस्टरकडे गेली आणि तिला म्हणाली—

" हीं पाटी पुस्तकं मी घरीं न्यायचीं का, मावशी ?— "

" हो. तीं तुझींच आहेत आतां. तूं घरीं चालली का ?— "

" हो— "

" मग परवांप्रमाणं संध्याकाळीं मरिया माउलीच्या प्रार्थनेला येशील का तूं आज ?— "

" चंदन कांहीं बोलली नाहीं.

त्यावर सिस्टर थोडा वेळ थांबली आणि हंसून म्हणाली—

" तुझ्या मनांत यायचं नसलं, तर नको येऊं. माझा आग्रह नाहीं तुला. हिरा, तूं जातां जातां हिला घरीं पोचवून दे हिच्या— "

शाळेच्या आवारांतून बाहेर पडून त्या रस्त्यावर आल्याबरोबर हिरा चंदनला म्हणाली—

" तूं मला आपल्या घरीं यायचा आग्रह करूं नकोस आज, चंदन— "

" का बरं ? माझ्या मोठ्या मायला आनंद होईल तुला पाहून. फारच झालं तर ती जात विचारील तुझी तुला. तूं सांगूं नकोस आपण महार असल्याचं म्हणजे झालं— "

" तसं नाहीं होणार, चंदन. स्वतःची जात लपवून कुणाच्याहि घरीं जायची इच्छा नाहीं माझी. त्यापेक्षां मला तुझ्याकडे मुळींच न येणं परवडेल— "

" बरं. तूं ये तर खरी. मग पाहूं या काय होतं तें— "

चंदनच्या घराजवळ आल्यावर पुन्हा हिरा घोटाळली. पण, चंदननें तिचा हात धरला आणि तिला ओढीत आंत नेली.

येसू चंदनला पहातांच पुढें आली आणि तिला जवळ घेऊन म्हणाली—

" ये बाई ! दुपारीं सुटी होती ना तुला ? मग का नाहीं आली घरीं ? भूक लागली असेल ना आतां ? आणि ही कोण ग ?— "

" ही माझी सखू आहे शाळेंतली माय— "

" एका दिवसांत सखू झाली का ही तुझी ? मोठी ढालगज आहेस तूं पोरी—"

येसूनें तिच्या गालावर चापट मारून कौतुकानें म्हटलें.

" आतां हातपाय धुवा आणि भाजी न् भाकर ठेवली आहे ती दोघीजणी खा थोडी थोडी. दुपारीं दहाला एकदां जेवलेल्या. भुकावल्या असाल आतां— "

दोघी मुलींनीं चटकन् हातपाय धुतले आणि त्या मधल्या खोलींत बसल्या. येसूनें त्यांच्यापुढें दोन पानांवर भाकर, भाजी आणि गुळाचा एक एक खडा ठेवला; व ती त्यांच्यासमोर तरटावर बसली.

" काय केलंस पोरी आज शाळेंत एवढा वेळ ? "

" सगळी शाळा पाहिली, सुटींत खेळ्लें, त्या गोऱ्या मडमेनें गोष्टी सांगितल्या त्या ऐकल्या न् शाळा सुटल्यावर घरीं आलें हिला घेऊन— "

चंदननें हांसत हांसत शाळेंतला कार्यक्रम सांगितला. त्याबरोबर येसूनें हिराकडे बघून विचारलें—

" नांव काय बाई तुझं ?— "

" हिरा कुसरे— "

" कुठं रहाते बेटा ?— "

" शिरस पेठेंत— "

" मायबाप काय करतात तुझे ?— "

" दोघेहि गिरणींत काम करतात— "

" मग घर कोण संभाळतो ?— "

" माझी मोठी माय— "

" तुलाहि मोठी माय आहे सांभाळायला ? म्हणूनच इतक्या लवकर तूं सख्र झालीस चंदनची, खरं ना ?— "

येसूनें हंसत हंसत म्हटलें. त्याबरोबर त्या दोघीहि एकमेकींकडे पाहून हंसल्या.

पण चंदनच्या पोटांत सारखी धाकधूक होत होती. तिला सारखें वाटत होतें कीं, आपली माय हिराला तिची जात विचारते कीं काय ? हिरा मुकाट्यानें खालीं मान घालून पाण्याच्या घोटाबरोबर एक एक घास पोटांत ढकलीत होती.

" हिचीहि माय गिरणींत कामाला जाते. हिनं सांगितलं ना तुला ?— "

" हो— "

" मग घेऊन ये तुझ्या मायला एक दिवस आमच्याकडे— "

येसूनें प्रेमानें म्हटलें आणि नंतर एकदम आठवल्यासारखें करून विचारलें—

" कोण जात आहेस बाई तूं ?— "

तो येसूचा प्रश्न ऐकतांच इतका वेळ खालच्या मानेनें तिच्या प्रश्नाला उत्तरें देत असलेल्या हिरानें एकदम वर पाहिलें आणि येसूच्या दृष्टीला दृष्ट भिडवून अगदीं संथपणानें म्हटलें—

" महार—"

" काय महार ? अन् तूं आलीस कशी मग घरांत ?— "

" मी नाहीं म्हटलं. पण ही ऐकेना. हिनं हट्टानं ओढीत आणलं मला—"

" कार्टे, घर बाटवलंस ना सारं—"

येसू एकदम संतापानें उठून चंदनला म्हणाली.

हिराहि आपलें उष्टें गोळा करून ताबडतोब भरल्या पानावरून उठली.

" बाहेर हो घरांतून आधीं त्या उष्ट्या पानासकट ! देशमुखाच्या घरांत महार जेवला होता का कधीं ?—"

येसूच्या तोंडून हा उद्गार निघतांच चंदन त्या दोघींच्या मध्यें आली आणि हातांत पान घेऊन उभ्या असलेल्या हिराला मिठी मारून रडत रडत म्हणाली—

" माय व, हिच्याबरोबर मलाहि काढून दे घरांतून. आज सारा दिवस मी हिच्याबरोबर होतें. आम्ही एकत्र बसलों, खेळलों न् म्हणून मी हिला घरीं घेऊन आलें. ही नको नको म्हणत असतां हिला हट्टानं मी आणली. तूं जर अशा रीतीनं हिला घालवून देणार असशील, तर मलाहि काढून दे घराबाहेर—"

" गप बैस पोरी ! तुला कांहीं समजत नाहीं यांतलं. उद्या जर लोकांना कळलं

ही आपल्या घरीं येऊन जेवल्याचं, तर जातींतलं कुणी उंबरठा चढणार नाहीं आपल्या घराचा—"

"पण मी आज दिवसभर होतें हिच्याबरोबर—"

"पण तें शाळेंतलं शाळेंत राह्यलं. ही घरीं आलेली कशी चालेल?—"

आणि येसू हिराकडे वळून अगदीं सौम्य आवाजांत म्हणाली—

"जा बाई, तूं घरीं जा आपल्या. हिला कांहीं कळत नाहीं अजून म्हणून हिनं आणली तुला बोलावून. पण पुन्हा येऊं नको कधीं आमच्या घरीं—"

हिरानें चटकन् आपलें दप्तर उचललें आणि एक शब्दहि न बोलतां ती जावयाला निघाली.

त्याबरोबर चंदननें पुन्हा तिचा हात धरून तिला म्हटलें—

"तूं जाऊं नकोस. तूं जात असशील, तर मीहि येतें तुझ्याबरोबर. मलाहि नाहीं राह्यचं या घरांत—"

"तुला वेड लागलं का पोरी? शाळेंत जाऊन हेंच शिकलीस का पहिल्या दिवशीं!—"

येसू रागानें चंदनला म्हणाली.

"नाहीं माय, मी जाऊं देणार नाहीं हिला अशा रीतीनं. तूं आपल्या हातानं माझ्या भाकरींतली अर्धी भाकर वाढलीस हिला आणि आतां भरल्या पानावरून घराबाहेर काढून देतेस? नाहीं माय, मी जाऊं देणार नाहीं हिला—"

चंदन रडत रडत म्हणाली.

तिचे ते शब्द येसूच्या हृदयाला भेदून गेले आणि आपण आतां काय बोलावें, हें तिला समजेना.

# दैवयोग

# ६

चंदन ज्या दिवशीं कॉन्व्हेंट हायस्कूलमध्यें दाखल झाली, तो दिवस येसूला अत्यंत भाग्याचा वाटला.

हिरा आणि चंदन या दोघींना घेऊन सिस्टर ख्रिश्चियाना जेव्हां बैलांच्या टांग्यांतून कॉन्व्हेंट हायस्कूलमध्यें जावयाला निघाली, तेव्हां येसू तिला म्हणाली—

" मी तुमच्याबरोबर आलें तर चालेल का, मावशी ? रोज पोरगी येवढ्या लांबच्या शाळेंत जाणार, तेव्हां ती शाळा एकदां पाहून ठेवलेली असली म्हणजे बरं— "

" या ना तुम्ही. कांहीं हरकत नाहीं यायला तुम्हांला. पण चंदन रोज लॉरींतून शाळेंत जाणार असल्यामुळं ती हरवण्याची मात्र भीति नाहीं मुळीच— "

सिस्टरनें हंसत हंसत म्हटलें. पण, येसूच्या चौकस स्वभावानुसार, आपण ज्या शाळेंत चंदनला पाठवीत आहोंत, ती शाळा एकदां नजरेखालून घालण्याची तिला इच्छा आहे, हें सिस्टरच्या लगेच लक्षांत आलें.

चंदनची आजी आणि आई यांच्यांतला फरक पाहून तिला नेहमीं नवल वाटे. वास्तविक रखमा ही त्या घरांतली मिळवती बायको असून, तिची कमाई हाच त्या कुटुंबाचा सर्व आधार होता. येसू मधून मधून गिरणींतील घड्या घालण्याच्या खात्यांत काम करीत असे. पण तिनें सतत अशी नोकरी कधींच केली नाहीं. उलट, रखमानें अंगावरलें काम घेऊन आणि त्या कामांत हुशारी दाखवून गिरणींत आपला जम उत्तम बसविला होता. दिसण्यांत सुरेख, रहाणींत नीटनेटकी, कामांत हुशार पण अगदीं अबोल अशा रखमाकडे गिरणींतील पगारदार गुंडांचे डोळे जरी हपापानें वळत, तरी तिच्या वाटेला जाण्याचा हिय्या मात्र कधीं कुणाला झाला नाहीं. तिचें सगळेंच वर्तन इतकें काटेकोर असे कीं, ती जरी बोलतांना हंसून गोड शब्दांनीं बोले,

तरी त्या गोडव्यांतहि दुसऱ्याला आपल्यापासून हातभर दूर ठेवण्याची हातोटी होती. त्यामुळें तिला सहसा कोणाचा उपद्रव होऊं शकला नाहीं.

गिरणींत ती ज्या काटेकोरपणानें वागे, तोच कांटेकोरपणा तिच्या घरगुती वर्तनांतहि होता. घरसंसारांत तिला कोणत्याच प्रकारचें लक्ष घालावें लागत नसे. पण तिला स्वतःला लिहायवाचायला येत असतांहि तिनें चंदनच्या शिक्षणाकडेसुद्धां कधीं लक्ष दिलें नाहीं. कामावरून आल्यावर तिला जवळ घेऊन तास अर्धातास लोळणें, रोज सकाळीं तिची वेणीफणी करणें, नव्या धर्तीचे कपडेलत्ते तिला शिवून देणें आणि एखादे वेळीं आपल्याबरोबर तिला बोलपटाला नेणें यापलिकडे चंदनचीहि काळजी ती घेत नसे. तिचा मिशनशीं असलेला निकट संबंध रखमाला कधींच फारसा रुचला नाहीं; व त्यासंबंधीं एखाद दुसरा प्रतिकूल शब्द ती मधून मधून सासूशीं बोले. पण, येसूची चंदनवर खरोखरीच सक्त नजर आहे अशी जेव्हां तिच्या मनाची खात्री पटली, तेव्हांपासून तिनें त्याहि बाबतीत मन घालण्याचें सोडून दिलें. पण, आपल्या मुलीवर या मडमांचा जो इतका लोभ आहे, तो कांहीं निर्हेतुक नसावा, एवढें मात्र तिला सारखें वाटे.

म्हणून चंदन जेव्हां एखाद वेळीं तिला म्हणे—

" माय, तूं चल ना एकदां मोठ्या मावशीला भेटायला—"

तेव्हां रखमा एकदम तिटकाऱ्यानें म्हणावयाची—

" नको पोरी ! मोठी माय तिथं जाते तेवढं पुरे आहे. आपल्यांतल्या गरीब-गुरीब लोकांना फसवायचा न् बाटवायचा कारखाना आहे तो. मला नाहीं तिथं जायची इच्छा—"

" पण माय, तूं कांहीं तरीच बोलतेस. तशी जर त्यांची इच्छा असती, तर मला न् हिराला नसत्या का त्या म्हणाल्या इसाई होण्याबद्दल ?—"

" तुम्हांला कशा म्हणतील त्या ? आम्ही आहोंत ना तुमच्या डोक्यांवर खबरदार ! त्यांना कळतं कुणाला कशा रीतीनं भुलीं पाडावं हें. हिराचीच माय मला सांगत होती एकदां कीं, तिचा बाबा पटकींतून उठल्यावर त्या गोऱ्या मडमेनें त्याला इथल्या देवळांत आणून प्रार्थना करवली त्याच्याकडून. त्याच वेळीं इसाई व्हायचा तो. पण हिराची मोठी माय पक्की भेटली त्यांना. ती म्हणाली कीं, राजाबक्षाच्या मारुतीला मी नवस केल्यामुळं तो उठला दुखण्यांतून—"

आपल्या आईचें हें अशा प्रकारचें बोलणें चंदनला रुचत नसे. आपली आई

किंवा हिराची आई या जेव्हां मिशनबद्दल किंवा त्यांतल्या मडमांबद्दल तिरस्कारानें बोलत, तेव्हां चंदनला त्यांचें तें बोलणें कृतघ्नपणाचें वाटे. पण हिरा मात्र नेहमीं त्या बाबतींत आपल्या आईची कड घेत असे. मग चंदन तिला रागारागानें म्हणावयाची—

"तुला खरोखरच लाज वाटली पाहिजे त्यांचे सगळे उपकार घेऊन पुन्हा त्यांच्याविषयीं अशा रीतीनं बोलायला— "

"अग, उपकार कसले आले आहेत त्यांत? मला सुद्धां पूर्वी वाटे या मोठ्या उपकारी न् प्रेमळ बायका आहेत म्हणून. पण अभि सांगतो त्यावरून माझी अशी खात्री होऊन गेली आहे अगदीं कीं, हे त्यांचे सगळे उपकार म्हणजे मायाजाळ आहे केवळ. तुला कल्पना नाहीं आपले किती लोक त्यांनीं लालूच दाखवून बाट-वले आहेत याची— "

"अग, पण त्यांत त्यांचा काय दोष? आपला हिंदु समाज ज्या लोकांना जना-वरांपेक्षांसुद्धां हीन समजतो, त्यांना जर या मिशनरींनीं ख्रिस्ती धर्मांत ओढलं, तर तो त्यांचा दोष कीं आपला दोष? उलट, ख्रिस्ती धर्मांत गेल्यामुळें त्या लोकांना माणसाची कळा येते हा फायदाच वाटतो मला एक— "

"तो भ्रम आहे तुझा निव्वळ! तुमच्या वस्तींत जे आमच्यांतले ख्रिस्ती झालेले लोक आहेत, त्यांना काय कळा आली आहे माणसाची? त्यांची दैना पहा तूं जरा. त्यांच्यांतल्या बायका सुद्धां इतर महारामांगांप्रमाणं रोज टोपल्या घेऊन अन्न मागा-यला जातात आणि शेण न् काटक्याकुटक्या गोळा करायसाठीं हिंडत असतात— "

"अभि बोलतो, त्याचं ऐकून तूं कांहींतरी बोलतेस झालं. आपला देश सोडून त्या बायका इथं इतक्या दूर येतात न् सारा जन्म महारमांगांच्या, भिकाऱ्यांच्या आणि रोग्यांच्या सेवेंत घालवतात, तसं कांहीं आहे का आपल्या धर्मांत? त्यांना नांवं ठेवायला काय लागतं?— "

चंदन जरी हिराला अशा तऱ्हेचें उत्तर देत असे, तरी तिच्या बोलण्यांत तथ्य आहे, याची तिला जाणीव होती. सिस्टर झेवियरा दिवसभर भिकाऱ्यांना आपल्यापाशीं आळीपाळीनें बसवून ख्रिस्ती धर्माचा जो उपदेश करीत असे किंवा आजारी भिकाऱ्यांना अगदीं मरणाच्या वेळीं जी ख्रिस्ती धर्माची दीक्षा पुष्कळदां दिली जात असे, ती पाहून चंदनला केव्हां केव्हां असें वाटे कीं, यांची ही दयाबुद्धि आणि ही दलितांची सेवा कांहीं निरपेक्ष नाहीं. पण तसें कोणी बोलून दाखवलेलें

मात्र तिला आवडत नसे. परंतु, लोकांच्या गरिबीचा फायदा घेऊन त्यांच्यांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याच्या त्या मडमांच्या लाघवी पद्धतीविषयीं रखमा मात्र नेहमीं अगदीं तिटकाऱ्यानें बोलत असे. विशेषतः 'पवित्र संभोजना'च्या ( Holy Sacrament ) उत्सवाच्या वेळीं चंदननें तिला मोठ्या आग्रहानें मिशनमध्यें तो उत्सव पाहावयाला नेली असतां, तिथें जो प्रकार तिच्या दृष्टीस पडला, त्यामुळें तिचें मन मिशनविषयीं अगदीं विटून गेलें.

त्या दिवशीं सकाळीं ती गिरणींत जाण्याच्या गडबडींत असतां, चंदन तिला म्हणाली—

" माय ग, आज ' होली सॅक्रॅमेंट ' पाह्यला येशील का तूं मिशनमध्यें ? दिवसभर उघडं ठेवणार आहेत लोकांना बघायला मिळावं म्हणून— "

" पण तूं हें काय म्हणतेस तें समजलं नाहीं मला. मराठींत सांग नीट—"

" प्रभु येशूनं सुळावर जाण्यापूर्वी आपल्या शिष्यांबरोबर शेवटलं जेवण केलं' त्याला ' पवित्र संभोजन ' म्हणतात ते लोक. त्याचा सण आहे आज न् दिवसभर प्रभूचा प्रसाद पाह्यला उघडा ठेवणार आहेत—"

" पण त्यांत पहाण्यासारखं काय आहे ? आपल्या गोपाळकाल्यासारखं कांहीं आहे का ? देवाला भोग चढवतात तसं कांहीं आहे का ?

" तूं एकदां येऊन पहा तर खरं. मावशीनं मुद्दाम तुला घेऊन यायला सांगितलंय, म्हणून तुला म्हणतें मी चल म्हणून—"

सायंकाळीं रखमा कामावरून परत आल्यावर चंदन तिला घेऊन मिशनमध्यें गेली.

बंगलींतील मधल्या प्रशस्त दिवाणखान्यांत तयार केलेल्या वेदीवर चक्राकार सोनेरी वर्तुळांत मधोमध ठेवलेलें प्रसादाचें काचपात्र आरशासारखें लखलखत होतें. तें चक्र आणि ती वेदी फुलांनीं सजविलेली होती; व त्याच्यासभोंवतीं पितळी ठाणवईंत बसविलेल्या मेणबत्या जळत होत्या. वेदीच्या खालच्या चबुऱ्यावरील धुपदाणींतल्या धूपाचा मंदोग्र गंध हवेंत दरवळला होता. त्या सोनेरी वर्तुळाच्या वर पंख पसरलेलें जें सफेत लांकडी कबूतर होतें, तें जणु त्या कांचपात्रांत ठेवलेल्या प्रसादावर आपल्या कृपेची पाखर घालीत होते. वेदीच्या वरच्या बाजूला कांचेच्या सुबक छोट्या झुंबरांत असलेला दिवा संथपणें तेवत होता.

त्या दोघी दिवाणखान्यांत गेल्या, त्या वेळीं पांढरी ओढणी ( veil ) घेतलेल्या

दोन तरुण हिंदी मुली हातांतील माळेचे मणि ओढीत वेदीसमोर गुडघे टेकून प्रार्थना करीत होत्या.

रखमा आंत आलेली दिसतांच सिस्टर झेवियरानें तिचा हात धरून तिला वेदीजवळ नेलें.

रखमा कांहीं वेळ स्तब्ध उभी होती. तें सगळें दृश्य तिला आपल्या देवघरांतल्या विशिष्ट पूजाप्रकारासारखें वाटलें. कारण, प्रत्यक्ष वेदीवर जरी त्या वेळीं एकहि मूर्ति नव्हती, तरी दिवाणखान्यांत जागोजाग भिंतीलगत असलेल्या छोट्या बैठकींवर येशू, मरिया आणि इतर ख्रिस्ती संत यांचे पुतळे ठेवलेले होते; व त्यांपैकीं कांहींना हार घालून त्यांच्यापुढें उदबत्त्याहि लावलेल्या होत्या. रखमाला तें दृश्य पाहून कान्होबा आणि महालक्ष्म्या यांच्या उत्सवाची आठवण झाली.

सिस्टर झेवियरानें वेदीवर त्या सोनेरी वर्तुळांतील कांचपात्रांत ठेवलेल्या प्रसादाची महती आणि माहिती तिला हिंदींत वर्णन करून सांगितली. सिस्टर खालच्या आवाजांत हळूहळू बोलत होती आणि रखमा मुकाट्यानें ऐकत होती. तिनें एका अवाक्षरानेंहि सिस्टरला कांहीं विचारलें नाहीं. पण चंदन मात्र तिला सारखे कांहीं ना कांहीं प्रश्न विचारीत होती.

सिस्टर चंदनशी बोलत असतांनाच पांच सहा मुली आंत आल्या. त्या खालच्या जातीतल्या असाव्यात, असें त्यांच्या मळक्या फाटक्या कपड्यांवरून दिसत होतें. त्यांतल्या एका मोठ्या मुलीच्या कडेवर दोन वर्षांचें मूल होतें; व बाकीच्या मुलींपैकीं कांहीं परकऱ्या तर कांहीं साडी नेसलेल्या होत्या.

त्या मुलींना पहातांच रखमाजवळून उठून सिस्टर लगबगीनें त्यांच्यापाशीं गेली आणि तिनें त्यांना गुडघे टेकून बैठकीवर बसविलें.

त्यांना बसवून सिस्टर परत आपल्याजवळ येतांच इतका वेळ गप्प असलेल्या रखमानें तिला विचारलें—

" या कोण मुली आहेत ?— "

" आपल्या शेजारच्या वस्तींतल्या हिंदु मुली. तुमच्याप्रमाणंच 'पवित्र संभोजन' पाह्यला आल्या आहेत त्या— "

" त्या नेहमीं येतात का ?— "

" हो. इथं पूजा, पवित्र संभोजन किंवा इतर कांहीं उत्सव असले, म्हणजे शेजारच्या वस्तींतलीं कितीतरी हिंदु माणसं येतात ती पाह्यला— "

रखमा क्षणैक स्तब्ध होती. नंतर पुन्हा तिनें सिस्टरला विचारलें—

" आणि या जप करीत असलेल्या मुली कोण ?— "

" या आमच्या संस्थेंतल्या मुली आहेत. यांनीं आपलं सगळं जीवन देवाच्या सेवेला वाहयलंय— "

" म्हणजे जोगणी किंवा देवदासी आहेत म्हणायच्या या— "

तिच्या त्या शब्दांतील खोंच सिस्टरच्या लक्षांत आली नाहीं आणि ती म्हणाली—

" हो. आम्हीच त्यांना वाढवलं, त्यांचं शिक्षण केलं आणि त्यांनीं आतां वाहून घेतलंय आपल्याला देवाच्या कामाला— "

" यांच्या आईबापांनीं स्वाधीन केल्या होत्या यांना तुमच्या ?— "

" आईबापांनीं नाहीं. आईनं म्हणा वाटल्यास. बाप कोण होता हें आम्हांला माहित नाहीं आणि आम्ही विचारलंहि नाहीं. या मुलींची आई तरी आम्हीं पाहिलेली होती. पण पुष्कळदां आम्हांला मुलांची आई कोण हेंहि कळत नाहीं— "

" हें कसं काय ?— "

" जिल्हा कचेरीजवळ आमचा अनाथाश्रम आहे. त्याच्या आवारांत केव्हां केव्हां नुकतींच जन्माला आलेलीं मुलं फाटक्या तुटक्या कपड्यांत गुंडाळून किंवा उघडीं वाघडींसुद्धां आणून ठेवलीं जातात. आम्ही पोरक्या निराधार मुलांना सांभाळतों, वाढवतों हें माहित आहे लोकांना. त्यामुळं आपल्याला नको असलेलीं मुलं खुशाल आणून टाकतात लोक आमच्या आवारांत— "

" तीं सगळी ख्रिस्ती होतात ?— "

" अर्थात्. ज्यांना आईबापांनीं टाकून दिलीं, त्यांच्यावर आईबापांच्या धर्माचा काय हक्क राहणार ? त्यांना आम्ही वाढवतों, तीं आमच्यासारखीं होतात— "

" तुम्ही का वाढवतां या मुलांना ?— "

तिच्या त्या उत्तरानें कुंठित झालेल्या रखमानें कांहीं तरी विचारावयाचें म्हणून विचारलें.

" मग काय त्यांना मरूं द्यायचीं का हिंदूंप्रमाणं ? आमचा धर्म हा अनाथांचा, पतितांचा आणि दलितांचा धर्म आहे. ज्याला कोणी आपंगिता नाहीं, त्याला जवळ करावा अशी आज्ञा आहे आमच्या प्रभूची. म्हणून आम्ही करतों हीं कामं— "

पण सिस्टरचा हा युक्तिवाद रखमाला पटला नाहीं. उलट त्या दोन मुलींची आठवण होऊन तिच्या मनांत वारंवार येई कीं, आपली चंदनसुद्धां अशीच एकाद दिवशीं ख्रिस्ती होऊन या मुलींप्रमाणें जोग घेणार नाहीं ना ? आणि या भीतीमुळें तिच्या मनांत मिशनविषयीं विलक्षण अढी उत्पन्न झाली.

परंतु येसूला मात्र अशी भीति कधींच वाटली नाहीं. त्या काळ्यागोऱ्या मडमांच्या शिक्षणाचा आणि सहवासाचा परिणाम चंदनवर होऊन तिच्यांत इतर मुलीपेक्षां जी अगदीं निराळी अशी हुषारी आणि तडफ दिवसेंदिवस दिसूं लागली होती, तिचें येसूला अतिशय कौतुक वाटे. आपली नात इंग्रजी शिकेल, तिला मोठी नोकरी आणि चांगला नवरा मिळेल व तिनें चंदनवाडीचा ताबा घेतल्यावर आपण वर्धेच्या काठीं आपल्या आयुष्याचे शेवटले दिवस सुखासमाधानानें काढूं, असा विश्वास तिला चंदनकडे पाहून वाटूं लागला होता. इतकेंच नव्हे, तर चंदन जेव्हां हायस्कूल एन्ट्रन्सच्या परीक्षेंत पहिली आली, तेव्हां येसूचा आनंद गगनांत मावेना आणि तिला घेऊन आपण चंदनवाडीला चार दिवस जाऊन यावें, असा बेत तिनें मनाशीं केला.

पण रखमाला चंदनवाडीचें नांव काढलेलेंहि सहन होत नसे.

येसूला जितकें चंदनवाडीविषयीं प्रेम होतें, तितकाच रखमाला तिच्याविषयीं द्वेष होता. ज्या वाडीच्या लोभापायीं आपला नवरा ऐन तारुण्यांत गिरणीच्या पट्टयांत सांपडून मेला आणि ज्या वाडींत आपल्यावर इतके मानहानीचे खडतर प्रसंग आले, त्या चंदनवाडीचें नांवहि आपल्या मुलीसमोर सासूनें काढलेलें तिला खपत नसे. येसूप्रमाणेंच रखमालाहि चंदनवाडी ही सजीव, सचेतन व्यक्ती वाटे; पण एखाद्या चेटकिणीचें, अपशकुनी कृत्येचें जसें भय एखाद्याच्या मनांत बसावें, तशी धास्ती चंदनवाडीविषयीं तिच्या मनानें घेतली होती. त्यामुळें इतर बाबतीत सासूचा शब्द शिरावर झेलणारी रखमा चंदनवाडीचें नांव काढल्यावर अगदीं बिथरल्यासारखी होऊन जात असे. जणुं कांहीं, चंदनवाडीच्या त्या शापित भूमीवर आपल्या मुलीनें पाऊल ठेवलें, तर तिचीहि आपल्यासारखी दुर्दशा होईल, असें तिच्या मनानें घेतलें होतें.

म्हणून परीक्षेचा निकाल लागला त्या दिवशीं रात्रीं जेव्हां येसू तिला म्हणाली—

"पांच वर्सं होऊन गेलीं असतील नाहीं आपल्याला आतां इथं आल्याला, सूनबाई ? आतां एकदां जाऊन आलं पाहिजे चंदनवाडीला— "

तेव्हां रखमानें तिला सटकन् विचारलें—

" काय आहे तिथं आतां आपलं ?— "

"सगळंच कांहीं आहे. आपलं घरवावर, आपलं देवदेवस्थान, आपल्या वाड-वडलांच्या समाध्या सगळं कांहीं तिथंच तर आहे— "

रखमा कांहीं बोलली नाहीं.

" सध्यां सुट्या आहेत शाळांना. मला वाटतं जाऊन यावं एकदां— "

तरीहि रखमा स्तब्धच होती.

" चंदनची आतां आठवण मुद्दां बुजत चालली असेल चंदनवाडीबद्दलची. आपल्या वाडवडलांचं गांव, त्यांचीं वावरं, त्यांच्या समाध्या जर तिनं या वयांत पाह्यल्या, तरच तिला कांहींतरी जाणीव राहील आपल्या वास्तूची, आपल्या गेलेल्या वैभवाची. म्हणून सारखं मनांत येतंय् माझ्या कीं, तिला घेऊन एकदां गांवीं जाऊन यावं— "

" तुम्हांला वाटलं, तर तुम्ही जा. पण तिला नाहीं न्यायची तिथं— "

" कां बरं ?— "

" माझी इच्छा नाहीं माझ्या पोरीनं चंदनवाडींत पुन्हा पाऊल ठेवावं अशी. त्या वाडीपायीं माझा सत्यानाश झाला तेवढा पुरे. माझ्या पोरीला नको आणखी तिचा लोभ भोवायला— "

रखमाचें तें तुटक उत्तर येसूच्या अगदीं मर्मी झोंबलें. पण आपला सगळा राग गिळून ती उपरोधानें म्हणाली—

" बरं बाई ! तूं मिळवती सवरती सून. तेव्हां तूं काय म्हणशील तें ऐकून घेतलंच पाहिजे मला म्हातारीला. तुझ्या पोरीला घेऊन जाणारी मी कोण ? ज्या चंदनवाडींत आमच्या पिढ्या न् पिढ्या सुखानं नांदल्या, तिनं आपला सत्यानास केला असं म्हणवतं तरी कसं तुला ? आपल्या बापजाद्यांची वास्तु, आपल्या देश-मुखीची दौलत आहे ती— "

" म्हणूनच म्हणतें ना तुम्हांला जायचं असलं तर जा. माझ्या पोरीला ती देशमुखीहि नको न् ती दौलतहि नको— "

रखमा अगदीं शांतपणानें म्हणाली आणि सासूच्या समोरून उठून आंत गेली.

त्यानंतर किती तरी वेळ येसू एकटीच बडबडत होती. पण तिच्या तोंडाच्या त्या पट्टयाकडे रखमानें दुर्लक्ष केलें.

त्या दिवशीं मुलींबरोबर कॉन्व्हेंट हायस्कूलमध्यें जाण्यासाठीं येसू जी निघाली, त्यांत आपली नात कोणत्या शाळेंत जात आहे, हें पाहण्याचा जसा तिचा एक हेतु होता, तसा दुसरा हेतु हा होता कीं, सिव्हिल लाइन्समध्यें रहाणाऱ्या देशपांड्यांच्या मुली ज्या शाळेंत जातात, असें तिनें ऐकलें होतें, त्याच शाळेंत चंदनहि जाणार आहे कीं काय हें जाणून घ्यावें व आपली गुणी आणि सुसंस्कृत नात त्या श्रीमंतींत वाढलेल्या मुलींपेक्षां कोणत्याहि प्रकारें कमी नाहीं, हें त्यांची ओळख करून घेऊन त्यांच्या नजरेला आणून द्यावें. तिची अशी समजूत होती कीं, सिव्हिल लाइन्स-मध्यें फक्त एकच मुलींची शाळा आहे आणि त्या बड्या शाळेंत गेल्यावर आपली नात देशपांड्यांच्या मुलींच्या खात्रीनें दृष्टीस पडेल.

त्यांना सिव्हिल लाइन्समध्यें पोंचावयाला पाऊण तास लागला. कॅथेड्रलसमोर असलेल्या प्रशस्त पटांगणांत त्यांचा टांगा येऊन उभा रहातांच सिस्टर खिश्चियाना खालीं उतरली; व खिस्ताचा जो भव्य पुतळा कॅथेड्रलच्या महाद्वारापुढील हिरव्यागार बंदिस्त वर्तुळांत उंच कठड्यावर उभा केलेला होता, त्याच्याजवळ गेली.

गेल्या पांच सहा वर्षांत चंदननें खिस्ताचे अनेक पुतळे पाहिले होते; व मातेच्या कडेवर बसून जगाकडे स्मितमुखानें बघणाऱ्या अल्लड येशूपासून तो सुळावर मान मागें टाकून लटकत असलेल्या दीनवाण्या खिस्तापर्यंत त्याचीं अनेक दर्शनें तिला घडलेलीं होती. पण हातांत राजदंड आणि राजगोल धारण करून जगाकडे प्रभुत्वाच्या दर्पानें पहाणारा हा खिस्त—त्याचें हें उग्र दर्शन तिला पूर्वी केव्हांहि घडलेलें नव्हतें. मागल्या बाजूला कॅथेड्रलचे उत्तुंग मिनार सिंहासनाच्या स्तंभांसारखे सूर्यप्रकाशांत तळपत होते. त्या मिनारांच्या मागून आलेला प्रकाशाचा झोत म्हणजे जणुं प्रभाव-लयच होतें त्या पुतळ्याभोवतालचें. कॅथेड्रलचे ते उंच मिनार, सूर्यप्रभेनें तेजाळलेले ते दोन्ही बाजूंच्या बगीचांतील वृक्ष आणि पुतळ्याभोंवतालचें तें नैसर्गिक तेजोवलय—तसा वैभवशाली खिस्त चंदननें आजवर कधीं पाहिला नव्हता.

त्या पुतळ्यापुढें गुडघे टेकून अभिवादन करित असलेल्या सिस्टरला तिनें विचारलें—

"हा येशूचाच ना पुतळा, मावशी? मग याच्या हातांत राजदंड कसा काय ग?—"

"त्याच्या पित्यानं स्वर्गाचं राज्य त्याला दिलेलं आहे, हें वाचलेलं नाहींस का तूं?—"

" पण मग मुकुट का नाहीं डोक्यावर त्याच्या ? "

" त्याच्या मस्तकावर एकच मुकुट शोभतो, चंदन !—तो मुकुट काट्यांचा. जगांतल्या दीनांच्या आणि दलितांच्या उद्धारासाठीं जो सुळावर गेला, त्याच्या मस्तकावर कांटयांच्या मुकुटाशिवाय दुसरं काय शोभणार आहे ?— "

सिस्टर म्हणाली. पण, त्या सुंदर पुतळ्यावर तिची दृष्टि इतकी कांहीं एकाग्र झाली होती कीं, चंदनला तिचें तें उत्तर म्हणजे स्वगत उद्गारच वाटला.

कॅथेड्रलच्या उजव्या बाजूकडील बंदिस्त आवारांत कॉन्व्हेंट हायस्कूलची मोठी थोरली इमारत होती. सिस्टरच्या पाठोपाठ त्या तिघी आंत गेल्या. पण, त्यांना आपल्याबरोबर लेडी सुपरिंटेंडंटच्या ऑफिसांत न नेतां, सिस्टरनें शेजारी भेटीसाठीं येणाऱ्या मंडळीकरितां मुद्दाम जी एक खोली ठेवलेली होती, तींत नेऊन बसवलें; व नंतर ती लेडी सुपरिंटेंडंटला भेटावयाला गेली. तिला जाऊन पंधरा मिनिटें होतात न होतात, तोंच गोल नेसलेली एक काळी पोक्त बाई त्या खोलींत आली आणि तिनें मुलींना म्हटलें—

" चला, तुम्हांला सिस्टर ख्रिश्चियाना बोलावताहेत—"

मुली लगेच उठल्या. त्यांच्याबरोबर येसूहि उठली.

तेव्हां ती पोक्त बाई तिला म्हणाली—

" तुम्ही कशाला येतां, बाई ? या मुलींचं नांव शाळेंत दाखल करायचंय म्हणून यांना बोलावलंय ऑफिसांत. तुम्ही इथंच बसा. या आतां येतील परत दहा मिनिटांत— "

" मी या मुलीची आजी आहे, बाई—"

येसूनें चंदनच्या दोन्ही खांद्यांवर हात ठेऊन उत्तर दिलें.

" हो. ही मोटी माय आहे माझी. तिला आंत यायला हरकत नाहीं आमच्या बरोबर. ती पालक आहे माझी. तीच माहिती देईल माझी बाईंना—"

चंदननें त्या बाईची समजूत घातली.

" बरं, ठीक आहे. चला—"

त्या बाईनें किंचित् कुर्यानें म्हटलें; व त्या तिच्या मागोमाग लेडी सुपरिंटेंडंटच्या खोलींत आल्या.

ती खोली चांगली प्रशस्त होती. खोलीच्या मधोमध एक मोठें टेबल असून, त्याच्यासमोर रांगेनें सहा खुर्च्या ठेवलेल्या होत्या. टेबलाला भिडलेल्या फिरत्या

खुर्चीवर गोरीपान वृद्ध मडम बसलेली होती; व तिच्या शेजारच्या खुर्चीवर बसून सिस्टर ख्रिश्चियाना तिच्याशीं हळुहळू बोलत होती. त्या मडमेच्या समोर भिंतींत केलेल्या मखरासारख्या शोभिवंत कोनाड्यांत मॅडोनाचा पुतळा होता. भिंतीला लागून उभ्या केलेल्या आल्मान्यांत पुस्तकें भरलेलीं होतीं; व टेबलावर उजव्या हाताला जो मुबक शिसवी स्टँड होता, त्यांतहि पुस्तकें ठेवलेलीं होती.

त्या आंत आल्याबरोबर सिस्टरनें त्या मडमेला इंग्रजींत म्हटलें—

" याच त्या मुली—"

" गुड इव्हिनिंग, माझ्या मुलींनों—"

त्या मडमेनें हंसून इंग्रजींत म्हटलें; व समोरच्या खुर्च्यांकडे हात केला. नंतर तिनें सिस्टरला विचारलें—

" ही वृद्ध बाई कोण ?"

" त्या धाकट्या मुलीची आजी—"

त्याबरोबर ती मडम एकदम येसूकडे बघून मराठींत म्हणाली—

" सिस्टरनं आपल्या नातीची फार तारीफ केली आतांच. आपण कांहीं फिकीर करूं नका. आम्ही तिच्या शिक्षणाची पूर्ण काळजी घेऊं—"

तिनें प्रत्येक शब्द सावकाश आणि स्पष्ट उच्चारला. चंदनला वाटलें, जणु कांहीं ती वर्गाला शुद्धलेखनच घालीत आहे. बोलतांना तिच्या मोठ्या कपाळाला या टोकापासून त्या टोकापर्यंत ज्या तीन जाड आंठ्या पडत, त्यामुळें तिच्या प्रसन्न चेहऱ्याला एक प्रकारचें गांभीर्य येत असे; व आपल्या डोळ्यांवरल्या नुसत्या भिंगांच्या चष्म्यांतून जेव्हां ती पहात असे, तेव्हां तिच्या त्या निळ्या अथांग डोळ्यांत जशी एक प्रकारची अनुकंपा तशीच उग्रताहि भरलेली आहे, असा भास समोर बसणाराला होई.

तिला काय उत्तर द्यावें, हें येसूला समजेना. पण, थोड्या वेळानें ती म्हणाली—

" या सिस्टरनीं हिला हाताशीं धरल्यामुळं ही पुढं आली इतकी. आतां आपल्या हातांत आहे सगळं—"

" तुम्ही कांहीं काळजी करूं नका, बाई—"

त्या मडमेनें म्हटलें आणि लगेच आपल्यापुढें असलेल्या कागदांवर नजर टाकली.

नंतर ती पुन्हा वर बघून म्हणाली—

" ठीक आहे. उद्यांपासून रोज दहाला यायचं हां शाळेंत. आमची लॉरी येईल तुम्हांला न्यायला— "

त्याबरोबर सिस्टर उठली आणि तिच्या मागोमाग त्याहि तिघी उठल्या.

चंदनच्या घरापाशीं टांगा आल्यावर येसू हिराला म्हणाली—

" तूं आतां थांबून जा बाई इथं. चंदनची माय आली आहे. तिला सांगा सगळं; न् भाकर खाऊन मग घरीं जा आपल्या— "

" बरं आहे. पण तूं मला पोंचवायला आलं पाहिजेस घरापर्यंत, चंदन— "

" येईन मी. नाहीं तरी संध्याकाळीं शुक्रवार तलावाच्या बाजूला जानोंच आपण फिरायला. आज तुझ्या घराकडे जाऊं— "

" पण काळोख पडायच्या पूर्वी घरीं परत आलं पाहिजे बरं का, पोरी— "

येसू आंत जातां जातां चंदनला म्हणाली.

रखमा नुकतीच कामावरून परत येऊन तरटावर आडवी झाली होती. त्या दोघी आंत येतांच ती उठून बसली आणि तिनें विचारलें—

" कशी काय आहे नवी शाळा तुमची ?— "

" या शाळेपेक्षां कितीतरी छान आहे, माय. केवढा बगीचा आहे न् इमारत तरी केवढी मोठी आहे— "

आणि त्या दोघींनीं भाकर खातां खातां शाळेंत बघितलेल्या सगळ्या गोष्टींचें वर्णन रखमापाशीं केलें.

खाणें झाल्यावर लगेच त्या हात धुऊन बाहेर पडल्या आणि सक्करदऱ्याच्या रस्त्याला लागल्या. थोडें अंतर चालून गेल्यावर हिरा चंदनला म्हणाली—

" तुझ्या मायला कांहीं आवडलेलं दिसत नाहीं आपण त्या शाळेंत गेल्याचं— "

" हो. तिला आवडत नाहीं मिशनशीं माझा इतका निकट संबंध असलेला. पण, मला मात्र नेहमीं वाटतं कीं, मी जर त्या घंटेचा आवाज ऐकून मिशनच्या आवारांत गेलें नसतें न् मावशी जर मला तिथं भेटली नसती, तर आज कांहीं हे दिवस दिसले नसते मला— "

" खरं आहे तुझं म्हणणं. मला सुद्धां मिशनचं एकंदर धोरण आवडत नाहीं. पण आपल्यासारख्या कितीतरी गरिबांना मार्गाला लावलंय त्यांनीं— "

" तेवढंच केवळ नव्हे. आपलं जीवन हें फक्त आपल्या एकट्यासाठींच नाहीं,

तर इतरांनाहि त्याचा सारखा उपयोग झाला पाहिजे, ही जी एक शिकवण त्यांच्या सगळ्या वागण्यांत ओतप्रोत भरलेली आहे, तिचं महत्त्व फार वाटतं मला—"

"मग तूं सुद्धां जोग घेऊन गरिबांच्या सेवेंत आयुष्य घालवणार आहेस का आपल्या मावशीप्रमाणं ?—"

हिरानें एकदम हंसून विचारलें. पण चंदन अगदीं गंभीरपणानें तिला म्हणाली—

"मी खूप जोग घेईन. पण आपल्या धर्मांत बायकांनीं जोग घेतलेला चालतो कुठं ! दीनदुबळ्यांची सेवा म्हणजेच देवाची सेवा ही कल्पनाच नाहीं मुळीं आपल्या धर्मांत. आपलीं देवळं म्हणजे विटाळाचीं माहेरघरं. माणसाला तर ज्याचा त्याचा विटाळ होतोच. पण विटाळाचं भय बिचाऱ्या देवाच्यामुद्धां हात धुवून पाठीस लागलंय— "

"मग ख्रिस्ती व्हावसं वाटतंय का तुला ?— "

"हो. अलिकडे केव्हां केव्हां माझ्या मनांत येते ती कल्पना. पण मायची फार भीति वाटते मला. माझ्या हातून भलतंसलतं कांहीं घडतंसं तिला वाटलं, तर ती जीवच घेईल माझा— "

"कांहीं तरी बोलतेस तूं, चंदन. आईनं कधीं आपल्या पोटच्या गोळ्याचा जीव घेतलाय का !— "

"तूं तरी हें बोलतां कामा नयेस, हिरा. मिशनमध्यें रोज किती उपजल्याबरोबर टाकलेलीं मुलं येतात हें पहातेस ना तूं ?— "

"तूं भलता दाखला भलत्या गोष्टीला देतेस. तो प्रकार निराळा न् हा प्रकार निराळा. मला खरं म्हणशील तर तुझ्या मायपेक्षां मोठ्या मायचीच भीति जास्त वाटते— "

"नाहीं ग ! मोठ्या मायचं सर्वस्व आहे मी. ती माझ्यासाठीं काय वाटेल तें करील. मी उद्यां ख्रिस्ती झालें तर तीहि ख्रिस्ती होईल माझ्याबरोबर. तुला आठवतं ना, तूं पहिल्यांदा आमच्या घरीं आलीस, तेव्हां तिनं कसा रुद्रावतार धारण केला होता तें ! परंतु, आतां किती प्रेमानं वागते ती तुझ्याशीं ! पण मायचं तसं नाहीं. ती मनांतलं बोलायची नाहीं न् वेळेवर करायला चुकायची नाहीं. मला सगळ्यांत जास्त भीति तिची वाटते. मोठी मायसुद्धां वचकते तिला— "

"तिची तर फार इच्छा आहे आणखी वर्ष दोन वर्षांनीं तुझं लग्न करून द्यावं अशी. माझ्या मायपाशीं म्हणत होती ती— "

" हो. यंदाच ती लग्नाबद्दल म्हणत होती. पण मीं हट्ट धरला न् मोठ्या मायनं माझी बाजू घेतली. मायच्या मनांत नाहीं आतां मी पुढं शिकावं असं. शिवाय आमच्या जातींत शिकलेल्या मुलींना चांगला नवरा मिळणंहि कठीण जातं. माझी गुलाब आत्या महिलाश्रमांत इतकी शिकलेली, पण तिची लग्न करायची मुळींच इच्छा नसतांना अंजु मावशीनं जबरदस्तीनं तिला एका अडाणी मालगुजाराच्या गळ्यांत बांधली. नुसता पैसा पाह्यला त्याचा. आणि आतां त्यानं आत्याशीं आपलं पटत नाहीं म्हणून दुसरी बायको करून आणली आहे. अशी स्थिति आहे आमच्या समाजांत— "

" ही अडचण तर आमच्यांतहि आहे— "

" पण तुमच्या जातींतलीं मुलं फार शिकायला लागलीं आहेत अलिकडे. त्यांना सवलतीहि मिळतात पुष्कळ— "

" त्यामुळंच शिकावंसं वाटतं. आमच्या अभीचं आतांपर्यंतचं सगळं शिक्षण फुकट झालंय. पण खरंच तुला लग्न करावसं वाटत नाहीं ?— "

" हो. आज तरी वाटत नाहीं. एकदां सगळं शिक्षण पदरांत पाडून घ्यावं असं वाटतं; न् मोठी माय आहे तोंपर्यंत तरी भीति नाहीं मला लग्न होण्याची–– "

चंदननें हंसून म्हटलें.

त्या बोलत बोलत हिराच्या घरापाशीं आल्या होत्या. परसदाराच्या पायऱ्या चढून त्या दार उघडणार, तोंच तें उघडलें गेलें आणि त्यांतून सायकल घेऊन एक काळासांवळा किडकिडीत तरुण मुलगा बाहेर आला. हातांतली सायकल पायरी-वरून खालीं घेत तो हिराला म्हणाला—

" किती उशीर झाला ग घरीं यायला ? माय सारखी वाट पाहते आहे तुझी—"

तो सायकल घेऊन पायरीवरून खालीं उतरतांच त्याच्या मागोमाग सायकल घेऊन दुसरा मुलगा बाहेर आला; व त्यानें हिराकडे पाहून हंसत हंसत विचारलें––

" काय, आज हायस्कुलांत नांव टाकलं ना !—"

" हो— "

हिरानें लाजल्यासारखें करून त्याला उत्तर दिलें.

" कुठलं हायस्कूल ?— "

" कॉन्व्हेंट हायस्कूल— "

हिरानें म्हटलें.

तिच्यामागें मुकाट्यानें उभी असलेली चंदन त्या तरुणाकडे पहात होती.

सायंसूर्याच्या अरुण प्रकाशांत त्याच्या पिंगट केसांना सोनेरी छटा आली होती; व त्याच्या विस्फारलेल्या हंसऱ्या डोळ्यांतील बुबुळांच्या पिंगट लकाकींतूनहि तीच छटा ओसंडत आहे, असें चंदनला वाटलें. हंसतांना त्याच्या जिवणीची डावीकडली बाजू जास्त विलग होऊन त्याची अणीदार शुभ्र दंतावलि जशी खुलून दिसे, तसाच चेहऱ्यावर लाजरेपणाचा मोहक भावहि ओझरता उमटून जाई. त्याच्या अंगांतील किंचित् पिंवळसर झांक असलेला बिन गळयाचा घोळदार खादीचा शर्ट त्याच्या मानेची पुष्टता आणि खांद्यांचा रुंदपणा सुव्यक्त करीत होता.

पायऱ्यांवरून सायकल खालीं घेऊन रस्त्यावर येतांच हिराच्या मागें उभी असलेली चंदन त्याच्या दृष्टीस पडली. पण क्षणमात्रच. वाट मोकळी झालेली दिसतांच त्या दोघी झट्दिशीं आंत गेल्या.

त्या तरुणानें अभिमन्यूच्या खांद्यावर हात ठेवला आणि त्याला विचारलें—

" ही कोण रे अभि ?— "

" अरे, आपल्या हिराची मैत्रीण. यंदा हायस्कूल एन्ट्रन्स परीक्षेंत सर्व प्रान्तांत पहिली आली. मोठी हुशार न् गोड पोरगी आहे, अवधूत-- "

" अरे, पण नांव तर सांगशील तिचं-- "

" नांव ! नांव चंदन— "

" चंदन ! "

अवधूतनें एकदम चमकून उद्गार काढला आणि क्षणभरानें तो अभिमन्यूला म्हणाला—

" किती चमत्कारिक नांव आहे ! पण, मी आजवर कधीं पाहिली नव्हती हिला तुमच्याकडे— "

" ती या वेळेला सहसा येत नाहीं. ही त्यांची फिरायला जायची वेळ आहे शुक्रवार तळ्यावर— "

" मग आजच कशी आली !— "

अवधूतनें विचारलेला तो प्रश्न अभिमन्यूला अगदीं विचित्र वाटला आणि त्यानें त्याच्या पाठीवर थाप मारून हंसत हंसत म्हटलें—

" आज ती तुझ्या दृष्टीस पडावी असा दैवयोग होता म्हणून— "

# त्रिमूर्ति

## ७

ते दोघे हातांत सायकली घेऊन मशिदीसमोर येतांच तेथील नळावर जमलेल्या बायकांची कचकच त्यांच्या कानांवर पडली.

सक्करदऱ्याच्या रस्त्यापासून तीन फर्लांगांवर महारांची जी वस्ती होती, तींत अगदीं पुढल्या बाजूला अभिमन्यूचें घर होतें. त्याच्या घरापासूनच शिरसपेठेंतील महार वस्तीला सुरवात झाली होती. त्या घराच्या पायरीवर उभें राहिलें, म्हणजे समोर असलेल्या छोटेखानी मशिदीचे पांढरे सफेत मनोरे आणि त्यावरील पितळेचे चांद दृष्टीस पडत असत. मशिदीच्या मागें मुसलमानांची वस्ती महारवाड्याला अगदीं भिडून होती. अभिमन्यूचें घर आणि मशिद यांच्या मधून जी अरुंद पायवाट रस्त्याला जाऊन मिळत असे, तिला लागूनच मशिदीपुढल्या मोकळ्या जागेंत तो सार्वजनिक नळ होता.

त्या नळाभोंवतीं या वेळीं लाल काळीं मडकीं, पितळेचे लहान मोठे गुंड आणि ते घेऊन आलेल्या बायका यांचा गराडा पडलेला होता. नळाचा तावा एका मुसलमान तरुणानें घेतलेला होता. आपआपलीं भांडीं जमिनीवर ठेवून उभ्या असलेल्या बायका त्याचा नळाखालीं असलेला गुंड केव्हां एकदां भरतो याची वाट पहात होत्या.

रंगीबेरंगी लुंगी नेसलेला तो उघडा मुसलमान तरुण पहिलवानी ऐटींत उभा राहून त्या बायकांकडे मिस्किलपणानें पहात होता. नळाच्या तोटीखालीं असलेला त्याचा गुंड वास्तविक भरून वाहून चालला होता. पण, समोर ताटकळत उभ्या असलेल्या तरुण मुलींकडे पाहून शीळ घालण्यांत दंग असलेल्या त्या जवानाचें लक्ष गुंडाकडे होतें कुठें ?

शेवटीं एक कंटाळलेली म्हातारी बाई त्याला म्हणाली—

" उचल मिया, गुंड आपला. केव्हांपासून वाहून चालला आहे. आम्ही किती वेळ थांबावं ?— "

" तुम्हांला थांबायला सांगितलं कोणी ? तुम्ही आपल्या नळावर जाऊन कां नाहीं पाणी भरत ? मला वाहेल तेवढा वेळ मी गुंड भरीत राहीन माझा. मशिदीचा नळ आहे हा— "

आणि त्यानें खरोखरीच तोंडांतला पानाचा चोथा मोरींत टाकला व त्यावर तो गुंड ओतून पुन्हा भरत लावला.

त्याबरोबर ती म्हातारी संतापानें म्हणाली—

" मशिदीचा कुठला आला आहे हा नळ ? नळासाठीं चंदा मागत घरोघर हिंडलांत, तेव्हां आमच्याहि वस्तींतून पैका घेतला होतात नव्हे का ? हा रस्त्यावरला सार्वजनिक नळ. का उगाच ताप देऊन राहयला आम्हां लोकांना ?— "

" तुम्ही चंदा दिला, तो धर्माचं काम होतं म्हणून दिला. ते काय उपकार झाले का आमच्यावर ? तुमचं काम नाहीं या नळावर यायचं. तुमच्या वस्तींत तुमचा नळ आहे न् पलिकडे हिंदु वस्तींतहि नळ आहेत हवे तितके. तिकडे का नाहीं जात पाणी भरायला ?— "

तो संवाद ऐकून अवधूतनें अभिमन्यूला म्हटलें—

" तुम्ही तक्रार का नाहीं करीत या प्रकाराविरुद्ध म्युनिसिपालिटीकडे ?— "

" तक्रार काय करणार ? या साऱ्या वस्तींत फक्त दोन नळ आहेत. एक नळ इथं आहे न् एक आमच्या वस्तींत आहे. त्या नळावर गर्दी असली, म्हणजे आमच्या बायका निरुपायानं या नळावर पाण्याला येतात. हा नळ खरोखरीच मशिदी भोंवतालच्या मुसलमान वस्तीसाठींच आहे. पण मुसलमान बाई कधीं नळावर येईल तर शपथ. बिबी असायची गोषांत न् मिया असायचा नळावर. यांत तक्रार करायला जागा कुठं आहे ? मुसलमानांचा शेजार म्हटला कीं असे प्रकार व्हायचेच— "

" पण मग तुम्ही दुसरीकडे का नाहीं रहात ?— "

" दुसरीकडे कुठं रहाणार ? तूं कुठंहि पहा. गांवाच्या एका टोकाला मुसलमान वस्ती; न् बहुधा त्या वस्तीला लागूनच महारवाडा असतो— "

अवधूत कांहीं बोलला नाहीं. अभिमन्यूच्या सांवळ्या रेखीव नाकपुड्या एकदम

फुगल्या, खालचा किंचित् जाड लोंबता ओठ त्यानें दांताखालीं दाबला व नळाभोंव-तालच्या त्या दृश्याकडे पाहून त्वेषानें म्हटलें—

"आणि मुसलमानांच्या या शिरजोर शेजाराचे जे व्हायचे तेच परिणाम आमच्या दलित समाजावर होतात. आमच्या बायका मुलींना पडदा नाहीं. त्या हिंडणार फिरणार, बाजारांत जाणार, कामधंदा करणार. स्वतःच्या बिबीला पडद्यांत डांबून ठेवणाऱ्या मुसलमानांची नजर सदा आमच्या बायकांवर. त्यामुळं तरुण मुलींना फुसलावणं, पळवून नेणं, बाटवणं वगैरे प्रकार सारखे सुरू असतात आमच्या वस्तींत. भक्ष्यभक्षकांचा शेजार आहे हा खरोखरी—"

तें वाक्य उच्चारून तो एकदम हंसला. त्याच्या मनाला पडलेला पीळ आणि आलेली चीड त्या हास्याच्या विकटतेंत ओतप्रोत भरलेली होती.

"पण तुमच्यांतले जे त्यांतल्या त्यांत सुधारलेले लोक आहेत, त्यांनीं तरी चांगल्या वस्तींत का राहूं नये?—"

"चांगल्या वस्तींत म्हणजे कुठें? महार कितीहि सुधारला, पगारदार झाला, तरी उच्च हिंदु वस्तींत त्याला घर मिळणें शक्य आहे का? 'महार मेला न् विटाळ गेला' अशी ज्यांची आमच्याविषयीं भावना आहे, ते उच्च जातीचे हिंदु आम्हांला आपल्या वस्तींत काय थारा देणार? त्यामुळें आमच्यांतले जे त्यांतल्या त्यांत शिकले सुधारलेले पांढरपेशे लोक आहेत, ते सदरमध्यें रहातात ख्रिश्चन लोकांच्या वस्तींत. पण मग त्यांचा आपल्या समाजाशीं कांहीं संबंध उरत नाहीं आणि समाजाला उप-योगहि होत नाहीं. त्यांची एक वेगळीच जात बनते हळुहळू!—"

"पण म्हणून काय असले प्रकार चालू द्यायचे का?—"

"पण मग करायचं काय तें सांग ना तूं मला. तुम्ही उच्चवर्णीय हिंदु आपल्या वस्तींत आम्हांला राहूं देत नाहीं. मग तुम्ही हीन समजून बाहेर टाकलेल्या आमच्या समाजाभोवतीं जर तुमच्या वाईटावर असलेल्या लोकांचा गराडा पडला, तर त्यांत दोष कुणाचा? हिंदु समाज म्हणून तुम्ही ज्याला म्हणतां, तो इतका अबाढव्य, अस्ताव्यस्त आणि परस्परविलग आहे कीं, त्याच्या एका टोंकाला काय चाललें आहे, याचा पत्ता दुसऱ्या टोंकाला नसतो. मुसलमान आणि ख्रिस्ती या दोन्ही धर्मांचं आक्रमण आमच्या अस्पृश्य जातींवर किती प्रकारांनीं आणि केवढ्या प्रमाणांत सतत चालू आहे, याची कल्पनासुद्धां नाहीं तुम्हां उच्च जातींतल्या लोकांना—"

ते दोघे बोलत बोलत आतां रस्त्यावर आले होते. म्हणून त्यांनीं सायकलवर बसून चालावयाला प्रारंभ केला.

अवधूतला तो वाद पुढें चालविण्याची इच्छा नव्हती. म्हणून त्यानें अभिमन्यूच्या खांद्यावर हात ठेवून विचारलें---

" हिराला मॅट्रिकपर्यंत शिकवायचा विचार आहे तुमचा ?--- "

" खरं सांगायचं म्हणजे तिचं शिक्षण आतां आमच्या हातीं राहिलेलं नाहीं. माझी आई आणि आजी या दोघींचीहि इच्छा तिचं लग्न करून देण्याची आहे; व यंदा आमच्यांतल्या एका नायब तहसिलदार झालेल्या पदवीधर तरुणानं मागणीहि घातली होती तिला. पण ती लग्न करीत नाहीं म्हणते न् बाबांचा पाठिंबा आहे तिला--- "

" आश्चर्य आहे--- "

" आश्चर्य कांहीं नाहीं. सिस्टर झेवियराचं बाबांवर पराकाष्ठेचं वजन आहे न् ती जसं सांगेल तसं वागतात ते. हिराचं शिक्षण सर्वस्वी त्या सिस्टरवर अवलंबून आहे--- "

" कोण आहे ही सिस्टर झेवियरा ? नेहमीं बोलण्यांत येते ती तुझ्या. मला पाहिली पाहिजे एकदां--- "

" फार छान बाई आहे. विशेषतः समाजांतल्या निरनिराळ्या घडामोडी पहाण्याची हौस असलेल्या तुझ्यासारख्या तरुणानं अवश्य पाहिली पाहिजे तिला. तूं म्हणशील, तर आपण जाऊं एकादे वेळीं त्यांच्या मिशनमध्यें--- "

" मग तूं विरुद्ध कां बोलतोस तिच्या ?--- "

" विरुद्ध बोलूं नको तर काय करूं ? तुला कल्पना नाहीं, अवधूत. आमच्या समाजांतल्या कितीतरी मुलींवर विलक्षण छाप आहे तिची; न् अर्ध्यामुर्ध्या ख्रिस्ती झालेल्या आहेत त्या. मला केव्हां केव्हां असं वाटतं कीं, या ख्रिस्ती मिशनरींच्या सूक्ष्म, सौम्य, सर्वव्यापी धर्मप्रसारापेक्षां मुसलमानांचा आडदांड धर्मप्रसार पुरवला. त्यांच्या बाबतींत मनुष्य सावध रहातो नेहमीं. पण शाळा, कॉलेजें, रुग्णालयें, अनाथाश्रम, कंगालखाने वगैरे नानाविध संस्थांतून हे ख्रिस्ती मिशनरी ज्या सात्त्विक पद्धतीनें आपल्या धर्माचा प्रसार अप्रत्यक्ष रीतीनें सारखा करीत आहेत, त्याची जाणीव आपल्याला तीव्रतेनं होत नाहीं व म्हणून त्याला प्रतिकार करण्याची कल्पनाहि आपल्या मनांत येत नाहीं. त्यांचा आश्रय, त्यांचीं औषधं, त्यांच्या

शिष्यवृत्त्या, त्यांचीं पुस्तकं, त्यांचं सौजन्य या सगळ्यांतून त्यांचा धर्म भरलेला असतो न् तो सारखा कळत न कळत आपल्यावर आक्रमण करतो— ”

तो हें आवेशानें बोलत असतां अवधूतच्या मनांत मात्र अगदीं निराळे विचार चालले होते. त्यानें मध्येंच विचारलें—

“ हिराबरोबर जी मघांशीं दुसरी मुलगी होती, तिचं शिक्षणसुद्धां या सिस्टरनंच केलंय का ?— ”

“ हो. आमच्या हिरापेक्षांसुद्धां तिचा मिशनशीं जास्त जिव्हाळा आहे. मला खात्री आहे ती लवकरच ख्रिस्ती होईल— ”

अभिमन्यूचा तो उद्‌गार ऐकतांच अवधूतचा चेहरा एकदम उतरून गेला; व त्यानें अभिमन्यूला विचारलें—

“ कशावरून ? तुझी नेहमीं गांठ पडते का तिच्याशीं ?—”

“ छे, छे ! ती अगदीं क्वचित् येते आमच्या घरीं. ती न् हिरा एका वर्गांत आहेत गेलीं पांच सहा वर्षं. हिराच्या बोलण्यावरून अंदाज केलाय् मी हा—”

“ ती ब्राह्मण आहे का ?— ”

“ कांहीं कल्पना नाहीं. पण बहुधा नसावी. मी जातीची चौकशी करित नाहीं कधीं कुणाच्या— ”

“ तुझा तर्क बरोबर आहे. ती बहुधा ब्राह्मण नसावी. चंदन हें नांव ब्राह्मणांत ठेवण्याची पद्धत नाहीं—”

“ हो. मी अगदीं विसरून गेलों बघ ! ती खात्रीनं ब्राह्मण नाहीं. तिची आई गिरणींत काम करिते. ब्राह्मणाच्या बायका कांहीं अजून गिरणींत काम करायला नाहीं लागलेल्या. पण तिची जात कोणतीहि असो. एवढी गोष्ट मात्र खरी कीं, हिरा तिच्या घरीं नेहमीं जाते न् तिला कांहीं आपली जात लपवावी लागत नाहीं तिथं जाण्यासाठीं—”

“ तुझा टोमणा समजला मला, अभि. पण मी तरी काय करूं ? तुझी जात जर आमच्या घरांत विशेषतः माझ्या काकींना कळली, तर तुला कधीं चहासुद्धां देतां येणार नाहीं मला. आमच्या काकांजवळ कसलाच भेदाभेद नाहीं. म्युनिसिपालिटीचे सगळे महार सभासद नेहमीं येतात त्यांच्याकडे. पण त्या सभासदांची सरबराई सगळी बाहेरच्या बाहेर होते. तुझी जात आमच्या घरांत कोणाला माहित नसल्यामुळेंच मी तुला घरच्यासारखा वागवूं शकतों, अभि—”

" पण ही फसवणूक तुला न् मला दोघांनाहि कमीपणा आणणारी आहे असं नाहीं का वाटत तुला !—"

" वाटतं ना. पण करणार काय ? पटवर्धन हायस्कुलांत असल्यापासून गेलीं पांच वर्षं आपण दोघे एकत्र शिकतों आहोंत. पण कॉलेजांत जाईपर्यंत मी तुला कधीं घरीं बोलावला नाहीं तो याच कारणामुळं. आमचं घराणं कितीहि शिकलंसवरलेलं असलं, तरी कांहीं बाबतींत तें जुनाट आहे अगदीं. माझे काका विलायतेला जाऊन बॅरिस्टर होऊन आले हीच मुळीं मोठी बहादुरी आहे आमची—"

" आणि तरी तूं म्हणतोस आम्ही तुमच्या वस्तींत येऊन राहावं म्हणून ! तुझे काका म्युनिसिपालिटीच्या महार सभासदांशीं चांगले वागतात, ते त्यांचं उपाध्यक्षपद त्या सभासदांच्या पाठिंब्यावर अवलंबून आहे म्हणून. त्यांना अस्पृश्यता मान्य नाहीं म्हणून नव्हे ! खरोखरी मी जों जों वरिष्ठ हिंदु जातींत मिसळतोंय, तों तों माझी खात्री होत चालली आहे कीं, हिंदूंकडून आम्हांला कधीं न्याय मिळण्याची आशा नाहीं— "

" जणुं कांहीं तुम्ही हिंदूंपेक्षां निराळे आहांत !— "

अवधूतनें उपरोधानें हंसून म्हटलें.

" निराळे नाहीं तर काय ? आमच्यांत आणि हिंदूंत काय समान आहे ? आमचे आणि त्यांचे कोणते हितसंबंध सारखे आहेत ? हिंदुत्वाचा असा कोणता हक्क आम्हांला मिळाला आहे कीं, ज्याच्या अभिलाषानं आम्हीं स्वतःला हिंदु म्हणवून घ्यावं ? आमचा आणि त्यांचा समाज एक नाहीं, धर्मग्रंथ एक नाहींत, देवळं एक नाहींत, फार काय मेल्यानंतर शेवटची गति घेण्याचं स्मशानसुद्धां एक नाहीं. परमेश्वर आणि मृत्यु यांच्यापुढें सर्व मनुष्यप्राणी सारखे असल्याचं जें अत्यंत उदात्त तत्त्व इतर सर्व धर्मांनीं आचरणांत आणलं आहे, तें अमान्य करून हिंदु धर्मानं आपल्या दुष्ट विषमतेनं त्या दोहोंच्या गांभीर्याला आणि पावित्र्याला नाट लावला आहे. आमचा आणि हिंदूंचा असा कोणता लागाबांधा आहे कीं, ज्यामुळं आम्हीं स्वतःला हिंदु म्हणवून घ्यावं— "

" तूं अगदीं मुसलमानांसारखं बोलून राह्यला आहेस आज, अभि—"

" बरोबर आहे. कां बोलूं नये ? हिंदूंनीं आपल्या धर्मांत आणि समाजांत आम्हांला कधींहि थारा दिला नाहीं, अजूनहि त्यांना थारा देण्याची इच्छा होत नाहीं. एका गांवांत आणि एका शहरांत राहणारे हिंदु आणि मुसलमान हे जितके

एकमेकांपासून विभक्त असतात, त्यांचे आचारविचार जितके एकमेकांपासून विभिन्न असतात, तितकेच आम्ही हिंदूंपासून विभक्त आहोंत, आमचेहि आचारविचार विभिन्न आहेत. म्हणून मुसलमानांचं जसं या हिंदुस्थानांत हिंदूंहून अगदीं वेगळं असं स्वतंत्र राष्ट्र आहे, तसंच आमचंहि हिंदूंहून वेगळं असं स्वतंत्र राष्ट्र आहे––"

" तूं अगदीं विचार केल्याशिवाय बोलतो आहेस, अभि. मुसलमान हे सांस्कृतिक दृष्टया हिंदूंहून जसे कांहीं बाबतींत भिन्न आहेत, तसे कांहीं तुम्ही भिन्न नाहीं. तुम्ही या हिंदभूमीचे खरे हक्कदार आहांत, हा हिंदुस्थान हें मूळचं तुमचं वतन आहे, या भूमीवर अग्रजन्माचा वारसा तुमचा आहे––"

" अगदीं खरी गोष्ट. पण आमच्या मागून आलेल्या वैदिक आर्यांनीं आमच्या या मायदेशांत आम्हांला त्याज्य आणि बाह्य ठरवून टाकलं. आमचं वतन आणि वारसा जबरदस्तीनं हिरावून घेतला. तें आमचं वतन आणि तो आदिवासाचा वारसा परत मिळविण्यासाठीं, तो अग्रजन्माचा हक्क या भूमीवर पुन्हा स्थापन करण्यासाठीं आम्हाला हिंदूंशीं झगडायचंय––"

" खुशाल झगडा ! पण स्वतःच्याच देशांत, स्वतःच्याच घरांत आपलं स्वतंत्र वेगळं राष्ट्र स्थापन करण्याची विसंगत भाषा मग कशाला बोलतां ! मुसलमान सांस्कृतिक दृष्टया हिंदूंहून थोडे निराळे असले, तरी त्यांनाहि आपण दुसरे वेगळें राष्ट्र आहोंत ही भाषा बोलण्याचा हक्क नाहीं. कारण, तेहि या भूमीचे वंशज आणि वारस आहेत. पण तुम्हां अस्पृश्यांच्या तोंडीं तर हिंदूंहून आपलें वेगळें असें स्वतंत्र राष्ट्र असल्याची भाषा अगदीं विसंगत दिसते–– "

" मुळींच विसंगत नाहीं. अगदीं सुसंगत आहे आमची मागणी. हिंदु आणि मुसलमान हे दोघेहि आमच्या मागून आले या देशांत. त्यांना आम्ही जा म्हणत नाहीं; घालवून देण्याचाहि आमचा विचार नाहीं. आम्ही फक्त एवढंच म्हणतों कीं, हजारों वर्षे तुम्ही या देशांत नांदलांत, त्याची बरीवाईट संस्कृति घडवलीत, तेव्हां हा देश हें तुमचेंहि आतां घर झालें आहे. म्हणून तुम्ही या घरांत नांदा. पण आम्हांलाहि आमच्या लोकसंख्येच्या प्रमाणांत तिसरें स्वतंत्र राष्ट्र म्हणून या घरांत वांटा द्या. अगदीं साधी, स्वाभाविक आणि सुसंगत आहे आमची ही मागणी–– "

" सुसंगत नाहीं आणि स्वाभाविकहि नाहीं. हिंदूंहून तुमचा धर्म आणि तुमची संस्कृति जर भिन्न असती, तर या मागणीला कांहीं अर्थ, कांहीं आधार होता. पण, हिंदूंनीं तुम्हांला त्याज्य आणि बाह्य म्हणून वागवले असले, तरी त्यांचा धर्म आणि

संस्कृति यांचेच तुम्ही वांटेकरी झालां आहांत; हजारों वर्षें हिंदुत्वाच्या संस्कारांतच तुम्ही वाढलां आहांत—"

"निखालस खोटी गोष्ट. आम्हांला आज स्वतःचा धर्म नाहीं आणि स्वतःची संस्कृतिहि नाहीं. आमचा जो काय धर्म किंवा संस्कृति पूर्वी असेल, ती सारी हिंदूंनीं नष्ट करून, गाडून टाकली आहे. अजगरानें गिळलेला पण पचनीं न पाडलेला प्राणी जसा त्याच्या पोटांत अर्धमेला लोळागोळा होऊन रहातो, तसे आज या अवाढव्य हिंदु समाजाच्या पोटांत मृतप्राय स्थितींत आम्ही सडत पडलों आहोंत. त्या अवस्थेंतून मुक्त होऊन स्वतःचें स्वतंत्र राष्ट्र आणि स्वतंत्र संस्कृति निर्माण करण्यासाठीं आम्ही आमच्या या पुरातन मायभूमींत वेगळ्या अस्तित्वाचा वाटा मागत आहोंत-- "

अभिमन्यु इतक्या आवेशानें बोलत होता कीं, रस्त्यांतले लोक त्या एकमेकांच्या खांद्यावर हात ठेवून सायकल दौडीत जाणाऱ्या मित्रांकडे कुतूहलानें पहात होते. पण लोकांच्या कुतूहलाचा आणि कुचेष्टेचाहि विषय आपण या बडबडीमुळें झालों आहोंत, याची त्या दोघांना मुळींच जाणीव नव्हती. सीताबर्डीच्या पुलापाशीं तो आल्यावर अवधूत एकदम भानावर आला आणि अभिमन्यूला म्हणाला—

"आतां कुठं जायचं आपण तें ठरव पहिल्यांदा. मागाहून वाद घालूं रस्त्याला लागल्यावर—"

"तूंच ठरव—"

"मला वाटतं, आपण प्रथम सिराजकडे जाऊं या. आणि मग तिथून तेलंखेडीवर किंवा सिनेमाला जाऊं—"

"पण सिराजकडे जाऊन काय करणार या वेळीं? तो कदाचित् आतां घरीं सुद्धां नसेल. इतक्या संध्याकाळीं कोणी घरीं बसून रहातो का?--"

"नाहीं रे. तो बहुधा आपलं तें धर्मराजाच्या स्वर्गारोहणाचं चित्र पुरं करण्याच्या गडबडींत असेल. यंदा त्याला तें मुंबईच्या कलाप्रदर्शनांत ठेवण्यासाठीं पाठवायचं आहे. तो खात्रीनं घरीं असेल या वेळीं-- "

"मग कशाला त्याला त्रास द्यायचा उगाच? त्यापेक्षां आपण तेलंखेडीवर जाऊं या-- "

"नको, त्याला घेऊनच जाऊं आपण तेलंखेडीवर-- "

"बरं बाबा. तुझा आग्रहच असेल तर चल—"

आणि त्यांनीं आपल्या सायकली धंतोलीच्या रस्त्याला वळविल्या.

ते जेलरोडवर आले, त्या वेळीं सूर्य मावळत होता. पश्चिमेकडलें सगळें क्षितिज गडद काळ्या तांबड्या रंगांनीं चोपडल्यासारखें दिसत होतें. मात्र आकाशाचा मधला भाग अगदीं निरभ्र असून, त्याचा सतेज नीलिमा मनाला आल्हाद देत होता. पश्चिम क्षितिजावरील दोन काळ्या रेषांतून तळपणाऱ्या पिवळ्या पिवळ्या सूर्य बिंबाचा प्रकाश नांगरलेल्या ओल्या जमिनीवर पडून तिच्यांतून वर येत असलेले हिरवे हिरवे रोपे टवटवीत दिसत होते. त्या दोन गडद रेषांमधलें तें हंसरे सूर्यबिम्ब म्हणजे जगाकडे कृपादृष्टीनें पहाणाऱ्या वर्षाऋतूचा नेत्रच होता जणुं कांहीं; व मधून मधून जो एकाददुसरा पाण्याचा थेंब टपकन् अंगावर पडे, तो त्या नेत्रांतील करुणाश्रु सारखा वाटे. भुईच्या काळ्याभोर सपाटीवर कुठें कुठें दिसूं लागलेल्या रोपांचा नाजूक हिरवा रंग, शेतांतील बांधावर उगवलेलें दाट हिरवें गवत, दूर क्षितिजालगतची काळसर दिसणारी झाडी आणि सायंप्रभेंतून तळपत उडत जाणाऱ्या बगळ्यांच्या पांढऱ्या रांगा–तें सगळें दृश्य आषाढाचें आर्द्र, उत्कंठापूरित सौंदर्य हळुवारपणानें व्यक्त करित होतें.

जेलरोडच्या अगदीं टोकाला जो नवीन धर्तीचा सुंदर बंगला होता, त्याच्या लोखंडी फाटकांतून ते दोघे आंत शिरले. त्याबरोबर कमानीखालीं उभा असलेला चपराशी पुढें आला आणि त्यांच्या सायकली हातांत घेऊन म्हणाला--

" छोटे साहेब वरती माडीवर आहेत आपल्या कमऱ्यांत-- "

ते अगदीं हलक्या पावलांनीं जिना चढून वर गेले आणि गच्चीला लागून असलेल्या उजवीकडल्या खोलींत त्यांनीं प्रवेश केला.

ती खोली चांगली प्रशस्त होती. पण तीत ठिकठिकाणीं छोटया टेबलांवर पुतळे, चित्रें, नक्षीदार भांडीं वगैरे इतक्या कलाकृति ठेवलेल्या होत्या कीं, आंत जाणाराला ती खोली आटपसरच वाटे. भिंतीवर सर्वत्र नखचित्रें, जलचित्रें, रंगचित्रें, तैलचित्रें, रेषाचित्रें वगैरे लावलेलीं होतीं; व नदीकिनारीं सांपडणारे चकचकीत दगड आणि शिंपले यांच्यावर काढलेलीं लहान नाजूक चित्रें खिडक्यांतून ठेवलेलीं होतीं. खिडक्यांवर सोडलेल्या मण्यांच्या सुंदर पडद्यांतून मावळत्या सूर्याचा जो सौम्य प्रकाश आंत येत होता, त्यांत ती खोली एखाद्या विस्कळीत सुरम्य स्वप्नासारखी दिसत होती. खोलीच्या एका कोंपऱ्यांत दिलरुबा, वायुलीन वगैरे वाद्यें गवसणी चढवून उभीं केलेलीं होतीं; व दुसऱ्या कोंपऱ्यांत प्रकाशाला सोईस्कर अशा रीतीनें

जो घोडा उभा केलेला होता, त्याच्या जवळ उभा राहून सिराज आपल्या हातांतील कुंचल्यानें त्या घोड्यावर ठेवलेल्या चित्रफलकावर काम करित होता. त्याच्या अंगांत पांढरीं नाजूक फुलें काढलेला तलम रेशमी हाफशर्ट होता; व बोहरी लोक घालतात तशी जाळीची पांढरी टोपी त्यानें घातली होती.

तो अगदीं तन्मयतेनें त्या चित्रावर काम करित होता. फक्त स्वतःला ऐकूं येईल अशा सुरेल आवाजांत त्याची सारखी गोड गुणगुण काम करतांना चालू होती—

वह गूल हूँ मैं कि तेरा रंग जिससे जाहर है
वह गुनचा हूँ कि बगल में है जिसके बू तेरी

तें चित्र आणि तें गीत यांच्याशिवाय दुसऱ्या कशाचेंहि त्याला भान नव्हतें.

फलकावरील धर्मराजाच्या स्वर्गारोहणाचें तें चित्र बहुतेक पूर्ण होत आलेलें होतें. आकाश आणि पृथ्वी यांचें जिथें मीलन झालेलें आहे, अशा हिमालयाच्या रजतशुभ्र शिखरावर धर्मराज वाट चालत आहे; त्याच्या मागून फक्त एक कुत्रा येत आहे; व त्याचे बंधु आणि द्रौपदी हीं हिमराशीवर एकामागून एक गतप्राण होऊन पडलीं आहेत, असें दृश्य त्या चित्रांत रेखाटलेलें होतें.

ते दोघे हळूच त्याच्या मागें येऊन उभे राहिले. पण तो आपल्या कामांत इतका कांहीं व्यग्र होता कीं, ते आपल्या जवळ येऊन उभे राहिले असल्याचें त्याच्या कांहीं ध्यानांत आलें नाहीं.

त्याचें लक्ष कदाचित् त्यांच्याकडे लवकर गेलें नसतें. पण खोलींत इतका वेळ रेंगाळत असलेला संधिप्रकाश आतां लोपूं लागल्यामुळें, तो दिवा लावण्यासाठीं मागें वळला. त्याबरोबर अवधूतच्या पायावर त्याचा पाय पडला.

तेव्हां एकदम ओशाळून अवधूतला त्यानें हिंदींत म्हटलें--

" माफ कर भाई अवधूत— "

" तुझीच उलट माफी मागितली पाहिजे आम्ही, सिराज. कारण आमच्या येण्यामुळें तुझ्या कामांत व्यत्यय आला-- "

" व्यत्यय कसला आला आहे रे ! कॉलेज सुरू होण्याच्या आधीं या दोन तीन

---

* ' तुझा रंग व्यक्त करणारें मी एक फूल आहे. तुझा सुवास ज्यांत आहे ती मी कलिका आहें. '

दिवसांत हें चित्र पुरं करण्यासाठीं धडपड चालली आहे माझी. तुम्ही आल्यामुळं तेवढीच विश्रांती मला-- "

त्यानें हातांतील कुंचला खालीं ठेवून रुमालानें हात पुशीत म्हटलें.

नंतर त्यानें झट्दिशीं आपली वेताची वाटोळी बैठक त्यांच्या कोचाला आणून भिडवली आणि खोलीच्या मध्यभागीं लोंबत असलेलें बटन दाबून तो म्हणाला--

" थांबा, मी कॉफी सांगतों आधीं तुमच्यासाठीं-- "

तो त्या बैठकीवर बसतो न बसतो, तोंच एक चपराशी आंत येऊन अदबीनें सलाम करून उभा राहिला.

त्याला सिराजनें गुजरातींत म्हटलें,—

" तीन कप कॉफी न् पान आण लवकर-- "

" जी-- "

चपराशी मागल्या मागें निघून जातांच अवधूतनें म्हटलें--

" सिराज, आज कांहीं कॉफी, पान न् तुझं मिठ्ठास बोलणं याच्यावर भागणार नाहीं आमचं-- "

" मग काय हवंय् बोला. जेवायचा बेत आहे का माझ्याबरोबर? म्हणजे आतांच खानसाम्याला निरोप पाठवतों-- "

सिराजनें हंसत हंसत म्हटलें.

" नाहीं. तूं आज बाहेर आलं पाहिजेस आमच्याबरोबर-- "

अवधूतनें तें वाक्य उच्चारतांच सिराजच्या विरळ बांकदार भुवयांच्या मधोमध दोन बारीक उभ्या आंठ्या पडल्या. तेव्हां अभिमन्यु म्हणाला--

" तो यायचा नाहीं, अवधूत. मीं तुला मघांशींच म्हटलं होतं. तो कांहीं आपल्यासारखा रिकामटेकडा नाहीं. आंतरराष्ट्रीय कीर्तीची हांव आहे त्याला—"

" आणि तुम्ही काय कमी महत्त्वाकांक्षी आहांत का रे? अवधूत बॅरिस्टर होण्यासाठीं इंग्लंडला जायचाय; न् तुझा तर एव्हांपासून डोळा आहे दिवाण-गिरीवर-- "

" माझ्या विलायतेला जाण्याची गोष्ट तूं सोडून दे आतां, सिराज--"

" का रे?-- "

" गेलीं चार वर्षं कापसाला भाव नाहीं. त्यामुळं दादा रंजीस आले आहेत

अगदीं. शिवाय गिरणींतहि भानगडी चाल्लंच आहेत. अशा स्थितींत मी कसा विलायतेला जाणार ?— ”

“ अरे, पण काका नाहीं का तुझे मदत करणार कांहीं ?— ”

“ छे ! ती आशाच करायला नको. दादानाच उलट त्यांना मदत करावी लागते. त्यामुळें आतां विलायतेला जाण्याची गोष्ट काढली म्हणजे दादा अगदीं चिडून म्हणतात, “ विलायतेहून बॅरिस्टर होऊन आल्यानं पैसे मिळवण्याची तर अक्कल येत नाहींच. पण विलायतेहून खर्चिक व्यसनं मात्र शिकून येतात भलभलतीं ! ” माझं इथलं शिक्षण पुरं झालं तरी मिळवली असं म्हणण्याची पाळी आली आहे अलिकडे खरोखरी-- ”

“ तूं उगाच इतका नाउमेद झाला आहेस, अवधूत. तुम्हां मालगुजारांची स्थिति आम्हां दुकानदारांपेक्षां केव्हांहि चांगली रहाते. जमीन ही चीज अशी आहे कीं, तिच्यांत जें पेरावं तें शतपट होऊन उगवतं— ”

“ तें सगळं एका काळीं खरं होतं. पण आतां नाहीं. परंतु आपला हा अभि मात्र दिवाण होणार एक दिवस हें नक्की— ”

“ करा बाबांनो थट्टा ! इतके दिवस आम्हांला दडपून ठेवून पुन्हा आतां अशा मानभावीपणानें बोलायला तुम्हांला कांहीं वाटत नाहीं— ”

“ तूं याला डिवचलेला दिसतो आहेस आज, अवधूत— ”

“ याला डिवचण्याची गरज नाहीं. याची नांगी सदोदितच उगारलेली असते. आज रस्त्यानं येतांना हा इतक्या जोराजोरानं माझ्याशीं भांडत होता कीं, रस्त्यांतले लोक बघत होते आमच्याकडे आम्हांला वेड लागलं कीं काय म्हणून— ”

“ पण वादाचा मुद्दा काय होता ?— ”

“ मुद्दा नेहमींचाच. तुम्ही मुसलमान अलिकडे आपलं स्वतंत्र दुसरं राष्ट्र असल्याचा प्रचार करून राह्यला आहांत ना ? तसा यानं आपलं तिसरं स्वतंत्र राष्ट्र असल्याचा दावा सुरू केला आहे— ”

“ खोटी आहे का ही गोष्ट, सिराज ? तूंच पहा. कोणत्याहि स्टेशनवर जा. तियं हिंदु चाय न् इस्लामी चाय अशा पाटया असतात. पिण्याच्या पाण्याचीसुद्धां वेगळी व्यवस्था. या तुमच्या वेगवेगळ्या व्यवस्थेंत तुम्ही दोघेहि आम्हांला थारा देत नाहीं. तुमच्या दोघांच्याहि दृष्टीनं आम्ही त्याज्य, हीन. माणूस म्हणून आम्हांला कांहीं

अस्तित्वच नाहीं तुमच्या हिशेबीं. मग आम्ही तुम्हां दोघांच्या बरोबरीनं तिसरं राष्ट्र स्थापन करण्याची भाषा कां बोलूं नये ? ”

“ हें पहा अभि, मी मुसलमान असलों तरी मुसलमानांचं हिंदूंहून मूलतः भिन्न असं कांहीं वैशिष्ट्य आहे न् त्याचं जतन करण्यासाठीं हिंदूंपासून फुटून निघून आम्ही अजिबात स्वतंत्र झालं पाहिजे, असं कांहीं वाटलं नाहीं मला कधीं. उलट, इस्लामचा मला उत्कट अभिमान असला, तरी माझं रक्त मूळचं गुजराती भाटियाचं आहे, माझा पिंड भारतीय संस्कृतींत पोसलेला आहे, याची जाणीव आहे मला तितक्याच उत्कटतेनं. तसंच, तुझ्या लोकांनीं आपण हिंदूंहून भिन्न असल्याचा कितीहि अट्टाहास केला, तरी हिंदुत्वाचे संस्कार तुमच्या रोमरोमीं इतके भिनलेले आहेत कीं, तुम्ही अंतर्यामीं खरोखरी हिंदूच आहांत. म्हणून तिसऱ्या राष्ट्राची भाषा मुळींच बोलतां कामा नये तुम्ही— ”

यावर अभिमन्यु त्याला कांहीं उत्तर देणार, तोंच कॉफीचे पेले असलेला ट्रे चपराशानें आणला; व तो मधल्या कांचेच्या टेबलावर ठेवला. त्या पेल्यांवर रंगीबेरंगीं चित्रें होतीं; व ट्रेवर जों रुमाल घातला होता, त्यावरहि रेशमी फुलांचें नाजूक काम केलेलें होतें.

सिराजनें ते पेले त्यांच्या हातीं दिले आणि कॉफीचा एक घोट घेतल्यावर तो एकदम आठवल्यासारखें करून म्हणाला—

“ हें बघ अभि, तुझ्या या तीन राष्ट्रांच्या वादावरून एक कल्पना आली आहे माझ्या मनांत. मी सध्या घारापुरीच्या लेण्यांतल्या त्रिमूर्तीचं स्केच मुंबईच्या प्रदर्शनासाठीं तयार करून राह्यलों आहे. त्या त्रिमूर्तीचीं एकाच धडावरलीं तीन मस्तकं म्हणजेच हिंदु, मुसलमान आणि अस्पृश्य असं प्रतीक कल्पून ‘ त्रिराष्ट्र-वाद ’ असं नांव त्या चित्राला द्याव असं येतंय माझ्या मनांत—”

बोलतां बोलतां त्यानें झटकन त्या घोड्याजवळ जाऊन त्याच्यावरलें धर्माच्या स्वर्गारोहणाचें चित्र काढलें; व त्रिमूर्तीचा चित्रफलक त्या घोड्यावर ठेवून त्याच्या वरला पडदा बाजूला केला.

ते दोघेहि त्या चित्राकडे टक लावून पहात होते. पाहतां पाहतां अवधूत म्हणाला—

“ सिराज, तुझी त्रिराष्ट्रवादाच्या प्रतीकाची ही कल्पना सुंदर आहे फार. हें तुझं चित्र भारताच्या प्राचीन विच्छिन्न संस्कृतीच्या सध्यांच्या स्थितीचं उत्कृष्ट

प्रतीक होईल. एका धडावरलीं तीन मस्तकें आणि तीं अगदीं परस्परविरुद्ध दिशेला वळलेलीं ! अत्यंत उपरोधपूर्ण प्रतीक होईल हें; न् तूं तें निर्माण करावंस. यांतहि औचित्य आहे एक प्रकारचं. तुला काय वाटतं, अभि !—"

अभिमन्यु कांहीं बोलला नाहीं.

" त्याला कशाला विचारतोस, अवधूत ? तो उत्तर द्यायचा नाहीं तुला ! सध्यां तिसरें राष्ट्र स्थापन करण्याचा जोष संचरलाय् त्याच्या अंगांत. पण मी देतों उत्तर तुला. आपली तिघांची गेल्या पांच वर्षांची गाढ मैत्री हें अत्यंत समर्पक उत्तर आहे या त्रिराष्ट्रवादाला--"

सिराजनें त्या चित्रावर पडदा टाकीत म्हटलें.

## दृष्टादृष्ट

## ८

हिराबरोबर ते दोघे जेव्हां मिशनच्या आवारांत गेले, तेव्हां व्हरांड्यांतील वेताच्या बैठकीवर बसून आपल्या भोंवतालीं जमलेल्या भिकारणींशीं बोलत असलेली सिस्टर ख्रिश्चियाना त्यांच्या दृष्टीस पडली.

ते जवळ येतांच ती उठून उभी राहिली आणि हंसून इंग्रजींत म्हणाली—

" गुड ईव्हनिंग, मित्रांनों ! आपलं काय काम आहे !— "

तेव्हां हिरानें झटकन् पुढें होऊन म्हटलें—

" अम्माजी, हे मिशन पाह्यला आले आहेत आपलं. हा माझा भाऊ आहेच आपल्या ओळखीचा. हे त्याचे स्नेही अवधूत देशपांडे. हे मॉरिस कॉलेजांत त्याच्या-बरोबर आहेत बी. ए. च्या वर्गात— "

सिस्टरनें हस्तांदोलनासाठीं हात पुढें केला आणि म्हटलें—

" फार आनंद झाला आपल्या भेटीनं. आपल्यासारख्या तरुणांना आमचं हें काम पहाण्याची इच्छा व्हावी हें सुचिन्ह समजतें मी खरोखरी. आपली हिंदु मंडळी लक्ष देत नाहींत असल्या कामाकडे सहसा— "

आणि ती हिराकडे वळून मराठींत म्हणाली—

" तुला तर माहित आहे इथलं सगळं. मग तूं यांच्याबरोबर हिंडून यांना सगळं दाखवतेस का मी आलं पाहिजे ?— "

हिरानें घुटमळून अवधूतकडे पाहिलें. तो चटदिशीं सिस्टरला मराठींत म्हणाला—

" आपण स्वतः याल तर उपकार होतील आमच्यावर. आपल्यामागें काम फार आहे, हें जाणून आहोंत आम्ही. पण आपण जें सांगूं शकाल, तें हिला सांगतां येईल असं वाटत नाहीं आम्हांला— "

" बरं, ठीक आहे-- "

सिस्टर म्हणाली. लगेच तिनें मागें वळून हिंदींत त्या भिकारणींना कांहीं तरी सांगितलें. आणि ती त्यांच्याबरोबर चालावयाला लागली.

" आपण इतकं चांगलं मराठी बोलतां याचं आश्चर्य वाटतं मला-- "

अवधूतनें तिच्याकडे वळून म्हटलें.

त्याबरोबर ती एकदम थबकली आणि हातांतली जपमाळ कपाळापर्यंत नेऊन त्याच्याकडे पहात उद्‌गारली—

" कां बरं ? आपण मला कोण समजतां ? मी सुद्धां आपल्याप्रमाणं महाराष्ट्रीय आहे-- "

" काय, आपण महाराष्ट्रीय आहांत ? महाराष्ट्राच्या कोणत्या भागांतल्या ? "

" मी गोंव्याची आहे-- "

" आपण स्वतः ख्रिस्ती झालांत ?-- "

" नाहीं. सेंट झेवियरच्या वेळीं आमचं घराणं ख्रिस्ती झालं. आमचं आडनांव पणशीकर. माझा धाकटा भाऊ या प्रांतांत सिव्हिल सर्जन आहे. त्यामुळं हें नांव कदाचित् ऐकलं असेल तुम्ही-- "

" हो. वर्ध्याला एक डॉ. पणशीकर होते सिव्हिल सर्जन चार पांच वर्षांपूर्वी. पण, आम्ही त्यांना गोवानीज समजत होतों न् ते मराठी चुकून सुद्धां बोलत नसत-- "

" गोवानीज म्हणजेच गोव्याचे, " सिस्टरनें हंसून म्हटलें. " त्याला मराठी बोलतां येत नाहीं चांगलं. तो कोकणी छान बोलतो. पण मी महाराष्ट्रीय आहे म्हणून मराठी बोलूं शकतें असं मात्र समजूं नका तुम्ही. इथल्या सगळ्या सिस्टर फ्रेंच आहेत. पण त्या बहुतेक मराठी बोलतात. आणि सदरमध्यें जें आमचें कॅथेड्रल आहे, तिथले आमचे बिशपसाहेब हे तर छानच मराठी बोलतात. त्यांच्या मानानं इथल्या सिस्टरनांच मराठी नाहीं चांगलं बोलतां येत तितकसं-- "

" कां बरं ?-- "

" आमचे बिशपसाहेब गेलीं तीस वर्षं वऱ्हाडांत राहलेले आहेत. त्यामुळं त्यांचा अहोरात्र मराठीशीं संबंध होता. पण या नागपुरांत तसं नाहीं. इथं मराठीपेक्षां हिंदीच जास्त कानांवर पडतं. तुम्ही मराठी लोक आपल्या भाषेची काळजी घेत नाहीं. त्यामुळं नागपुरांतून मराठी हटत चालली आहे हळूहळू-- "

" पण आपल्या या मिशनचं काम तर मराठींत चालत असेल ना !-- "

" नाहीं. मराठी न् हिंदी दोन्ही भाषांतून चालतं. आम्ही रविवारच्या प्रार्थनासुद्धां दोन्ही भाषांतून आळीपाळीनें करितों. कारण, इथल्या लोकांत मराठीपेक्षां हिंदी समजणारेच लोक जास्त आहेत. त्यामुळं आमच्या सिस्टरसुद्धां हिंदींतून सारा व्यवहार करतात. हा सगळा आपल्या भाषेविषयींच्या तुमच्या अनास्थेचा परिणाम आहे असं नाहीं वाटत तुम्हांला !-- "

" हो. पण मला कल्पना नव्हती या गोष्टीची आजवर-- "

" अगदीं लहानसहान गोष्टी आहेत या. पण, राष्ट्रं जीं हटत जातात, मागं पडत जातात, तीं असल्या सगळ्या लहानसहान गोष्टींमुळंच. आपली हळुहळू पिछेहाट होत आहे हें कांहीं प्रथम त्यांच्या लक्षांत येत नाहीं; न् मग एकादे दिवशीं एकदम त्यांना जाणीव होते आपलं किती नुकसान झालंय याची. तुम्ही समुद्राची ओहटी पाहिलेली नसेल कधीं. ओहटीच्या वेळीं समुद्र जेव्हां मागं हटायला सुरवात होते, तेव्हां प्रत्येक लाटेगणिक तो थोड थोडा मागं हटतो आहे हें ध्यानांतच येत नाहीं किती तरी वेळ ! तसाच प्रकार आहे हा-- "

" खरं आहे आपलं म्हणणं-- "

" गेलीं तीस वर्षें मी नागपुरांत काम करतें आहे. त्या माझ्या अनुभवावरून मी सांगूं शकते कीं, या शहरांत मराठीची सारखी पिछेहाट होत आहे. परप्रांतांतले जे लोक येतात न् इथं स्थायिक होतात, ते मराठीपेक्षां हिंदींतून बोलणं पसंत करतात. त्यामुळं व्यवहारांत हिंदीचा प्रसार जास्त होतो आहे—"

" हो. कॉलेजांत तरी तसा अनुभव येतो खरा. मद्रासी, बंगाली, पारशी वगैरे मुलं मराठींतून चुकून कधीं बोलत नाहींत. सर्रास हिंदी बोलतात—"

" हा सगळा आपल्या गाफिलगिरीचा परिणाम आहे. युरोपांत असं कधीं व्हायचं नाहीं. जर्मनीच्या ताब्यांत गेलेल्या अल्सेस-लॉरेन प्रांतांत आपली फ्रेंच भाषा कायम रहावी म्हणून फ्रेंचांनीं आणि फ्रान्सच्या ताब्यांत गेलेल्या न्हूर प्रांतांत आपली जर्मन भाषा कायम रहावी म्हणून जर्मनांनीं किती प्रयत्न केले हें माहित असेल तुम्हांला. आपण मराठी लोक त्या मानानं किती गाफिल आहोंत आपल्या माय भाषेच्या बाबतींत !—"

सिस्टरनें वर्णन केलेली ही वस्तुस्थिती अगदीं उघड होती. पण ती आजवर

आपल्या लक्षांत कां आली नाहीं याचें अवधूतला आश्चर्य वाटलें आणि तो थोडासा खजील झाला.

ते बोलत बोलत त्या ओवऱ्यांपाशीं आले. तेथें येतांच सिस्टर थांबली आणि सभोंवतीं नजर टाकून म्हणाली—

" इथं सर्व प्रकारचे न् सर्व जातींचे अनाथ, अपंग न् रोगी आहेत. पलिकडे टोंकाला जें छोटेखानी घर आहे, त्यांत महारोग्यांची सोय केलेली आहे आम्ही—"

त्या ओवरींतील कोठड्यांतून नाना प्रकारच्या भिकाऱ्यांनीं आपले संसार थाटलेले होते. त्यांतील एका कोठडीसमोर उभी राहून सिस्टरनें हांक मारली—

" झिंगरू, झिंगरू—"

त्याबरोबर मंगोलियन वळणाचा चेहरा असलेला एक दहा बारा वर्षांचा मुलगा रांगत रांगत पुढें झाला आणि तिच्याकडे पाहून उद्‌गारला—

" वँ, वँ अम्माजी !—"

जवळ आलेल्या कुत्र्याच्या अंगावर जसा हात फिरवावा तसा सिस्टरनें त्या मुलाच्या डोक्यावरून हात फिरवला आणि म्हटलें—

" हा जन्मतःच असा आहे. धड वानर नव्हे, धड माणूस नव्हे. कसलीहि शुद्ध नाहीं, बुद्ध नाहीं—"

ती थोडी पुढें आली आणि त्या कोठडींत काठीच्या आधारानें उभ्या असलेल्या एका छत्तिसगडी माणसाला म्हणाली—

" तूं काय करतो आहेस, फगवा ? या बाबूंना सलाम बोल—"

तीन ठिकाणीं वांकडा असलेला पांगळा फगवा काठीच्या आधारानें खुरडत खुरडत पुढें आला आणि त्यानें पुनः पुन्हा त्यांना सलाम केला.

" याची फार इच्छा आहे लग्न करण्याची. पण मीं याला सांगितलं, तुला जर लग्न करायचं असेल, तर इथून निघून जा. आम्ही कांहीं तुझ्या बायकामुलांना पोसणार नाहीं—"

सिस्टर हें सांगत असतांनाच त्यांच्या कानावर विव्हळण्याचा चमत्कारिक आवाज आला. त्याबरोबर ती एकदम पलिकडल्या कोठडीजवळ जाऊन म्हणाली—

" दशरथ, हे बाबू आले आहेत, यांना सलाम तर बोल. मग विव्हळत रहा खुशाल. माझा आवाज ऐकल्याबरोबर विव्हळायला सुरवात केली यानं. आंधळी

माणसं सामान्यतः संतुष्ट असतात. पण याच्या जिवाला संतोष कसा तो माहित नाहीं. झिंगरूप्रमाणें हाहि धड माणूस नाहीं, धड वानरहि नाहीं— "

" पण अम्माजी, चंदन या दशरथला किती भीत असे प्रथम आठवतं ना तुम्हांला ?— "

हिरानें कौतुकानें त्या पुटपुटत असलेल्या आंधळ्या भिकाऱ्याकडे पहात विचारलें.

" हो. पण आतां तिचा पायरव ऐकल्याबरोबर हा ओरडतो, ' सलाम, चंदन-बाई ! ' म्हणून. आणि तीहि जातां येतां याला कांहींतरी देत असते. मोठा लबाड माणूस आहे हा— "

ती बोलत बोलत पुढल्या कोठडीपाशीं आली. तेथें मांडीवरील तान्ह्या मुलाला पाजीत बसलेल्या एका पोरसवदा अशक्त बाईच्या अंगाला तीन लहान लहान मुलें झोंबत होतीं.

" दर सवा वर्षानं मूल होतंय या बाईला. प्रत्येक बाळंतपणांत मरतां मरतां वाचते. मोठं चिवट हाड आहे हिचं— "

तिनें केलेलें तें वर्णन ऐकून अभिमन्यूनें चट्‌दिशीं विचारलें—

" या रोग्यांच्या आणि भिकाऱ्यांच्या बाबतींत तुम्ही संततिनियमन कां नाहीं अंमलांत आणीत ?— "

त्याचा तो प्रश्न ऐकतांच सिस्टर एकदम थबकली आणि आपले दोन्ही डोळे विस्फारून त्याच्याकडे पहात म्हणाली—

" देवानं ज्यांना जगांत पाठवायचं ठरवलंय, त्यांच्या येण्याला प्रतिबंध करणारे आपण कोण ? संततिनियमन हें निषिद्ध आहे आमच्या मतानं— "

" पण असले प्राणी जगांत येऊं द्यायचे आणि मग त्यांचं पालनपोषण करित बसायचं हा अपव्यय नाहीं का दयाबुद्धीचा आणि सेवाव्रताचा ?— "

अवधूतनें मध्येंच विचारलें.

सिस्टर क्षणमात्र थांबली. आपले दोन्ही खांदे तिनें हलवले आणि गळ्यांतला क्रॉस हातांत घेऊन म्हणाली—

" ईश्वराच्या इच्छेविरुद्ध जाणारे आपण कोण ? आपलं काम फक्त येवढंच कीं, या जगांतलं दुःख करवेल तितकं कमी करायचं, लोकांच्या दैन्याचा करवेल तितका परिहार करायचा. त्याला नांवं ठेवणारे, दुरुस्त करण्याचा आव आणणारे आपण कोण ? आपला सूळ आपण मुकाटयानें वाहिला पाहिजे—"

ती ज्या नितान्त श्रद्धेनें बोलत होती, त्या श्रद्धेचा अंत पहाण्यांत अर्थ नाहीं, असें अवधूतच्या मनांत आलें. तरीसुद्धां तो म्हणाला—

"तुमच्या श्रद्धेच्या दृष्टीनं ठीक आहे हें सगळं. पण रोग्यांना आणि अपंगांना संतति होऊं देणं न् नंतर ती पोशीत बसणं हा मला धर्मबुद्धीचा अपव्यय वाटतो, एक सामाजिक गुन्हा वाटतो—"

"चुकतां तुम्ही! प्रभू प्रेममय आहे आणि प्रेमाची सर्वांत जास्त गरज दीन अपंगांना असते. प्रभूच्या प्रेमाला भेदाभेद माहित नाहीं. त्याच्या दयेचा मेघ सगळ्यांवर सारखाच वरसतो—"

सिस्टरनें आपल्या हातांतली माळ कपाळाला लावून म्हटलें आणि आपले करुणेनें ओथंबलेले काळेभोर डोळे त्यांच्या तेजस्वी पिंगट डोळ्यांना भिडवून ती हंसली.

तिचें तें हास्य इतकें कांहीं प्रेमळ होतें, श्रद्धा आणि सौजन्य यांनीं इतकें कांहीं ओतप्रोत भरलेलें होतें कीं, तिच्याशीं बुद्धिवाद घालण्याची अवधूतची सारी ईर्ष्या विरघळून गेली. त्यानें शेवटीं तिला एवढेंच विचारलें—

"या असल्या कुश्चळ, रोगट, घाणेरडया लोकांत तुम्ही अहोरात्र राहातां त्याचा तुमच्या मनावर कांहीं अनिष्ट परिणाम होत नाहीं?—"

"अनिष्ट परिणाम? कां व्हावा?" सिस्टरनें त्याच्याकडे आश्चर्यानें पाहून विचारलें. "आमच्या प्रभूनं म्हटलंय कीं, रोग्यांना आणि दलितांना माझी गरज आहे. तें त्याचं वचन आचरणांत आणण्याची जबाबदारी आमच्यावर नाहीं का? ज्यानं महारोग्याचा स्पर्श अमंगळ मानला नाहीं, त्या प्रभूचे जे स्वतःला अनुयायी म्हणवतात, त्यांना महारोग्यांची सेवा करतांना खंत कां वाटावी? आम्ही हें काम करतों, तें प्रभूचं काम, त्यानं नेमून दिलेलं काम म्हणून करतों. या दयेनं आमचीं हृदयं उन्नत होतात, जीवन सफल होतं—"

अवधूत कांहीं बोलला नाहीं. त्यानें विषय बदलण्यासाठीं एकदम विचारलें—

"ही इतकी मोठी जागा मिशनला कशी मिळाली?—"

"या जागेंत पूर्वी भोसले राजांचा उंटखाना होता. ज्या या ओवऱ्यांत आज भिकारी रहातात, त्यांत पूर्वी भोसल्यांचे उंट बांधले जात असत. त्यांनीं ही जागा आम्हांला दिली. गेलीं पन्नास वर्षं आमचं मिशन काम करतंय इथं—"

सिस्टरनें सांगितलेला तो त्या जागेचा इतिहास ऐकून अवधूतच्या मनाला धक्का बसला. त्या भागाला उंटखाना म्हणतात, हें त्याला माहित होतें. पण खुद्द भोस-

त्यांच्या उंटखान्यांत हें मिशन आणि हा कंगालखाना असेल, अशी कल्पना कांहीं त्याच्या मनांत आलेली नव्हती. त्यामुळें ती माहिती ऐकून तो चरकल्यासारखा झाला.

त्या ओवऱ्या पाहून झाल्यावर सिस्टरनें विचारलें—

" आतां आणखी काय पाह्यची इच्छा आहे तुमची ?—"

" आपण दाखवाल तें—"

" मग प्रथम आतां तुम्ही ' अवर लेडी ऑफ लूर्ड्स'चं दर्शन घ्या—"

आणि तिनें त्यांना त्या गुहेपाशीं आणलें.

ती कृत्रिम गुहा आणि तिच्यांत उभा असलेला तो पुतळा पाहून अवधूतनें विचारलें—

" ही कुणाची मूर्ति आहे ?—"

" मरिया माऊलीची. फ्रान्समध्यें लूर्ड्स नांवाच्या खेड्याजवळ रानांत ओढ्याकाठीं असलेल्या गुहेंत एका गरीब चक्कीवाल्याच्या मुलीपुढें आमच्या प्रभूची ही माता प्रगट झाली आणि तिला म्हणाली, ' मी अनघसंभवा ( Immaculate conception ) आहे. ' त्या खेडवळ मुलीला झालेला हा मेरीचा साक्षात्कार आमच्या धर्मांत अत्यंत महत्त्वाचा समजला जातो. तें दर्शन आहे हें प्रभूच्या मातेचं—"

" तुमची ही अनघसंभवाची कल्पना आमच्या पुराणांतल्या अयोनिसंभवासारखीच दिसते. पण, मी एक प्रश्न विचारला आपल्याला तर आपण राग मानतां कामा नये, सिस्टर—"

" कोणता प्रश्न ?—"

" आपले मिशनरी आम्हा हिंदूंच्या मूर्तिपूजेवर टीका करतात नेहमीं. पण अश तऱ्हेचे पुतळे उभारून त्यांची पूजा करणं हा सुद्धां मूर्तिपूजेचाच एक प्रकार नव्हे का ?—"

" नाहीं. आम्ही प्रत्यक्ष परमेश्वराची कधीं मूर्ति स्थापन करून पूजा करित नाहीं तिची. येशू आणि मेरी हीं देवतुल्य खरीं. पण माणसंच होतीं तीं. त्यांचे पुतळे उभारून त्यांचा गौरव करणं म्हणजे ईश्वराची मूर्तिपूजा नव्हे, फार कशाला, देवापाशीं त्याच्या पुत्राचा जो अधिकार आहे, तो मेरीचा आहे, असं सुद्धां समजत नाहीं आम्ही; न् म्हणून तिची प्रार्थना करतांना, ' तूं आमच्यासाठीं आपल्या पुत्राजवळ रदबदली कर, ' असंच म्हणतों आम्ही. ' हमारे लिये प्रार्थना करो, ' अशी

भाक असते आमची तिच्यापाशीं. तुम्ही हिंदु मुळीं परमेश्वराच्याच नाना प्रकारच्या काल्पनिक मूर्ति तयार करून त्यांची पूजा करतां— ''

हिराला त्या चर्चेचा कंटाळा आला होता. म्हणून ती मध्येंच म्हणाली—

" अद्याप देऊळ पाह्यचंय आपल्याला. तिथली प्रार्थना संपेल आतां इतक्यांत न् मग तें बंद होऊन जाईल— ''

" तूं कंटाळलेली दिसतेस, हिरा. तुला हें सगळं रोजचंच आहे. पण मी प्रथमच आलोंय इथं हें विसरूं नकोस— ''

अवधूतनें हांसत हांसत तिच्याकडे पाहून म्हटलें. त्याबरोबर ती लाजल्या-सारखी झाली.

" आमच्या या चर्चमध्यें पहाण्यासारखं विशेष कांहीं नाहीं. तुम्हांला पाह्यचंच असेल, तर सिव्हिल लाईन्समधलं आमचं कॅथेड्रल पहा तुम्ही. त्याच्या महाद्वारासमोर उभारलेला ख्रिस्ताचा पुतळा तर फारच सुंदर आहे— ''

सिस्टरनें त्यांना चर्चकडे नेतांना म्हटलें.

वर पत्र्याचें छप्पर घातलेलें तें छोटेखानी चर्च खरोखरीच अगदीं साधें होतें. प्रार्थना या वेळीं नुकतीच आटोपली असल्यामुळें चर्चमध्यें जमलेलीं माणसें परत जात होतीं. मघाशीं त्यांनीं ओवऱ्यांत पाहिलेले बहुतेक भिकारी त्या जमावांत होते. विशेषतः तो वानराप्रमाणें रांगत चाललेला झिंगरू जेव्हां सिस्टरकडे पाहून शून्य दृष्टीनें हंसला, तेव्हां अवधूतला कसेसेंच वाटलें.

पण सिस्टरनें त्याच्याकडे बघून ममतेनें विचारलें—

" चांगली मनापासून प्रार्थना केली ना, झिंगरू ?—''

त्यानें मान हलवली आणि तो पळत पळत आपल्या कोठडीकडे गेला.

" हे सगळे लोक ख्रिस्ती झालेले आहेत का ?—''

अवधूतनें त्या जाणाऱ्या माणसांकडे पाहून विचारलें.

" नाहीं. या मंडळींत अनेक हिंदु माणसंहि आहेत. आमच्या देवळांत कोणीहि येऊं शकतो, कोणीहि प्रार्थना करूं शकतो. देवाच्या दारांत येण्याची, त्याच्या मंदिरांत येऊन प्रार्थना करण्याची कोणालाहि मनाई नाहीं. फक्त अंतःकरण शुद्ध आणि नम्र असलं म्हणजे झालं—''

सिस्टर अत्यंत भक्तियुक्त मृदु आवाजांत हें त्याला सांगत असतां अभिमन्यु अवधूतकडे पहात होता. पण तो कांहींच बोलला नाहीं.

सिस्टरनें त्यांना थेट वेदीजवळ नेलें. वेदीच्या वरच्या बाजूला ख्रिस्ताचा हात पुढें केलेला छोटा सुबक पुतळा होता. त्या पुतळ्याला हार घातलेला होता; व वेदीवरहि फुलें पसरलेलीं होतीं. वेदीच्या दोन्ही बाजूंना मेरी आणि जोसेफ यांचे पुतळे होते. चर्चच्या भिंतीला असलेल्या झरोक्यांतून आंत आलेलीं सूर्यकिरणें त्या पुतळ्यांवर पडल्यामुळें त्यांच्या मुद्रेवरील भावदर्शन मनाला उत्कटतेनें जाणवत होतें. वेदीवर लोंबत असलेल्या झुंबरांतील दिव्याचा सौम्य प्रकाश ख्रिस्ताच्या पुतळ्यावर पडून त्यालाहि एक प्रकारची उदासरम्यता आली होती.

सिस्टरनें त्यांना ती वेदी, ते पुतळे, भिंतीवर लावलेलीं ख्रिस्ताच्या शूलारोपणाच्या प्रसंगाचीं चौदा चित्रें आणि उजव्या हाताला असलेलें ‘ पापनिवेदना ’ चें ( Confessional ) छोटें टेबल यांची माहिती सांगितली, तेव्हां अभिमन्यूनें तिला विचारलें--

“ दिवसा दिवा का लावलेला असतो तुमच्या वेदीवर नेहमीं ?--”

“ हिंदूंच्या देवळांतून जसा नंदादीप असतो ना, तसा आमचा हा नंदादीप आहे. ख्रिस्त हा सर्व जगाचा प्रकाश, सगळ्या दुनियेचा धर्मदीप. या गोष्टीची जाणीव देत हा नंदादीप अहोरात्र तेवत असतो आमच्या देवळांतून--”

देवळांतून बाहेर येऊन ते पुढल्या चौथऱ्यावर उभे रहातांच मिशनच्या मागल्या बाजूला असलेलें मोठें थोरलें अंगण त्यांच्या दृष्टीस पडलें. निंबवृक्षाच्या लांब लांब विरळ सांवल्या त्या अंगणांत पडल्या होत्या; व त्यावर वाढलेल्या हिरव्या पिवळ्या गवतांतून पंख पसरलेल्या पांढऱ्या शुभ्र बगळ्यांप्रमाणें लहान लहान क्रॉस वर डोकावत होते.

“ हें स्मशान आहे का सिस्टर तुमचं ?— ”

अवधूतनें त्या अंगणाकडे पहात विचारलें

“ नाहीं— ”

“ मग हे गवतांतून डोकावणारे क्रॉस कसे काय इथं !— ”

“ हीं सारीं लेकरांचीं थडगीं आहेत— ”

“ लेकरांचीं थडगीं ? मी समजलों नाहीं— ”

“ आमच्याकडे मुलं फार येतात. त्यांतलीं बरींच मरतात. त्यांचीं लहान लहान थडगीं आहेत हीं. आईबापांना नको असलेल्या, त्यांनीं टाकून दिलेल्या आणि

समाजानेंहि तुच्छतेनें उपेक्षिलेल्या अर्भकांचे चिमुकले देह विश्रांति घेत आहेत इथं प्रभूच्या शेवटल्या हांकेची वाट पहात या क्रुसांखालीं— ”

सिस्टरनें अत्यंत करुण आवाजांत अवधूतच्या त्या अजाण प्रश्नाला उत्तर दिलें. नंतर एक उसासा टाकून ती म्हणाली—

“ जिल्हा कचेरीजवळ आमचा अनाथ बालकाश्रम आहे. तिथं फार गर्दी झाली म्हणजे त्यांतलीं कांहीं मुलं इथं आणतों आम्ही— ”

“ फार मुलं येतात तिथं— ”

“ हो. पण पुष्कळदां अत्यंत वाईट स्थितींत आणून टाकतात. त्यामुळं कितीहि काळजी घेतली, तरी हातीं लागत नाहींत त्यांतलीं बहुतेक— ”

तिच्या आवाजांतली कणव अवधूतच्या काळजाला भेदून गेली. आतांपर्यंत मिशनमधील प्रत्येक गोष्टीकडे ती टीकादृष्टीनें पहात होता. त्या सिस्टरचें तें श्रद्धा-युक्त बोलणें ऐकून त्याला केव्हां केव्हां हंसूंहि आलें होतें. पण, गवतांतून वर डोकावणाऱ्या त्या लहान लहान थडग्यांकडे हात करून हिन्दु समाजांतल्या टाकून दिलेल्या अर्भकांची जी कहाणी तिनें सांगितली, ती ऐकून त्याच्या मनाला धक्का बसला, त्याचें हृदय पिळवटून गेलें.

पण आपली मनोव्यथा अवाक्षरानेंहि व्यक्त न करतां तो तिला म्हणाला—

“ आम्ही फार वेळ घेतला आपला. आपण इतक्या आस्थेनं हिंडून आम्हांला सगळं दाखवलं, हे खरोखरी उपकार झाले आपले— ”

“ आमचं हें काम पहाण्याची इतकी उत्सुकता सहसा कोणी दाखवीत नाहीं. त्यामुळं मला फार उत्साह वाटला तुमच्याबरोबर हिंडतांना— ”

सिस्टरनें उत्तर दिलें आणि हस्तांदोलनासाठीं हात पुढें केला.

तोंच हिरानें अवधूतला म्हटलें—-

“ आपल्याला सिस्टर झेवियराला भेटायचंय अजून नाहीं कां ?— ”

“ हो. मी विसरूनच गेलों ती गोष्ट. मग त्यांना भेटतां येईल का आम्हांला ?—”

“ हो. आपण जरा व्हरांड्यांत बसा. मी पाहून येतें सिस्टर काय करते आहे तें— ”

ते व्हरांडयांतल्या वेताच्या खुर्च्यांवर बसले आणि सिस्टर आंत गेली.

ती गेलेली पाहून अवधूत हिराला म्हणाला—

“ तुझी मैत्रीण नाहीं दिसली इथं कुठं आम्हांला, हिरा ?— ”

" कोण ? चंदन म्हणतां तुम्ही ?— "

" हो— "

" मला वाटतं ती सिस्टर झेवियरापाशीं असेल या वेळीं बहुतेक— "

" म्हणजे ती मिशनमध्यें रहाते का ?— "

" नाहीं. ती फ्रेंच शिकते आहे सिस्टर झेवियराजवळ सध्यां. तिनं दुसरी भाषा फ्रेंच घेतली आहे. कदाचित् ती येईलहि सिस्टरबरोबर इथं ?— "

इतक्यांत सिस्टर खिश्चियाना तिथें आली आणि म्हणाली—

" पलिकडल्या बाजूला भिकाऱ्यांच्या संध्याकाळच्या जेवणाची तयारी चालू आहे. त्यावर देखरेख करते आहे सिस्टर झेवियरा तिथं बसून. आपण तिथं जाऊं या तुमची हरकत नसेल तर ?— "

" छे, छे, हरकत कसली आली आहे ? त्या कामांत असतांना आम्हीच तिथं गेलेलं बरं— "

अवधूत उठून म्हणाला आणि सिस्टरच्या मागोमाग ते अंगणांत आले.

सिस्टर झेवियरा निंबाच्या झाडाखालीं ठेवलेल्या वेताच्या बैठकीवर बसली होती; व तिच्या समोरच्या बैठकीवर बसून चंदन तिला वाचून दाखवीत होती.

त्यांना पहातांच झेवियरा उठून उभी राहिली आणि हंसून म्हणाली—

" गुड ईव्हनिंग मित्रांनों !— "

तिचे ते निळे प्रसन्न डोळे आणि ओठांवरलें प्रेमळ स्मित पाहून अवधूतला आपल्या मनांत घोळणाऱ्या सगळ्या दुःखद विचारांचा विसर पडला. आणि त्यानें हस्तांदोलनासाठीं हात पुढें केला.

" कसं काय वाटलं आमचं मिशन तुम्हांला ? तुमच्यासारख्या तरुण मंडळीला असल्या कामाविषयीं आस्था वाटावी हें सुदैव आहे खरोखरीं— "

" हो. जर हें काम पाहून आमच्या मनांत तसं कांहीं करण्याची ईर्ष्या उत्पन्न झाली तर— "

त्याबरोबर तिनें आपले रुंद खांदे किंचित् हलवून जोरानें म्हटलें—

" कां नाहीं होणार ? कां नाहीं होणार ! तुमच्यांतहि अलिकडे चांगले समाजसेवक उत्पन्न झाले आहेत— "

पण, ती जरी हातांतल्या जपमाळेचे मणि ओढीत त्यांच्याशीं बोलत होती, तरी

तिचें लक्ष मात्र सगळें भिकाऱ्यांसाठीं जीं अन्नाचीं भांडीं बाहेर आणून ठेवलीं जात होतीं, त्यांच्याकडे होतें. म्हणून अवधूतनें तिला म्हटलें—

" बरं, आम्ही रजा घेतों आतां आपली—– "

" माफ करा हं. मी फार गडबडींत आहे या वेळीं. प्रार्थनेनंतर लगेच या लोकांची जेवणाची व्यवस्था करावी लागते. आपण पुन्हा केव्हां तरी सवडीनं या म्हणजे बोलूं— "

आणि आपल्या मागें उभ्या असलेल्या चंदनकडे वळून ती फ्रेंचमध्यें तिच्याशीं बोलूं लागली.

अवधूत आणि अभिमन्यु हे सिस्टर ख्रिश्चियानाशीं हस्तांदोलन करून तिचा निरोप घेतात, तोंच हातांत पुस्तक असलेली चंदन पुढें आली आणि हिराच्या खांद्यावर हात ठेवून तिला म्हणाली—

" तूं सुद्धां निघालीस का हिरा यांच्याबरोबर घरीं जायला ?— "

तिचा तो सुरेल खणखणीत आवाज कानांवर पडतांच अवधूत एकदम मागें वळला.

आणि चंदनची आणि त्याची दृष्टादृष्ट झाली.

तिला त्यानें अभिमन्यूच्या घरीं पाहिलें, त्या प्रसंगाला आतां सहा महिने होऊन गेले होते. त्या वेळीं त्यानें फक्त तिला पाहिलें होतें आणि तिनेंहि त्याला पाहिलें होतें. पण त्या दोघांची दृष्टादृष्ट मात्र झाली नव्हती.

तें दृष्टिमीलन आज प्रथमच या क्षणीं झालें.

क्षणैक तीं दोघें समोरासमोर स्तब्ध उभीं होतीं.

त्या चमत्कारिक स्तब्धतेचा भंग अभिमन्यूनें केला. तो अवधूतला म्हणाला—

" हिरानं ओळख करून द्यायला हवी होती वास्तविक तुमची दोघांची. ही आमची मैत्रीण चंदन देशमुख, हे आमचे मित्र अवधूत देशपांडे—– "

त्याबरोबर अवधूत तंद्रेंतून बाहेर पडल्यासारखा झाला आणि हंसून चंदनला म्हणाला—

" मी अभीच्या तोंडून पुष्कळ ऐकलंय तुमच्याविषयीं. तुम्ही इथंच राहतां का ?—– "

हिवाळ्यांतील मावळत्या सूर्याचीं मंदोष्ण किरणें निंबाच्या पर्णहीन फांद्यांतून अवधूतच्या तोंडावर पडलीं होतीं. त्यामुळें त्याच्या गौरवर्णांतील रक्तिमा अधिकच

खुलून दिसत होता. हसतांना डावीकडे विलग होत गेलेली त्याच्या दळदार जिवणीची कडा–तिच्यांतून दिसणारे विरळ शुभ्र दांत हिरकण्यांसारखे लकाकत होते.

" हो–मिशनच्या समोर रहातों आम्ही. आपण मिशन पाह्यला आलां होतात आज मुद्दाम ?-- "

" हो. अभीच्या तोंडून पुष्कळ ऐकलं होतं मी या मिशनविषयीं— "

" मग काय वाटलं आपल्याला हें काम पाहून ?— "

" पुष्कळच वाटलं— "

त्यानें हंसून उत्तर दिलं. आणि लगेच उलट तिला विचारलें—

" मी तर आज प्रथमच आलों इथं. पण, तुम्ही गेलीं चार पांच वर्षं या मिशन-जवळ रहातां आहांत. तुम्हांला काय वाटतं ?-- "

" हें ख्रिस्ती मिशन आहे, हें जाणून आहे मी. तरी सुद्धां मला अतिशय आदर वाटतो इथल्या स्त्रिया न् त्यांचं कार्य यांच्याविषयीं. त्यांची श्रद्धा केव्हां केव्हां मनाला पटत नाहीं. पण त्या श्रद्धेचं सामर्थ्य अचाट आहे— "

" खरं आहे तुमचं म्हणणं--"

आणि, तो आणखी कांहीं पुढें बोलणार, तोंच तें संभाषण तोडून टाकण्याच्या हेतूनें अभिमन्यु मध्येंच म्हणाला--

" जाऊं या आतां आपण, अवधूत--"

" बरं, ठीक आहे, येतों हं. ओळख ठेवा आतां--"

अवधूतनें चंदनला नमस्कार केला आणि अभिमन्यूला हळूच विचारलें-

" हिरा नाहीं येत आपल्याबरोबर ?-"

" छे, आतां कसली येते ती ? तुला जसा मी, तशी चंदनला हिरा-- "

त्यानें हंसून उत्तर दिलें.

पण अवधूतचें लक्ष त्याच्याकडे नव्हतें.

तो स्वतःशींच बोलावें, त्याप्रमाणें एकदम उद्गारला--

" सहा महिने झाले असतील नाहीं रे, चंदनला मी तुमच्याकडे पाह्यल्याला ? हो, जून अखेरची गोष्ट आणि आतां हा जानेवारीचा पहिला आठवडा. पण सहा महिन्यांत किती मोहक फरक पडला आहे तिच्यांत--"

# अग्रजन्माचा हक्क

१

अवधूतचा तो उद्गार ऐकून अभिमन्यूनें त्याच्याकडे आश्चर्यानें बघितलें आणि त्याला म्हटलें—

" अवधूत, काय आहे रे तुझ्या मनांत ?—— "

" कांहीं नाहीं. माझ्या मनांत काय असावसं वाटतं तुला !—— "

अवधूतनें त्याला हंसून विचारलें.

" मला वाटतं तुझं मन चंदनवर गेलंय. तूं जें आज मुद्दाम हें मिशन बघायला आलास, तेंसुद्धां ती कुठं रहाते हें पाहून ठेवण्यासाठीं आलास. आमच्या घरीं त्या दिवशीं तिला पाहिल्यापासून गेल्या सहा महिन्यांत असा एकहि दिवस गेला नाहीं कीं, जेव्हां तूं तिची कांहीं ना कांहीं चौकशी मजजवळ केली नसशील. खरं ना मी म्हणतों हें !—— "

" आणि समज, मीं हें सगळं खोटं आहे असं सांगितलं, तरी तुझा थोडाच विश्वास बसणार आहे त्यावर ? ' रिकामं मन आणि सैतानाची धन ' या इंग्रजी म्हणीप्रमाणें विचारचक्र चाललंच तुझं, अभि. तुझे आईवडील दोघे मिळवते आहेत; शिक्षण सगळं मोफत चाललंय; तें पुरं झाल्यावर दिवाणगिरीचं ताट पुढं वाढून ठेवलंय—"

" हो तर ! कॉंग्रेस जेव्हां सध्यांची आपली धुसफूस संपवून उद्यां स्वतःचं मंत्रिमंडळ बनवील, तेव्हां अस्पृश्यांसाठीं त्यांत एक जागा राखून ठेवणार असेल नाहीं ?— "

" अलबत् ठेवील— "

" खरं आहे बाबा ! तूं पडलास खादीवाला. तेव्हां तुझ्या तोंडनं अशीं मुक्ताफळं निघायचींच. पण, मी जें आतां बोलतोंय, तें नीट ऐकून ठेव. गांधी जरी स्वतःला

हरिजनांचे कैवारी म्हणवीत असले, तरी त्यांच्या 'हरिजनां'त जसा एक शब्दहि कधीं अस्पृश्यांच्या राजकीय उन्नतीबद्दल येत नाहीं, तसाच कॉंग्रेसच्या मंत्रिमंडळांतहि अस्पृश्यांना थारा मिळण्याचा संभव नाहीं. गांधींना न् कॉंग्रेसला महत्त्व फक्त मुसलमानांचं वाटतं. वर्किंग कमिटीवर दोन दोन, तीन तीन मुसलमान आहेत. पण अस्पृश्य घेतला आहे का एकदां तरी कधीं चुकून?—"

"पण गांधींनीं तुमच्या उन्नतीसाठीं स्वतंत्र संघ काढलाय एवढं तरी कबूल करशील कीं नाहीं तूं?—"

"काढलाय खराच. पण कशासाठीं? गेल्या निवडणुकींत त्या संघाच्या बुडाशीं असलेलं सगळं राजकारण चवाट्यावर आलं. कॉंग्रेसला आमच्या पक्षाविरुद्ध आपले उमेदवार उभे करायचे होते म्हणून तिनं आमच्यासाठीं स्वतंत्र संघ काढून आमच्यांत पद्धतशीर फूट पाडायचा प्रयत्न चालवलाय—"

"तुझ्या पक्षदूषित दृष्टीला कॉंग्रेसचं कोणतंच कृत्य चांगलं दिसत नाहीं, अभि. पण, एवढी गोष्ट तरी तुला कबूल आहे ना कीं, आमच्या पांढरपेशा तरुणांच्या समोर आज जो पुढं काय करायचं हा प्रश्न दत्त म्हणून उभा आहे, तो तर तुझ्यापुढं नाहीं? उलट तूं चाहेल त्या मार्गानं प्रगति करून घेऊं शकतोस आपली—"

"खरं आहे तुझं म्हणणं. पण इतक्या वर्षांच्या किळसवाण्या गुलामीनंतर आज ही जी थोडी डोकं वर काढायची संधि आम्हांला मिळाली आहे, तिचा सुद्धा हेवा वाटतो का रे तुम्हां उच्च जातीच्या लोकांना?—"

"हेवा कशाला वाटेल बाबा? उलट पुढल्या पन्नास वर्षांत तुमचा समाज सुसंस्कृत आणि सुसंघटित होऊन हिंदु जातीचा एक बलाढ्य घटक बनेल या कल्पनेनें आनंदच होतो मला—"

"हिंदु जातीचा का म्हणतोस तूं?—"

"बरं बाबा, राह्यलं! हिंदुस्थानाचा म्हणतों, महाराष्ट्राचा म्हणतों. मग तर झालं ना?—"

"पण माझं समाधान आमचा समाज हा महाराष्ट्राचा नुसता बलाढ्य घटक झाल्यानं होणार नाहीं. ही महाराष्ट्रभूमि मूळची आमची आहे. महाराष्ट्रांत सर्रास रूढ असलेली नागपूजा आणि नागनामं हीं आम्हां नागवंशी भूमिजनांकडून घेतलेलीं आहेत मागाहून या भूमीचं आक्रमण करणाऱ्या आर्यांनीं. नागभूषणं आपल्या अंगावर घालणारा, भस्माची उटी अंगाला लावणारा, बैलावर बसणारा, स्मशानांत रहाणारा;

भूतपिशाचांचा अधिपति महादेव हा आमचा, या भरतखंडांतल्या सगळ्या वन्य आणि अस्पृश्य जातींचा मूळचा देव आहे. त्याच्या हातांतलं नरकपाल, त्याच्या गळ्यांतली रुद्राक्षांची माळ, त्यानं अंगावर पांघरलेलं मृगचर्म, त्याचं भूतगणांसह होणारं पैशाच नृत्य, त्याच्या आदिशक्तीचं मद्यमांससेवन, त्याची लिंगपूजा, त्याचं किरातरूप आणि त्याचं पाशुपतास्त्र या सगळ्या गोष्टी हें स्पष्ट दर्शवितात कीं, हा महादेव आर्यांचा, ब्राह्मणांचा, त्रैवर्णिकांचा देव नव्हे. हा आमचा, आम्हा आदिवासी भारतीयांचा देव आहे. याची मूर्ति, प्रकृति आणि उपासना ही आमच्या वन्य आणि रौद्र संस्कृतीची स्मारक आहे. स्मशानांत, नदीकांठीं, भुयारांत, अरण्यामध्यें, डोंगरकड्यावर रहाणारा हा आमचा पशुपति, नाग, गंगा आणि शक्ति यांना आपल्या अंगावर धारण करणारा हा आमचा चंद्रशेखर आर्यांनीं आमच्यापासून लुबाडून घेतला. भूतपिशाचांवर अधिराज्य गाजविणाऱ्या या मृत्युंजयाचे मूळचे उपासक आम्ही आदिवासी भारतीय आहोंत— ”

“ आणि तरी तूं म्हणणार आमची संस्कृति ही हिंदु संस्कृति नव्हे !— ”

“ का म्हणूं नये ? हिंदूंनीं आमचं हें भव्य दैवत आमच्यापासून हिरावून घेतलं आणि आमच्या जन्मभूमींत आम्हांला गुलाम बनवून टाकलं— ”

“ पण आतां ताबा घ्या ना तुम्ही आपल्या या जन्मभूमीचा ! या महाराष्ट्रांत मराठे आणि महार या दोनच जाति बहुसंख्य आहेत; व त्यांनीं मनांत आणलं, तर या लोकशाहीच्या युगांत सार्वभौम सत्ता भोगतां येईल त्यांना महाराष्ट्रामध्यें ! ब्राह्मण कितीहि शिकलेसुधारलेले असले, तरी मराठे आणि महार यांच्या अतिसंख्येपुढें त्यांचं काय चालणार आहे ? माझी तक्रार तुमच्याविरुद्ध हीच आहे कीं, आपण या देशांत अतिसंख्य आहोंत, या भूमीवर अग्रजन्माचा हक्क आपला आहे, या जाणिवेनं तळमळून तुम्ही त्याच्या दास्यमोचनासाठीं चाललेल्या चळवळींत ईर्ष्येनं भाग घेत नाहीं. ती स्वातंत्र्याची ईर्ष्या जोंपर्यंत तुमच्यांत उत्पन्न होत नाहीं आणि उपऱ्या परकी सत्तेनं तोंडावर फेकलेले तुकडे चघळण्यांत जोंपर्यंत तुम्हांला कृतकृत्यता वाटत आहे, तोंपर्यंत तुमच्या कपाळची गुलामी टळणार नाहीं. फार तर हिंदूंची गुलामी जाऊन तिच्याऐवजीं ब्रिटिशांची गुलामी येईल एवढाच फरक ! त्या फरकांत जर तुला राजकीय मोक्ष वाटत असेल, तर मात्र माझी कांहीं तक्रार नाहीं हं !— ”

अवधूतनें हंसत हंसत अभिमन्यूच्या पाठीवर थाप मारून म्हटलें.

त्याबरोबर तो एकदम चिडल्यासारखा होऊन उद्गारला—

“सरकारी नोकरींत शिरण्याची जी धडपड आमच्यांतल्या सुशिक्षित तरुणांत आज दिसते, तिचा मलासुद्धां राग येतो फार. पण, हजारों वर्षांच्या आर्थिक आणि सामाजिक दैन्यानंतर त्यांना स्वास्थ्य आणि प्रतिष्ठा मिळवून देणाऱ्या नोकरीच्या तुकड्यांचा मोह पडावा, हें स्वाभाविक नाहीं का अवधूत ?—”

“स्वाभाविक आहे हें कबूल करतों मी. पण मग तुमच्या समाजाची उन्नति कशी होणार ? इतरांच्या प्रयत्नानं तुमच्या समाजाची उन्नति होईल अशी जर तुझी कल्पना असेल, तर ती चुकीची आहे अगदीं. तुमच्या समाजाची उन्नति तुमच्या हातूनच झाली पाहिजे; तुमच्या समाजाचं नेतृत्व तुमच्यांतूनच निर्माण झालं पाहिजे—”

“अगदीं रास्त आहे तुझं म्हणणं. मला पुष्कळ वाटतं कीं, आमच्यांतल्या सुशिक्षित आणि बुद्धिमान् तरुणांनीं नोकरीच्या राजमार्गाला न लागतां विद्याव्यासंगाला वाहून घ्यावं, आपल्या समाजाचं संशोधन करावं आणि त्याच्या पुनर्घटनेची भूमिका तयार करावी. स्वतःच्या समाजाचं आणि संस्कृतीचं जर त्यांनीं संशोधन केलं, तर या महाराष्ट्रभूमीवरला आपला अग्रजनाचा हक्क त्यांच्या प्रत्ययाला येईल आणि एक नवी स्फूर्ति, एक नवी ईर्ष्या आमच्या दलित समाजांत संचरेल. तूं म्हणतोस तें खरं आहे अगदीं, अवधूत. या भूमीवर वन्य आणि अस्पृश्य यांच्या बरोबरीनें जर आणखी कुणाचा अग्रजन्माचा हक्क असेल, तर तो स्वतःला नागवंशी किंवा सोमवंशी म्हणविणाऱ्या मराठा क्षत्रियांचाच कदाचित् असेल. राजपुतान्यांतून जी क्षत्रियांचीं कलमी कुळं महाराष्ट्रांत आलीं त्यांचा खास नव्हे ! शककर्ता शालिवाहन हा शेषाचा पुत्र असल्याची कथा ही महाराष्ट्रांतील क्षत्रिय हे नागवंशी असल्याची सूचक आहे. पण, हें सगळं सिद्ध व्हायचं आणि आमच्या लोकांना कळायचं, म्हणजे वन्यांच्या आणि अस्पृश्यांच्या आद्य संस्कृतीचं आणि समाजाचं संशोधन झालं पाहिजे—”

ते दोघे आतां बोलत बोलत नागनदीच्या पुलापाशीं आले होते. म्हणून अभिमन्यूनें त्याला विचारलें—

“मग कुठं चलतोस आतां, अवधूत ? सिराजकडे जायचं का ?—”

“त्याच्याकडे नको. ज्या वेळीं मनाला आनंद हवा असेल, कलेच्या उच्च वातावरणांत विहार करायची ज्या वेळीं मनाची तयारी असेल, त्या वेळीं त्याच्याकडे

गेलेलं बरं. पण माझं मन आज अस्वस्थ आहे, अभि. मला मुळींच इच्छा नाहीं त्याच्याकडे जायची—"

" मग असं करूं—तूं आमच्या घरीं चल प्रथम. मी चहा करतों, तो आपण दोघे घेऊं आणि मग दूर कुठें तरी फिरायला जाऊं. आहे कबूल तुला ?—"

" ठीक आहे— "

अभिमन्यूचें घर लहानसेंच, पण दुमजली होतें. घराचा खालचा भाग पांढऱ्या मातीनें सारवलेला होता; व माडीला चुन्याची सफेती दिलेली होती. समोर जें छोटेसें अंगण होतें, त्यांत मधोमध तुळशीवृंदावन व त्याच्या शेजारीं जाईजुईचे वेल लावलेले होतें. वृंदावनापुढें कांचेच्या तुकड्याचें जें स्वस्तिक जमिनींत तयार करून बसविलें होते, तें संधिप्रकाशांत चकाकत होतें. उजव्या हाताला जो लहानसा गोठा होता, त्यांत एक गाय, वासरूं आणि दोन शेळ्या बांधलेल्या होत्या.

ते दोघे आंत येतांच छपरींत तरटावर खांबाला टेकून बसलेली म्हातारी त्यांच्याकडे पाहून म्हणाली—

" किती वेळ केला रे आज तुवा अभिमन ?— "

" मोठी माय, मी घरीं वेळेवर आलोंय असं कधीं वाटतच नाहीं तुला. पण तूं चहा मांडते का आमच्यासाठीं ?— "

त्यानें हंसत हंसत आपल्या आजीला विचारलें.

" मांडील बाबा तुझी माय ! पण ही काय वेळ आहे का चहा घ्यायची ? तूं हातपाय धुवून भाकर खायला बस आतां— "

" बरं, तूं नको मांडूं चहा. मीच खालीं येऊन करून घेतों— "

आणि ते दोघे दडदडा जिना चढून वर अभिमन्यूच्या खोलींत गेले.

ती माडी फक्त दोन छोट्या खोल्यांची होती; व त्या खोल्या त्या दोघां भावंडांना अभ्यासासाठीं दिलेल्या होत्या. कुडाच्या भिंतीची ती बसकी पण हवाशीर माडी त्यांनीं टापटिपीनें सजविलेली होती. प्रत्येक खोलींत एक लहान टेबल, दोन साध्या लांकडी खुर्च्या व खाट एवढेंच सामान होतें. अभिमन्यूच्या टेबलाच्या वरल्या बाजूला अंबेडकर, टागोर, विवेकानंद आणि अरविंद घोष यांचीं छायाचित्रें टांगलेलीं होतीं; व इंटरच्या निकालाच्या दिवशीं घेतलेला त्या दोघां मित्रांचा फोटो सुबक फ्रेममध्यें बसवून टेबलावर ठेवलेला होता. पश्चिमेकडच्या बाजूला ज्या दोन

खिडक्या होत्या, त्यांतून मावळता संधिप्रकाश आणि हिंवाळ्यांतील भणभणणारा गार वारा सारखा आंत येत होता.

खोलींत आल्यावर अभिमन्यूनें अवधूतला म्हटलें—

" अवधूत, तूं बैस जरा. मी खालून चहा करून आणतों— "

" माय करील ना तुझी. तूं कशाला खालीं जातोस ?— "

" नको. ती फार गोड करील न् मग मिजास जाईल तुझी. चूल पेटलेलीच आहे आतां. मी दहापंधरा मिनिटांत करून आणतों— "

त्यानें हंसून उत्तर दिलें आणि तो तडक खालीं गेला.

अवधूत खिडकीपाशीं येऊन उभा राहिला. क्षितिजावर जे काळेपांढरे ढग रेगाळत होते, त्यांतून वाट काढीत सूर्याचें लाल बिंब मावळण्याच्या बेतांत होतें.

वारा भणभणत आंत येत होता. त्याच्या प्रत्येक झोताबरोबर समोर जें पिंपळाचें मोठें थोरलें झाड होतें, त्याच्या पर्णबहुल फांद्या इतक्या जोरानें हेलकावत कीं, त्यांचा आवाज ऐकून मोटेचें पाणी धप्‌दिशीं कोसळल्याचा भास होई. पिंपळाची जी एक जरड उंच फांदी डोंगराच्या सुळक्याप्रमाणें वर गेली होती, तिच्या टोंकाला असलेल्या पानांच्या झुबक्यांतील आपल्या घरट्यांत बसून घार आपला कर्कश भेदक आवाज काढीत होती; व सूर्यास्ताची वेळ झाल्यामुळें झाडाच्या पानांत आश्रय घेण्यासाठीं थव्याथव्यांनीं येणाऱ्या पक्ष्यांचा किलबिलाट सारखा चालू होता. पिंपळाच्या पारावर जो तेल, शेंदूर फासलेला उघडावाघडा मारुति उभा होता, त्याच्या दर्शनासाठीं हातांत मिणमिण करणारी पणती घेऊन किंवा कणकेच्या दिव्यांची आरती पदराखालीं झांकून निघालेल्या बायकांचीं किनऱ्या करुण सुरांतलीं गाणीं कानांवर पडत होतीं. मारुतीपुढल्या मोकळ्या जागेंत आट्यापाट्या खेळत असलेल्या पोरांच्या आरोळ्या आणि पलिकडल्या बाजूला पोवाडे म्हणत असलेल्या लोकांचें 'रामा हो जी जी जी !' हे सूर दिवसभराच्या काबाडकष्टानंतर मिळालेली सायंकालीन विश्रांति किती मजेंत जाते, याची साक्ष देत होते.

अवधूतचें उदास मन त्या गडबडीला कंटाळलें; व तो खिडकीजवळून उठून अभिमन्यूच्या टेबलापाशीं आला. त्यावर अस्ताव्यस्त पडलेलीं पुस्तकें त्यानें उलथीं पालथीं केलीं. पण त्यांत कांहीं नवीन न आढळल्यामुळें तो कंटाळून पुन्हा खिडकीपाशीं जाऊन उभा राहिला.

संधिप्रकाश आतां झपाट्यानें लोपत होता. पक्ष्यांची किलबिल थांबत चालली

होती. फक्त तुणतुण्याचा आवाज आणि 'रामा हो, जी जी जी' हे कंटाळवाणे सूर मात्र सारखे कानांवर येत होते.

म्हणून तो पुन्हा खिडकीजवळून उठला आणि हिराच्या खोलींत गेला. अभिमन्यूच्या खोलीपेक्षां तिची खोली जास्त व्यवस्थित होती. मराया माग्दालनला आश्वासन देत असलेल्या ख्रिस्ताचें सुंदर चित्र फ्रेम करून टेबलाच्या वरल्या बाजूला टांगलेलें होतें; व त्याच्या समोर सुबक कांचपात्रांत फुलांचा गुच्छ ठेवलेला होता.

अवधूत टेबलाजवळ गेला आणि कांचपात्र उचलून त्यांतील गुच्छाचा त्यानें वास घेतला.

त्या पुष्पपात्राजवळच टेबलाच्या मधोमध वह्यांची चळत होती. त्यांतली अगदीं वरची वही अवधूतनें उचलली आणि सहज उघडून पाहिली.

तत्क्षणींच त्याच्या लक्षांत आलें, ती वही अभ्यासाची नव्हती. हिराच्या दिनचर्येचें टिपण तींत केलेलें होतें.

तेव्हां त्याच्या मनांत आलें, आपण ती वही वाचूं नये. पण क्षणमात्रच. त्यानें आपल्या मनाची समजूत घातली, हिराला आपण बहिणीसारखीच समजत आलों आजवर. मग आपल्याला तिची ही वही चाळायला काय हरकत आहे ?

आणि त्यानें ती वही वाचावयाला सुरवात केली.

ती तपशीलवार लिहिलेली रोजनिशी नव्हती; तर ज्या वेळीं जें कांहीं विशेष मनांत आलें, त्याचें तें मधून मधून तारीखवार केलेलें टांचण होतें. आणि तेंहि अगदीं तुटक आणि सूचक.

पहिल्याच पानावर त्याच्या इंटरच्या परीक्षेचा निकाल लागला, त्या दिवशींची नोंद होती—

*मे १५—आज अभि पास झाला पहिल्या वर्गांत. त्याला कुठं ठेवूं न् कुठं न ठेवूं असं मोठ्या मायला झालंय. संध्याकाळीं तिनं त्याच्या अंगावरून दहीभात ओवाळून टाकला. बाबांनीं कामावरून परत आल्यावर पेढे वाटले.*

*पण पेढ्यांवर भागलं नाहीं. रात्रीं वस्तींतील मंडळी आली आणि मग दारू उडाली. घरांत शिव्या आलेल्या दिसतांच अभि जो रागानं बाहेर पडला, तो पहांटे परत आला. बहुतेक-अवधूतकडे गेला असावा.*

८—चं. वा.

मे २०—आज घरांत केवढं भांडण. अभीला मुलगी सांगून आली होती. पण तो म्हणे, शिक्षण पुरं होईपर्यंत लग्नाची गोष्ट बोलूं नका. मोठी माय खूप रडली, ओरडली. बाबा नू मायहि त्याला बोलले. पण त्यानें एकदां म्हटलें, तें कायम.

मे २८—आज पुन्हा प्रल्हाद साळवे मला मागणी घालायला आला होता. मोठी माय म्हणे, माझ्या डोळ्यांदेखत एकदां अक्षता पडूं द्यात तुझ्यावर तरी. पण बाबा गप्प होते. प्रल्हाद हुषार नू तरतरीत आहे. तो अभीची चौकशी करायसाठीं म्हणून वर आला. तेव्हां त्याच्याशी काय बोलावें हें सुचेना मला.

जून २०—आज सिस्टर झेवियरा आली होती. मला कॉन्व्हेन्ट स्कूलमध्यें घालायचं ठरलं. पुन्हा लग्नाचा विषय निघाला. मोठी माय सिस्टरला म्हणाली, असा नायब तहसिलदार झालेला चांगला मुलगा परतवून लावणं शहाणपणाचं होणार नाहीं. सिस्टर तिला हंसून म्हणाली, बाई, तुमच्यापेक्षां बुड्ढी आहे मी. तुम्ही इतक्या उतावीळ होऊं नका. हिराचं लग्न झालेलं आपण दोघीही पाहूं.

जून २७—आज हायस्कूलमध्यें आमचीं नांवं टाकलीं. परत येतांना चंदन म्हणत होती, मी अविवाहित रहाणार नू समाजसेवा करणार. कदाचित् ख्रिस्ती सुद्धां होईल ती. संध्याकाळीं आम्ही दोघी घरीं आलों तेव्हां दारांत अवधूत भेटले. किती छान दिसत होते ते आज.

जुलै १—आज पुन्हा कडाक्याचं भांडण झालं. बाबांची इच्छा अभीनं आय. सी. एस. ला जावं अशी आहे. मिलमधला मॅनेजर तो पेटिगारा—त्यानं भरवून दिलं हें त्यांच्या मनांत. मोठ्या मायला त्यांत कांहीं कळत नव्हतं. पण तीही लागली बडबडायला. अभि म्हणे, मी संस्कृत घेऊन ऑनर्सला बसणार. बाबांना वाटतं, मी वयाच्या तेराव्या वर्षांपासून गिरणींत खस्त्या खाल्ल्या. आतां उतारवयांत मुलाचं सुख

*भोगावं. पण अभि ऐकेना. त्यानं पेटिगाराला भेटायचं सुद्धां नाकारलं.*

*मीं अभीला विचारलं, तुझा संस्कृतसाठीं एवढा हट्ट का? तेव्हां त्यानें शाळेंतला तो प्रसंग सांगितला. न्यू हायस्कुलांत गेल्यावर त्यानं संस्कृत घ्यायचं ठरवलं. पण तिथल्या संस्कृत-शिक्षकानं त्याला साफ सांगितलं, "तुझ्या सारख्या महाराला मी संस्कृत शिकवणार नाहीं." अभि तसाच शाळेंतून उठून घरीं आला. आणि दुसऱ्या दिवशीं अडीच मैल लांब असलेल्या पटवर्धन हायस्कुलांत त्यानं नांव घातलं. त्याला मॅट्रिकमध्यें संस्कृतांत डिस्टिंक्शन मिळालं, इंटरमध्येंहि मिळालं.*

*बाबा म्हणाले, तूं काय ब्राह्मण आहेस संस्कृत पंडित व्हायला? संस्कृतला आतां कोणी विचारीत नाहीं. तूं एम्. ए. त पहिला आलास, तरी तुला कोणी संस्कृत प्रोफेसर नेमणार नाहीं. कारण तूं महार. तूं मुकाट्यानं आय. सी. एस्. हो.*

*पण अभीनं बाबांना सांगितलं, मला सरकारी नोकरी करायची नाहीं. माझी विद्या न् बुद्धि मीं आपल्या समाजाला वाहिली आहे.*

*जुलै ? -आज मीं त्याला स्पष्ट विचारलें. तेव्हां तो प्रथम मला गुरकाऊन म्हणाला, तूं गप्प बैस. तुला काय पोरीला कळतंय यांत? पण मी खणपटीला बसलें. तेव्हां तो मला म्हणाला, मी संस्कृत पंडित होईन आणि आपल्या समाजाच्या संस्कृतीचं न् इतिहासाचं संशोधन करून, त्याला झालेला घोर अन्याय जगापुढें मांडीन, भारतीय इतिहासांतलं त्याचं स्थान निश्चित करीन आणि त्याच्या ठिकाणीं भविष्यकाळाविषयीं ईर्ष्या उत्पन्न करीन.*

*मलाहि तो म्हणाला, तूं एम्. ए. हो आणि दलित महिलाश्रम काढ. सरकारी नोकरीवर जोंपर्यंत आपले लोक अवलंबून आहेत, तोंपर्यंत त्यांची खरी उन्नति होणार नाहीं.*

अवधूत तें वाचून संपवीत आहे, तोंच जिन्यावर पाय वाजले; व म्हणून तो ती वही जाग्यावर ठेवून अभिमन्यूच्या खोलीत आला.

"अवधूत, हा चहा आणलाय मी. तूं ओत. तोंपर्यंत मी कंदील आणतों खालून—"

आंत आलेल्या अभिमन्यूनें त्याला म्हटलें; व हातांतली अल्यूमिनियमची किटली आणि कपबशांचा जोड त्यानें टेबलावर ठेवला.

अवधूत तो गरम चहा कपांत ओतीत असतांनाच अभिमन्यु कंदील घेऊन वर आला.

त्यानें चहाचा घोट घेतला आणि अवधूतला म्हटलें—

"बरा झालाय ना रे चहा ?—"

"हं—"

"अवधूत, तुला बरं नाहीं का रे आज ?—"

"का बरं ? छान आहे प्रकृति माझी—"

अवधूतनें हंसून उत्तर दिलें; व किटलींत उरलेला चहा आपल्या कपांत ओतून घेतला.

"खरं नाहीं बोलत तूं. आज तूं कसल्या तरी काळजींत आहेस अवधूत—"

"हो. तुझा तर्क बरोबर आहे—"

"का बरं ? दादासाहेबांची तब्बेत तर बरी आहे ना ?—"

"तब्बेत चांगली आहे. पण आमच्या मिलच्या डायरेक्टरांची सभा होती काल. बहुधा गिरणीचा ताबा आमच्याकडून गेला असेल एव्हांना. तो माधवदास शेठजी आहे ना हिंगणघाटचा, त्याचं कर्ज आहे गिरणीवर. मला तर असं वाटतं कीं, आमची चंदनवाडी न् मालगुजारी गांवं सुद्धां गहाण असतील त्याच्याकडे—"

"काय म्हणतोस ? इतकं एकदम व्हायला काय झालं रे ?—"

"आमची इस्टेट समायिक आहे. काकांची चैन, त्यांना मोटारीच्या धंद्यांत आलेली तूट, कापसाचा घसरता भाव न् गिरणींत सारखे होत असलेले संप. आणखी काय व्हायला हवं ?—"

त्यानें एक सुस्कारा सोडला आणि तो म्हणाला—

"गिरण गेली, तर दादांना दुःख नाहीं व्हायचं एवढं. ती गेल्यानं आमचं सगळं कर्ज फिटून चंदनवाडी जरी आमच्या ताब्यांत राहिली, तरी पुष्कळ आहे.

त्यांचा प्रयत्न चाललाय् कीं, माधवदास शेठजीनं आपला जुना संबंध लक्षांत घेऊन आपल्याला डायरेक्टरांच्या बोर्डातून अजिबात काढून टाकूं नये— ”

“ पण अशा रीतीनं दुसऱ्याच्या दयेवर जगण्यांत अर्थ काय ?— ”

“ खरं आहे तुझं म्हणणं. पण माणसाला प्रतिष्ठेचं म्हणून एक महत्त्व वाटत असतं ना ? त्यांतच आमचे काका हिस्से तोडून देण्यासाठीं दादांच्या मागें लागले आहेत— ”

“ या अशा वेळेला ?— ”

“ हो— ”

“ आणि इतके दिवस दादासाहेबांनीं त्यांचा खर्च चालवला तो ?— ”

“ पण त्याचा हिशेब कुठं आहे ? ते म्हणतात, कर्ज दादांच्या कारभारामुळं झालं, तें त्यांनीं फेडावं. मी कर्जाबद्दल जबाबदार नाहीं, असं माधवदास शेठजींना त्यांनीं चक्क सांगून टाकलं— ”

“ म्हणजे इस्टेट समायिक न् कर्ज तेवढं वैयक्तिक ! छान ! चांगली कायदेबाज शक्कल आहे ही— ”

“ त्यामुळं दादा अगदीं चिडून गेले आहेत— ”

तेवढें वाक्य उच्चारून तो थांबला. क्षणमात्र दोघेहि स्तब्ध होते. नंतर त्यानें हंसून म्हटलें—

“ पण या संकटांतहि मला एका गोष्टीचा आनंद वाटतो— ”

“ कोणत्या ?— ”

“ दादा गिरणींतून निघाले, म्हणजे मी चळवळींत भाग घ्यायला मोकळा होईन. गिरणीमालकाचा मुलगा म्हणून माझ्यावर आजपर्यंत नैतिक बंधन होतं एक प्रकारचं. पण आतां मी मोकळा होईन कोणत्याहि चळवळींत भाग घ्यायला— ”

तो हंसून म्हणाला.

“ कॉंग्रेसचं काम तर कॉलेजांत आल्यापासून गेलीं दोन वर्षं करतोच आहेस तूं. आतां आणखी कोणत्या नव्या चळवळींत भाग घेणार आहेस तूं ?— ”

“ माझ्या मनाचा अद्याप निश्चय झालेला नाहीं, अभि. पण, समाजवादी कार्यक्रमाचा कांहीं बाबतींत अवलंब केल्याशिवाय गत्यंतर नाहीं असं जास्त जास्त वाटूं लागलंय अलिकडे माझ्या मनाला. आमच्या गिरणींतल्या कामगारांचे संप आणि आमच्या कुळांवर येणाऱ्या जप्त्या या लहानपणापासून पहात आलों आहें मी.

त्या वेळीं मला त्या प्रकारांची चीड येत असे अगदीं. पण नीट कळत नव्हतं तेव्हां आणि कांहीं करतांहि पण येत नव्हतं. चंदनवाडीला येणाऱ्या सरकारी अधिकाऱ्यांची नेहमीं केली जाणारी सरबराई संप दाबून टाकण्याच्या कामीं दादांना कशी उपयोगी पडत असे, हें प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाह्यलेलं आहे मीं. घरीं घडणारे हे प्रकार बघून माझं मन तळमळे, ही पिळणूक थांबली पाहिजे असं वाटे. काय करावं न् काय न करावं असें मला होऊन जाई. पण त्या वेळीं मार्ग सांपडला नव्हता. तो आतां सांपडला आहे— "

" पण तूं दादासाहेबांचा एकुलता एक मुलगा आहेस. त्यांना काय वाटेल तूं अशा प्रकारच्या चळवळींत पडलास तर ?— "

" तूंहि नाहींस का आपल्या बाबांचा एकुलता एक मुलगा, अभि ? पण तूं नाहीं आय. सी. एस. ला जायचं नाकारलंस ? लग्न करायचं नाकारलंस ? माझ्या दादांची जितकी माझ्यावर आशा आहे, त्याच्या हजारपट जास्त आशा सारा जन्म गिरणींत पिळून निघालेल्या तुझ्या आईबापांची तुझ्यावर असेल. पण तूं त्या आशेचा मुलाजा केला आहेस का कोणत्या बाबतींत ? आपल्यांतल्या प्रत्येक तरुणानं जर आईबापांचा मुलाजा करायचं ठरवलं, तर आपला समाज न् देश यांच्या उद्धाराची आशाच करायला नको मुळीं— "

अभिमन्यु कांहीं बोलला नाहीं.

" मला वाटतं, तूं, सुद्धां माझ्याच मार्गानं चलावंस, अभि. सिराज, तूं न् मी गेलीं चार पांच वर्षे एकत्र अभ्यास करतों आहोंत, एक विचारानं वागत आलों आहोंत. पण सिराजविषयीं आशा नाहीं मला. तो कलासक्त आहे. त्याच्याकडून फार तर इतकीच अपेक्षा करतां येईल कीं, त्याची कला जें नवं युग, जो नवा समाज, जें नवं मानव्य आपण या भारतांत निर्माण करूं इच्छितों, त्याच्या प्रचाराला उपयोगी पडावी. प्रत्यक्ष कामाला त्याचा उपयोग व्हावा अशी त्याची प्रकृतीच नाहीं. पण तुझं तसं नाहीं. सर्वांना समान संधि आणि समान हक्क देणाऱ्या या समतेच्या कार्यक्रमाचा पुरस्कार करायला तुला कांहींच हरकत नाहीं, अभि—"

" तुझं म्हणणं तुझ्या दृष्टीनं ठीक आहे. पण मला तें पटत नाहीं—"

" अरे, विचार केल्याशिवाय इतक्या तडकाफडकीं पटत नाहीं म्हणतोस तूं माझं म्हणणं ?—"

" तुला असं वाटतं का अवधूत कीं, समाजवादाविषयीं मी अजिबात विचार

केलेला नाहीं ? तो तारवटलेल्या लाल डोळ्यांचा न् पिंजारलेल्या राठ केसांचा फाटके, मळके कपडे घालून हिंडणारा आठल्ये !—त्याचा रंग जरी विझलेल्या कोळशासारखा असला, तरी मन मात्र रसरसलेल्या निखाऱ्यासारखं आहे अगदीं ! त्याच्याबरोबर हिंडतांना पाहून तूं पुष्कळदां हंसला आहेस मला त्या वेड्या पीराच्या नादीं लागल्याबद्दल. पण, त्याच्या इतका प्रभावी प्रचारक, निदान आमच्या वस्तीं-तल्या कामगारांत तरी यशस्वी प्रचार करणारा जिवंत कळकळीचा समाजवादी मीं पाहिलेला नाहीं दुसरा. तो पोषाखी नाहीं तुझ्या इतर समाजवादी दोस्तांसारखा. त्याच्याशीं वादविवाद करण्यांत, नागपुरांतील सगळ्या गलिच्छ मजूर वस्तींत त्याच्याबरोबर हिंडण्यांत तास न् तास घालवले आहेत मीं. तूं कदाचित् पुस्तकं माझ्यापेक्षां जास्त वाचलीं असशील. पण समाजवादाच्या चळवळीचं जिवंत दृश्य पाह्यलं आहे मीं त्याच्याबरोबर हिंडून. तथापि आमच्या चार वर्षांच्या निकट सहवासानंतरहि तो माझी खात्री करूं शकलेला नाहीं या बाबतीत—"

"कां बरं ? कुठं खटकतंय् तुझं मन ?— "

"मला असं वाटतं कीं, आमच्या समाजाची उन्नति करायला समाजवाद अपुरा पडेल. समाजवादी हे कामगारवर्गाकडे क्रांतीच्या उठावणींतील एक खर्डे सैन्य, एक हत्यार म्हणूनच मुख्यतः पहातात. त्यामुळं तोंडानं कामगार–कास्तकार असा सजोड शब्दप्रयोग उच्चारणारे समाजवादी खेड्यांत जाऊन शेतकऱ्यांची संघटना करायला मात्र तितकेसे उत्सुक नाहींत. आमचा समाज हा कोणत्याहि चळवळींत हत्यार म्हणून वापरला जावा अशी माझी इच्छा नाहीं. आमच्या समाजाच्या उन्नतीचा प्रश्न हा निव्वळ आर्थिक नाहीं, निव्वळ सामाजिक नाहीं किंवा निव्वळ धार्मिकहि नाहीं. त्या सर्वांची विचित्र गुंतागुंत झालेली आहे आमच्या उन्नतीच्या प्रश्नांत. ती गुंतागुंत सोडवायला समाजवाद समर्थ होणार नाहीं. हेंच मीं अनेकदां आठल्येलाहि सांगितलंय— "

"तुझ्या या बोलण्याचा अर्थच समजत नाहीं मला, अभि. सर्वांना समान संधि आणि समान हक्क देणारं समतेचं तत्त्वज्ञान जर तुमची उन्नति करायला असमर्थ ठरत असेल, तर तुमची उन्नति होणार तरी कोणत्या मार्गानं ?— "

"प्रश्न बरोबर आहे तुझा; न् त्याचं उत्तरहि मी लगेच देऊन टाकतों. आमच्या समाजाच्या उन्नतीचा प्रश्न ही एक स्वतंत्र समस्या, हें एक स्वतंत्र शास्त्र आहे.

समाजवादासारख्या कोणत्याहि सांचेबंद आणि ठोकळेबाज तोडग्यानं सुटण्यासारखा प्रश्न नाहीं तो—"

"मग तुझ्यासारख्या बुद्धिमान् तरुणानं तें शास्त्र जगाला विशद करून कां सांगूं नये—"

"हो. मी सांगणार आहे लवकरच तें. डॉक्टरेटकरतां हाच विषय घेण्याचा विचार आहे माझा—"

"कोणता विषय ?—"

"विषयाचं नांव हवं तुला ? नांव अलंकारिक वाटेल थोडं—"अग्रजन्माचा हक्क !" या भरतभूमीचे आम्ही आदिवासी आहोंत, या हिंदुस्थानाचे आम्ही पहिले संतान आहोंत न् हिंदु जातिसंस्थेनं आमचं सर्वस्व छिनावून घेऊन आम्हांला कसं चिरडून गाडून टाकलं, आम्हांला अंत्यज ठरवून आमचा हजारों वर्षं कसा अमानुष छळ केला, हें शास्त्रीय पद्धतीनें जगाला समजाऊन सांगायचंय मला—"

अभिमन्यूचे खोल, पिवळसर डोळे आवेशानें धगधगले.

युगानुयुगें सोसलेल्या अमानुष छळाची चीडच जणुं त्या डोळ्यांतून उफाळून बाहेर पडते आहे, असें वाटलें अवधूतला.

## महालक्ष्म्यांचा दिवस

## १०

" सलाम, चंदनबाई ! आज महालक्ष्म्यांचा दिवस आहे. गरिबाची आठवण ठेवा— "

चंदन मिशनच्या फाटकांतून बाहेर पडतांच पुलावर बसलेला दशरथ आपला अस्वली हात कपाळापर्यंत नेऊन तिला म्हणाला.

" दशरथ, अरे कितीदां सांगितलं मीं तुला मला सलाम म्हणत जाऊं नकोस म्हणून ? म्हणायचं असेल, तर ' जयरामजी की ' म्हण. नाहींतर कांहींच म्हणूं नकोस— "

" चंदनबाई, रागावूं नका या गरीब आंधळ्यावर. तोंडाला संवय झाली आहे सलाम म्हणायची. त्यामुळं याद रहात नाहीं तुमच्या सांगण्याची— "

" बरं, बरं ! पण आज महालक्ष्म्या असल्या, तरी आमच्या घरीं सण नाहीं, रे. मीच जाणार आहे अंजु मावशीकडे जेवायला— "

" मग तुमच्या मावशी काय या गरीब आंधळ्याला वाढणार नाहींत ? आज महालक्ष्म्या जेवायच्या. सोळा चटण्या, सोळा भाज्या, सोळा पक्वान्नं करणार असतील तुमच्या मावशींकडे. दुपारपासून रात्रीपर्यंत जेवणं होतील आज. माझ्यासारखा एक आंधळा सहज खपून जाईल एवढ्या रगाड्यांत— "

" खरं आहे रे. पण कितीहि झालं, तरी दुसऱ्याचं घर तें. बरं, पण ये तूं रात्रीं आठच्या सुमारास. मी मोठ्या मायला सांगून ठेवीन तुला पुरणपोळी वाढायला— "

चंदननें म्हटलें आणि दशरथनें दिलेल्या आशीर्वादाकडे लक्ष न देतां ती लगबगीनें घरीं आली.

" कां ग, किती उशीर केलास घरीं यायला, पोरी ? अंजूनं सकाळीं आठ वाजल्यापासून बोलावलं होतं; न् तूं आतां दहाला घरीं आलीस. याच्यापुढं आपण जाणार केव्हां ? काय म्हणेल ती आपल्याला ?— "

छपरींत उभ्या असलेल्या येसूनें ती दृष्टीस पडतांच विचारलें.

" माझी थोरली बहीण का नाहीं उजाडल्याबरोबर आली ? नातीच्या लोभानं दहा वाजेपर्यंत कशाला थांबली घरीं ?—असं म्हणेल मावशी तुला तिथं गेल्यावर— "

चंदननें हंसत हंसत येसूजवळ जाऊन तिला म्हटलें आणि आपलीं पुस्तकें तिच्या हातीं दिलीं.

" म्हणजे मीच वेडी ठरलें तुझ्या मतानं ? मीं सकाळीं उठल्याबरोबर जायला हवं होतं एकटीनं तिथं न् मग तूं आली असतीस दुपारीं बारा वाजून गेल्यावर रघोजी राजाच्या राणीसारखी आयत्या वेळीं जेवायला, असंच ना ?— "

येसू तिच्याकडे लटक्या रागानें पहात म्हणाली.

" बरं, आटप लवकर आतां तरी. ती नवी साडी नेस. तुझ्या मायनं ताटांत काढून ठेवलंय तें अंगावर घाल न् चल लवकर. ती केव्हांची वाट पहातेय तुझी— "

चंदन मुकाट्यानें माजघरांत गेली.

तिला आलेली पहातांच रखमा फक्त एवढेंच म्हणाली—

" आलीस बाई ! लवकर आटप आपलं. आज जिथं जेवायला जायचं, तिथल्या माणसांना उपयोग झाल्यासारखा वाटला पाहिजे आपला. नुसतं जाण्यांत काय अर्थ आहे ? आज पुरण वाटण्यापासून माळा करण्यापर्यंत सगळीं कामं असतील तिथं. आणि आपण असं उशिरानं जायचं का ? उद्यां लग्न झालं म्हणजे कसं होईल तुझं ?— "

चंदन कांहीं बोलली नाहीं. तिनें भरभरा साडी बदलली, केस नीटनेटके केले आणि मिशनमधून तयार करून आणलेली कुंदाच्या फुलांची वेणी डोक्यांत घातली.

नंतर मानेवर आणि तोंडावर फुलानें पावडर ओझरती दाबून तिनें रुमालाच्या घडींत चमेलीचीं फुलें ठेवलीं; व ती बाहेर येऊन येसूला म्हणाली—

" निघायचं हं मोठी माय. मी तयार आहे आतां— "

" हें काय ग, अंगावर नाहीं घातलंस तें कांहीं ?— "

" काय घालायचं अंगावर ?— "

" तुझ्या मायनं ताटांत काढून ठेवलेलं पाह्यलं नाहींस कां तूं ?—"

" पाह्यलं. पण तें अंगावर नाहीं घातलं तर चालणार नाहीं का ? मला आवडत नाहीं तसलं कांहीं अंगावर घालायला—"

" चंदन !— "

येसू तिच्याकडे पाहून रागानें उद्गारली.

" आज महालक्ष्म्या जेवायच्या; न् तूं अशी अंगावर कांहीं घातल्याशिवाय लंकेच्या पार्वतीसारखी जेवणार का तिथं येऊन ? काय चमत्कारिक पोरगी आहेस ग तूं ?—"

" काय केलं ग मीं ?—"

चंदननें उलट रागानें येसूकडे पाहून विचारलें. तिचे डोळे पाण्यानें भरून आले होते.

" काय केलं ? अंगावर कांहीं घातल्याशिवाय येते म्हणतेस तूं तिथं ? ही काय रीत झाली का वागायची ?—"

" मग मी नाहीं आलें तर नाहीं का चालणार ?—"

" चंदन ! "

येसू रागानें थरथरा कांपत होती.

" सुनबाई, तूं तरी सांग बाई आपल्या लेकीला कांहीं—"

" तुम्हीच सांगा आपल्या नातीला ! तुम्हांला फार कौतुक आहे तिच्या शिकण्याचं न् मिशनमध्यें जाण्याचं. तिच्या मावशीनं दिली नसेल परवानगी तिला अंगावर घालायला— "

रखमा आंतून रागानें म्हणाली आणि तिनें हांक मारली—

" चंदन— "

चंदन मुकाट्यानें आंत गेली.

" तें ताटांत ठेवलेलें अंगावर घाल न् चल. आधीच वेळ झालाय् फार— "

चंदन कांहीं बोलली नाहीं.

तोंच येसू आंत येऊन म्हणाली—

" कां ग, उभी कां तूं ? यायचं नाहीं का तुझ्या मनांत आज आमच्या बरोबर— "

" मोठी माय, मला कांहीं हें अंगावर घालायची इच्छा नाहीं— "

" कां ग ? आपल्या घरची लक्ष्मी आहे बाई ही. तुझ्या मायच्या निढळाच्या घामाच्या कमाईची. तिचा अव्हेर करू नये अशा रीतीनं— "

" अव्हेर करायची मुळींच इच्छा नाहीं माझी. आजवर नव्हतें का मी अंगावर घालीत तुम्ही सांगाल तें ? पण आतां आवडत नाहीं मला असलं कांहीं अंगावर घालायला— "

" बरं बाई ! तूं शिकलीसवरलेली पोर. तुझ्यापुढं कोणी बोलावं ? नको घालूंस तुला नसतील आवडत तर— "

येसू उद्वेगानें म्हणाली.

पण तें बोलणें इतका वेळ मुकाटयानें ऐकत असलेल्या रखमानें म्हटलें—

" चला सासूबाई, आपण दोघीच जाऊं या. ही राहील घरीं. नाहीं तर बसेल आपल्या मावशीकडे जाऊन गुजगोष्टी करीत— "

" हें काय म्हणतेस, सुनबाई ? हिला जर न्यायची नाहीं, तर आपण तरी कशाला जायचं तिथं ? आणि ही आली नाहीं, तर अंजूला तरी काय वाटेल ?— "

" पण तिच्या मनाला कांहीं वाटतंय का पहा ना तुम्ही ! म्हणे दागिने आवडत नाहींत मला. खरोखरी तुम्ही हिचे नाहीं नाहीं ते लाड करून डोक्यावर बसवलीत हिला. हिचं जर वेळेवारी लग्न झालं असतं, तर ही असलं बोलायची अक्कल सुचली असती का हिला ? अशा रीतीनें जर ही येणार असेल तिथं, तर त्यापेक्षां मुळींच न आलेली पुरवली— "

रखमा रागारागानें म्हणाली.

चंदन खालीं मान घालून उभी होती. येसूनें त्या ताटांतली पुतळ्यांची माळ उचलली आणि ती चंदनच्या जवळ जाऊन म्हणाली—

" माझ्यासाठीं तरी नाहीं म्हणूं नकोस, बेटा. एवढं गळ्यांत घाल न् चल आतां. तुझी माय किती रागावली आहे पाह्यलंस ना ?— "

चंदननें डोळे पुसून मुकाट्यानें ती पुतळ्यांची माळ गळ्यांत घातली व शिक्क्याची घागऱ्या लावलेली मुदीहि येसूनें तिच्या बोटांत चढवली.

नंतर एक शब्दहि एकमेकींशीं न बोलतां त्या तिघी घरांतून बाहेर पडल्या आणि अंजिराच्या घरीं आल्या.

येसू आणि रखमा या आल्याबरोबर हातपाय धुवून अंजिराच्या मदतीला

लागल्या. चंदन जेव्हां त्यांच्या मागोमाग स्वयंपाकघरांत आली, तेव्हां अंजिरानें तिला प्रेमानें म्हटलें—

" तुझं काम नाहीं पोरी येथें. आज तूं सणासुदीला जेवायला आलेली—तूं हात नको लावूं कामाला. आतां येईलच गुलाब आपलं काम आटोपून. मग बसा गोष्टी बोलत माडीवर तुम्ही— "

" अग, मी माळा करायच्या असल्या तर करतें, मावशी—"

" नको, नको. आज खेड्यावरनं बायामाणसं आलीं आहेत तीं करतील सगळं. तूं थोडसं खाऊन घे न् बैस वर जाऊन—"

त्यावर कांहीं न बोलतां चंदन माडीवर आली; व समोर जें भोंसल्यांच्या राजस्मशानांतील काशीबाईचें सुंदर देऊळ होतें, त्याच्या घुमटाकडे पहात उभी राहिली.

त्या घुमटाकडे दृष्टि जातांच नागपुरांत ज्या दिवशीं ती प्रथम आली, तो दिवस, सात वर्षांपूर्वीचा तो प्रसंग तिच्या डोळ्यांपुढें उभा राहिला आणि तिला वाटलें, या सात वर्षांत आपलें आयुष्य किती विलक्षण रीतीनें बदलून गेलें ? आपली पूर्वीची स्थिति कायम असती, आणि चंदनवाडीलाच जर आपण आज असतों, तर आपली माय वारंवार म्हणते त्याप्रमाणें एव्हांना आपलें लग्न होऊन जातें आणि कदाचित् एकाद दुसरें मूलहि आपल्याला झालें असतें. चंदनवाडींतील आपल्या बरोबरीच्या इतर मुलींपेक्षां जें अगदीं निराळें असें वळण आपल्या आयुष्याला लागलें, तें जर आपण नागपूरला आलों नसतों आणि त्याहिपेक्षां आपली मावशी, सिस्टर ख्रिश्चियाना ही जर आपल्याला अचानक भेटली नसती, तर लागलें असतें का ? सिस्टर ख्रिश्चियाना आपल्याला भेटली आणि तिनें आपलें सगळें आयुष्य बदलून टाकलें. तिनें आपल्या आयुष्याला दिलेलें हें वळण, तिचें आपल्यावर असलेलें प्रेम आणि आपलें तिच्याशीं असलेलें रहस्य हें आपल्या आईला आवडत नाहीं; तिचें वर्तन आपल्याशीं दिवसेंदिवस जास्त जास्त तुटक, जास्त जास्त चमत्कारिक होत चाललें आहे. विशेषतः, आपलें लग्न करून टाकण्याचा तिचा हट्ट मावशीनें मोठ्या मायची समजूत घालून सफल होऊं दिला नाहीं आणि तेव्हांपासून तिनें आपल्याशीं कारणाशिवाय बोलणें सोडून दिलें आहे--या सगळ्या गोष्टी चंदनच्या मनांत आल्या. मघाशीं तिनें मावशीवरून आपल्याला दिलेले टोमणे तिला आठवले आणि तिला वाटलें, आपल्या आईच्या आततायी स्वभावापुढें किती दिवस निभाव लागेल आपला ? मोठी माय आहे, तोंपर्यंत भीति नाहीं फारशी; पण तें पिकलें पान

गळून पडल्यावर मग कसें होईल आपलें ? सध्यांच माय सारखें म्हणते आहे कीं, यंदा मॅट्रिकची परीक्षा झाल्याबरोबर मी तुझें लग्न करून टाकणार म्हणून. त्याप्रमाणें तिनें जर खरोखरीच आपलें लग्न करावयाचें ठरवलें तर ? विशेषतः, त्या सरदार मोहित्यांनीं मागणी घातल्यापासून तर माय फार अधीर झाली आहे आपलें लग्न करायला आणि आपली नात इतक्या मोठ्या घराण्यांत पडते आहे हें पाहून मोठी माय सुद्धां आयत्या वेळीं तयार व्हायची लग्नाला. तसें घडलें, तर कॉलेजांत जायची आपली इच्छा कशी साध्य होणार ? अवधूत वारंवार अलिकडे म्हणतो, तुम्ही कॉलेजांत आलांत, म्हणजे आम्ही चळवळींत ओढूं तुम्हांला आमच्या. आणि आपलें लग्न झालें तर ? त्या मोडकळीस आलेल्या सरदारीच्या मोहानें आपल्या मोठ्या मायनें त्या व्यसनी बिजवरांच्या गळ्यांत आपल्याला बांधायचें ठरवलें तर ?

तो विचार मनांत आला आणि अवधूतची मूर्ति तिच्या डोळ्यांसमोर उभी राहिली. गेल्या दोन अडीच वर्षांत त्यांचा संबंध झपाट्यानें वाढत गेला होता. तिच्या आईला आणि आजीला कल्पनाहि नव्हती त्या गोष्टीची. तो तिच्या घरीं कधीं आला नव्हता आणि तिनेंहि त्याला कधीं बोलावलें नव्हतें. पण हिराच्या घरीं त्यांची आठवड्यांतून एकदोनदां तरी भेट होई. तिला पुष्कळदां वाटे, हिराच्या घरीं जाण्याचे आपले दिवस त्यानें लक्षांत ठेवले आहेत आणि त्या दिवशीं तो आपल्याला भेटण्यासाठीं मुद्दाम येत असावा तिथें. पण तो तिच्याशीं इतका जपून वागत असे कीं, आपल्याविषयीं त्याच्या मनांत कांहीं विशेष भावना आहे असें समजावयाला अजून तरी तिला जागा सांपडली नव्हती. तरी सुद्धां जेव्हां जेव्हां तिच्या लग्नाचा विषय निघे, तेव्हां तेव्हां अवधूतची आठवण होऊन तिला कसें-सेंच वाटे.

" कसलं मनोराज्य करते आहेस ग इथं एकटीच उभी राहून ? "

गुलाबनें तिच्या खांद्यावर अलगत हात ठेवून हंसत हंसत विचारलें.

त्याबरोबर चंदन चमकून मागें वळली आणि किंचित् लाजून तिनें म्हटलें—

" कसलं नाहीं. तुझीच वाट पहात होतें, आत्याबाई—"

" खरं नाहीं बोलत तूं हें, चंदन. माझी वाट पहात जर तूं उभी असतीस, तर रस्त्यानं येतांना मी दिसलें नसतें का तुला ? मी माडीवर आल्यावर तरी माझी चाहूल लागली नसती का तुला ? छे, छे, कांहीं तरी मनोराज्य चाललं होतं तुझं— "

" छे ग, मी कसलं मनोराज्य करणार, आत्याबाई ?—"

" हें बघ, मीं किती वेळां सांगितलंय तुला चंदन, तूं मला आत्याबाई म्हणूं नकोस म्हणून ! तुझ्या तोंडचा तो आत्याबाई शब्द ऐकला कीं नाहीं कीं, मला वाटतं आपली साठी उलटून गेली, तोंडाचं बोळकं होऊन गेलं आणि केसांची पिकून आंबाडी झाली— "

गुलाबनें हंसत हंसत म्हटलें आणि वाऱ्यानें कपाळावर आलेले केस मागें सारले. तिच्या सांवळ्या लांबट तोंडावर मातांचा एकाद दुसरा वण होता; दांतहि किंचित् बाहेर होते; व तिच्या विपुल केशभारांतहि मधूनच एखादी रजतरेषा चमकतांना दिसे. पण, तिच्या काळ्याभोर पाणीदार डोळ्यांत जी निर्भय आनंदाची लकाकी होती, तिनें उजळलेला तिचा चेहरा पाहतांच मनांत एक प्रकारचा आदरयुक्त विश्वास उत्पन्न होत असे. तिचें तें विनोदी, हास्यनिर्भर बोलणें ऐकून चंदनच्या गुदमरलेल्या त्रस्त मनाला एकदम बरें वाटलें आणि ती उलट हंसून म्हणाली—

" कांहीं तरीच बोलतेस तूं— "

" अग, मी तुझ्यापेक्षां फार तर सात आठ वर्षांनीं मोठी असेन न् तूं मला आत्याबाई कसलं म्हणतेस ? नुसतं गुलाबताई म्हण म्हणून किती वेळां सांगितलंय मीं तुला ? "

" पण माझ्या मायला आवडत नाहीं तसं म्हटलेलं. ती म्हणते, अंजिरामावशीला वाटेल ही आदब ठेवीत नाहीं आपल्या लेकीची— "

" हें बघ, तूं माझी आदब ठेवायची कीं नाहीं हा प्रश्न त्यांचा नाहीं, चंदन. तुझा न् माझा आहे. आमच्या सगळ्या नातलगांत तूंच काय ती इतकी शिकली-सवरलेली आहेस; न् म्हणून तुझ्याशीं मी बोलूं शकतें मोकळेपणानं. ती तूंच जर मला आत्याबाई म्हणूं लागलीस, तर म्हातारपण आल्यासारखं कां वाटूं नये मला ?— "

बोलतां बोलतां गुलाबनें चंदनचा हात धरला आणि तिला आंत आणली.

तिच्या वृत्तींतली ती प्रसन्न निर्भयता पाहिली म्हणजे चंदनला वाटे, सगळें जग जिला दुर्दैवी समजतें, ती ही अहेवपणीं वैधव्याच्या यातना भोगीत असलेली गुलाब इतकी आनंदांत कशी राहूं शकते ? गेल्या तीन वर्षांत तिनें नवऱ्याचें तोंड पाहिलें नव्हतें. नवऱ्यानें दुसरें लग्न केल्यावर ती मुकाट्यानें एक दिवस नागपूरला आली; राष्ट्रीय कन्याशाळेच्या चालकांना भेटून तिनें मुख्याध्यापिकेची जागा मिळवली;

व शाळेचें काम संभाळून उरलेल्या वेळांत निरनिराळ्या समाजोपयोगी चळवळींत भाग घ्यावयाला सुरवात केली. अंजिराला ती परत घरीं आली, हें मुळींच आवडलें नाहीं. तिनें असें बोलूनहि दाखवलें कीं, मराठ्यांत दोन दोन तीन तीन बायका करण्याची चाल असतां गुलाबला येवढें निकरावर येण्याचें काय कारण होतें? पण, तिनें जेव्हां फारच धुसफुसावयाला प्रारंभ केला, तेव्हां गुलाब एक दिवस अगदीं शांतपणानें तिला म्हणाली, "माय, तुला जर मी नकोशी झाली असेन, तर तसं स्पष्ट सांगून टाक मला. मी वेगळं घर करतें उद्यांपासून. पण त्या दारुड्या बदफैली माणसाच्या घरीं पुन्हा नांदायला जायची गोष्ट काढूं नकोस माझ्या समोर— "

त्यानंतर अजिरानें पुन्हा तो प्रश्न कधीं काढला नाहीं. तिच्या वडलांना ती घरीं परत आल्याबद्दल समाधानच झालें; व तिनें जेव्हां आपल्या धाकट्या भावंडांच्या शिक्षणाकडे लक्ष द्यावयाला प्रारंभ केला, तेव्हां तर आपल्या मागची एक काळजी दूर झाली असेंच त्यांना वाटलें. तिची खादी, तिचें सूत कांतणें, तिचा सोमवारचा उपास, तिचें रोज सूर्यास्तापूर्वी जेवणें, तिच्यामुळें घरीं होणारी खालच्या जातींतल्या बायकामुलांची वर्दळ वगैरे गोष्टी अंजिराला अगदीं आवडत नसत. पण, तिच्या मिळवतेपणाचा आणि निःस्पृहतेचा असा कांहीं वचक अंजिराला वाटत असे कीं, लेकीला कोणत्याहि बाबतींत आपण कांहीं बोलावयाचें नाहीं असें तिनें मनाशीं ठरवून टाकलें होतें.

"किती दिवसांनीं भेटलीस ग तूं मला? नागपंचमीच्या दिवशीं आली होतीस जेवायला. त्यानंतर ही भेट— "

तिनें चंदनकडे आपल्या तेजस्वी, भेदक डोळ्यांनीं न्याहाळून पहात म्हटलें.

"हो. पोळ्याच्या दिवशीं आम्ही सगळीं चिचभुवनला तुमच्या शेतावर गेलों होतों जेवायला. पण तूं कुठं आली होतीस? मला त्या दिवशीं अगदीं चुकल्या-चुकल्यासारखं झालं— "

"त्या दिवशीं येऊं शकलें नाहीं मीं. कांहींतरी काम निघालं बघ. शिवाय सबंध दिवस तिथं मोडायची तयारीहि नव्हती माझी. आपल्या सणांत कीं नाहीं वेळ न् अन्न यांची नासाडी होते फार. दुपारपासून रात्रींपर्यंत पंक्ति उठत असतात सारख्या. बिचाऱ्या बायका राबत असतात दिवसभर. पण त्यांनाहि आपल्या कष्टांची जाणीव नसते न् वाटेल तेव्हां येऊन जेवायला बसणाऱ्या पुरुषांनाहि कांहीं वाटत नाहीं त्या

कष्टांचं. आज पहा ना तूं आतां. आई न् मावशी मध्यरात्रीपर्यंत नाहीं जेवायच्या. मला तें पाह्यला आवडत नाहीं न् म्हणून मीं यायचं टाळलं— ”

“ मग कशी व्हायची ग भेट तुझी ? तुझा वेळ तर अगदीं आंखलेला न् मोजका—”

“ अग, तसंच हवं. आयुष्याचा प्रत्येक क्षण कारणीं लागला पाहिजे. तुझी ती मिशनमधली मावशी पहातेस ना किती काम करते दिवसभर तें ? आपलं आयुष्य कुठल्या ना कुठल्या तरी कार्याला वाह्यलेलं आहे या भावनेनं काम करणारीं माणसं आपल्यांत उत्पन्न झाल्याशिवाय समाज सुधारायचा नाहीं आपला—”

ती बोलतां बोलतां एकदम थांबली आणि तिनें चंदनचा हात आपल्या हातांत घेऊन विचारलें—

“ बरं, पण मॅट्रिक झाल्यावर काय करायचं ठरवलं आहेस तूं ?—”

“ अद्याप तर कांहीं नाहीं. शिवाय मी कोण ठरवणार ?—”

“ मग कोण ठरवणार ? तुझं तुलाच ठरवलं पाहिजे आपलं पुढलं आयुष्य. आई न् आजी यांना काय कळतंय त्यांत ? त्या उद्यां तूं मॅट्रिक झाल्यावर लग्नाला उभी रहा म्हणतील फार तर तुला—”

“ तें तर चालूच आहे सारखं मायचं. ते सरदार मोहिते माहीत आहेत ना तुला ? त्यांनीं मागणी घातल्यापासून तर माय म्हणते, मार्गशीर्षांत उरकून टाकूं या लग्न म्हणून. पण मावशीनं मोठया मायची समजूत घातली न् परीक्षेपर्यंत टळलंय गंडांतर कसंबसं तूर्त—”

“ अस्सं ! मग सरदारीणबाई होणार म्हणायचीस तूं ! मला माहित आहे तो मोहिते. तो जर चांगला शिकला सवरलेला निर्व्यसनी मनुष्य असता, तर मी नको म्हटलं नसतं, तो जरी बिजवर आहे तरी सुद्धां. उलट मला आनंदच वाटला असता त्याबद्दल. कारण अशा प्रकारच्या पोटजातींतल्या लग्नामुळं मराठे, देशमुख, पाटील, कुणबी, लेवा वगैरे जे आपल्यांतले बारीकसारीक कृत्रिम पोटभेद आहेत, ते नाहींसे होऊन मराठा समाजांत ऐक्य निर्माण व्हायला मदत होते. पण तो माणूस चांगला नाहीं. छे, छे ! हें लग्न होतां कामा नये मुळींच—”

“ पण मग तूं सांग ना तसं आज मोठ्या मायला—”

“ तिनं विचारल्याशिवायच ?— ”

" हो. तुझ्यावांचून कोण आहे दुसरं गुलाबताई, आपल्या मंडळींत माझ्या बाजूनं बोलायला ?— "

चंदननें तिच्या नजरेला नजर देऊन म्हटलें.

त्याबरोबर तिच्या पाठीवर हात फिरवून गुलाब म्हणाली—

" बरं, बरं. तूं भिऊं नकोस मुळींच. आज मी मावशीला स्पष्ट सांगतें तुला त्या सरदार मोहित्याला द्यायची नाहीं म्हणून. एकदां कां तूं त्याच्या जनानखान्यांत गेलीस, म्हणजे मग जन्मभर तोंड काढूं देणार नाहीं तो तुला पडद्यांतून बाहेर. कसले मेले हे सरदार !—"

त्यानंतर कितीतरी वेळ त्या दोघी गप्पा मारीत होत्या. गुलाबच्या वागण्या-प्रमाणेंच बोलण्यालाहि एक प्रकारची धार होती. पण तिचें तें बोलणें ऐकतांना चंदनला नेहमीं वाटे कीं, आपल्या खिश्चियाना मावशीच्या स्वभावांतला मायाळूपणा जरी तिच्या कठोर बोलण्यांत नसला, तरी जगाकडे सहृदयतेनें पाहण्याची आणि त्यांतलें दैन्य सगळें दूर करण्यासाठी झटण्याची दृष्टि ही जशी एकीच्या मायाळू-पणाच्या मुळाशीं आहे, तशीच दुसरीच्या कठोरपणाच्याहि मुळाशीं आहे; व या दृष्टींतच त्या दोघींच्या थोरवीचें, त्यांच्या दिवसभर अविश्रान्त कष्ट करण्याच्या स्वभावाचें मर्म आहे. त्यामुळें गुलाबचें बोलणें ऐकत असतांना, आपण एक अगदीं नवें व्यक्तित्व, नवें सामर्थ्य पहात आहोंत, असें तिला वाटे.

सायंकाळीं पांचच्या सुमारास जेव्हां त्या दोघी जेवणासाठीं खालीं आल्या, तेव्हां पहिली मुख्य पंगत होऊन गेली होती.

माजघरांत एका प्रशस्त तक्तपोसावर जुना किमती गालिचा पसरून त्यावर महा-लक्ष्म्या मांडलेल्या होत्या. दोहों बाजूंना तेवत असलेल्या समयांच्या सौम्य प्रका-शांत त्यांचे सुबक मुखवटे तकतकत होते; व पांच सहा वर्षांच्या दोन साजऱ्या मुलीच सजवून उभ्या केलेल्या असाव्यात, तसा त्यांचा थाट दिसत होता. दोघींना जुन्या भरजरी पैठण्या नेसवून नथ, कुडीं, साज, पुतळ्यांची माळ, गोठतोडे वगैरे दागिने त्यांच्या अंगावर घातलेले होते. दोघींच्याहि गळ्यांत चमेलीच्या माळा होत्या; व मंदिलाच्या चोळीवर लावलेलीं केवड्याचीं पिवळीं जर्द पानें सोन्याच्या पदकांसारखीं दिसत होतीं. समोर तांदुळाच्या राशी घातलेल्या असून, काकडी, पडवळ, मक्याचें कणीस वगैरे फळभाज्या पुढें ठेवलेल्या होत्या. वर जी शोभिवंत मंडपी होती, तिला करंज्या, चिरोटे, पात्या वगैरे पक्वान्नांचा पांढरा शुभ्र

फुलोरा लावलेला होता. महालक्ष्म्यांपुढें दोन गोजिरवाणीं हंसतमुख बाळेंहि सजवून बसविलेलीं होतीं.

तक्तपोसासमोर सुंदर रांगोळ्या काढून त्यांत रंग भरलेले होते; व नैवेद्याचीं पानें चौरंगावर मांडलेलीं होतीं. केळीच्या लांबरुंद पोपटी रंगाच्या पानांवर चांदीचीं छोटीं ताटें ठेवून त्यांत नैवेद्य वाढलेला होता. सोळा चटण्या, सोळा भाज्या आणि सोळा पक्वान्नें हीं जरी अगदीं थोडथोडीं वाढलेलीं होतीं, तरीसुद्धां ताटें आणि पानें दोन्हीं अगदीं भरून गेलीं होतीं. पुरणाची पोळी, पडवळाची कढी, ज्वारीची आंबिल आणि कणकेचीं फळें हीं मुख्य पक्वान्नें मात्र पूर्ण वाढलेलीं होतीं.

त्या दोघी माजघरांत येतांच अंजिरा त्यांना म्हणाली—

" आल्यात बायांनों ! महालक्ष्म्यांना हळदीकुंकू आणि फूलअक्षता वहा न् बसा जेवायला. फार वेळ थांबावं लागलं तुम्हांला— "

त्यांनीं मुकाट्यानें महालक्ष्म्यांना हळदीकुंकू वाहिलें आणि त्या जेवावयाला बसल्या.

जेवणाला सुरवात होते न होते, तोंच अंजिरा चंदनकडे पहात कौतुकानें म्हणाली—

" देशपांड्यांच्या मुली पाह्यल्या आहेस का तूं अलिकडे, येसूताई ? मला वाटतं, त्यांच्या कोणत्याहि मुलीपेक्षां खात्रीनं साजरी आहे तुझी नात— "

" तूंच म्हणालीस म्हणून बरं ! पण सूनबाईला कांहीं आवडत नाहीं चंदनविषयीं असं कुणी बोललेलं— "

येसू रखमाकडे पाहून म्हणाली. त्याबरोबर रखमानें चट्दिशीं म्हटलें—

" मुलांच्या समोर कांहींहि बोलायचं झालं, तरी तें जपूनच बोललं पाहिजे. नाहीं तर शेफारून जातात तीं. शिवाय मीं कुठं देशपांड्यांच्या मुली पाह्यल्या आहेत, आपल्या मुलीला त्यांच्यापेक्षां साजरी ठरवायला ?— "

" मीं असं ऐकलंय कीं, देशपांड्यांची सगळीच मंडळी राह्यला आली आहेत अलिकडे सिव्हिल लाईन्समध्यें. त्या हिंगणघाटच्या शेठजीनं दादासाहेबांना गिरणींतून काढलं असंहि म्हणतात कुणी कुणी. त्यांचा मुलगा संपाबिंपांत बोलला सभेमध्यें. त्या रागानं काढलं म्हणतात शेठजीनं त्यांना— "

" आपल्याला काय करायचंय सासूबाई त्याच्याशीं ?— "

" कसं नाहीं करायचं ? आपली चंदनवाडी घशांत घालतांना नाहीं कांहीं त्यांना वाटलं ? आतां भोगा म्हणावं फळं आपल्या कर्माचीं—"

येसू आवेशानें उद्गारली.

ती आपल्या आवडत्या विषयावर आली व आतां जर आपण विषय बदलला नाहीं, तर ती सारखें चंदनवाडीबद्दलच बोलत राहील, हें लगेच अंजिराच्या लक्षांत आलें; व म्हणून तिनें येसूला विचारलें—

" मग यंदा लग्न करणार का ग चंदनचं ? का तिला कॉलेजांत घालायचा बेत आहे पुढल्या वर्षी ?—"

त्याबरोबर येसूकडून तिला कांहीं उत्तर मिळण्यापूर्वी रखमा मध्येंच म्हणाली—

" छे, छे ! झालं हेंच शिक्षण फार झालं. सासूबाईचा आग्रह नसता, तर यापूर्वीच मीं लग्न करून टाकलं असतं हिचं. गेलीं दोन वर्षं सारखे कुणी कुणी चौकशी करून जाताहेत—"

" कां नाहीं जाणार ? देखणी न् शिकलेली. कांहीं उणं आहे कां हिच्यांत ? बाकी तें सरदार मोहित्याचं स्थळ मात्र हातचं गमावूं नकोस तूं येसूताई. त्याला फक्त पहिल्या लग्नाचा डाग लागलाय एवढंच. बाकी तें स्थळ अगदीं हिच्या रूपागुणांना साजेसं आहे—"

चंदन मुकाट्यानें खालीं मान घालून पानांतला एक एक पदार्थ संपवीत होती; व गुलाबहि आतांपर्यंत कांहीं बोलली नव्हती. पण आपल्या आईनें येसूला दिलेला तो सल्ला ऐकतांच तिनें अगदीं शांतपणानें अंजिराकडे पाहून म्हटलें—

" माय, माझ्या जन्माचं मातेरं केलंस पैसेवाल्या माणसाच्या नादीं लागून तेवढं पुरें नाहीं झालं ? आतां आणखी चंदनच्या लग्नाची पंचाइत कशाला करतेस तूं ?—"

तिनें सटकन उच्चारलेले ते शब्द अंजिराला अगदीं जिव्हारीं झोंबले. पण, ती कांहीं बोलणार, तोंच येसू रागानें म्हणाली—

" तुला कुठं काय बोलावं हें कांहीं समजत नाहीं गुलाब, इतकी शिकलीस तरी. आम्ही चंदनला मोहित्यांच्या घरीं देऊं तें काय अकल्याण करण्यासाठीं कां तिचं ?—"

" नाहीं तर काय ? इतकीं वर्षं तुम्ही तिला शिकवलीत मावशी, न् आतां धड चार शब्द सुद्धां इंग्रजी बोलतां न येणाऱ्या आणि मराठी लिहितां न येणाऱ्या त्या गलेलठ्ठ ठोंब्याला ही सोन्यासारखी पोर देणार का तुम्ही आपली ? त्याच्या त्या

जुनाट वाड्यांतल्या जनान्याच्या पडदपोशींत ती एकदां गाडली गेली म्हणजे मन संतुष्ट होईल नाहीं तुमचं ती सरदार घराण्यांत पडल्याबद्दल !--"

तिचा तो कडाका पाहून येसू नरमल्यासारखी झाली. पण क्षणभरच. ती लगेच उसळून म्हणाली—

" हो, हो, ती आमची पोर आहे. आम्ही तिला वाटेल त्याच्या गळ्यांत बांधूं. ममजलीस गुलाब !— "

" पण तिलाहि कांहीं आपलं बरं वाईट समजतं, मावशी. तीहि कांहीं लहान नाहीं आतां— "

" गुलाबवन्सं, तुम्ही इतका वेळ माडीवर बसून हेंच शिकवलंत का चंदनला ? पण लक्षांत ठेवा. ती माझी मुलगी आहे. मी तिचे भलते सलते थेर कधीं नाहीं चालूं देणार— "

रखमाची ती धमकी ऐकतांच इतका वेळ गप्प असलेली चंदन एकदम वर पाहून म्हणाली—

" माय ग, मी तुझी मुलगी आहे, मोठ्या मायची नात आहे आणि माझी स्वतःची मात्र मी कोणीच नाहीं कां ग ? माझा स्वतःवर काडीचा देखील हक्क नाहीं कां ?— "

" बरोबर आहे प्रश्न तुझा, चंदन ! स्त्रीजन्म म्हणजे मूर्तिमंत पारतंत्र्य. लहानपणीं आईबापांची ताबेदारी, मोठेपणीं नवऱ्याची ताबेदारी आणि म्हातारपणीं मुलांची ताबेदारी. मिळून स्वतंत्रपणा आणि उजागरी अशी बायकांना कधीं नाहींच कोण-त्याहि बाबतींत— "

" मग तुझ्यासारखं रहावं म्हणतेस बायकांनीं ?— "

येसूनें रागानें विचारलें.

" हो. त्यांत काय वाईट आहे ? तुझं म्हणणं असं आहे का मावशी, कीं मी त्या दारुड्या नालायख नवऱ्याच्या लाथा खात न् सवतीचे पाय चुरीत रहायला हवं होतं त्याच्या घरीं ? दुनियेंत इतक्या विधवा आहेत, तशी मी एक— "

" काय बोलतेस तूं हें, गुलाब ? आज महालक्ष्म्यांच्या दिवशीं असं कसं अभद्र बोलवतं तुला ?—"

" अभद्र काय आहे त्यांत एवढं माय ? ज्या नवऱ्याचं तोंड आतां पुन्हा कधींहि

माझ्या दृष्टीस पडण्याचा संभव नाहीं, तो मला मेल्यासारखा न् मीहि त्याला मेल्यासारखीच नाहीं कां खरोखरी ?— ”

अंजिरा कांहीं बोलली नाहीं.

पण गुलाबच्या त्या निष्ठुर बोलण्यामुळें जेवणांतली सगळी गोडी निघून गेली होती. पानावर वाढलेले पदार्थ त्यांनीं कसेबसे संपवले; व येसूनें जरी थोडासा आग्रह करून पाहिला, तरी आणखी कांहींहि न घेतां त्या दोघी उठल्या.

हात धुतल्यावर महालक्ष्म्यांपुढें ठेवलेल्या तबकांतला एक विडा चंदननें उचलला, केवड्याचीं दोन छोटीं पानें आपल्या वेणींत खोंवलीं आणि ती येसूला हळूच म्हणाली—

“ मोठी माय, मी जरा फिरून येतें थोडी. दशरथ येईल आठच्या सुमारास. त्याला वाढून दे थोडसं— ”

“ गुलाबबरोबर जाते आहेस कां तूं कुठं— ”

“ नाहीं. ती आतां जाते आहे कुठें सभेला. मी एकटीच फिरून येतें— ”

“ लवकर ये बरं. नाहींतर बसशील गप्पा मारीत— ”

पण तिची ती सूचना ऐकायला चंदन होती कुठें ? ती तोंडांत विडा कोंबून घरांतून जी बाहेर पडली, ती तडक सक्करदऱ्याच्या रस्त्याला लागली.

रस्त्यानें शहारांतले गणपति आणि महालक्ष्म्या पहावयाला निघालेल्या माणसांची नुसती रीघ लागली होती. ती झपाट्यानें चालत शिरसपेठेंत आली आणि सडक सोडून खालीं महार वस्तीकडे वळली.

सूर्य अद्याप मावळला नव्हता. पण, क्षितिजावर जे काळभोर ढग पसरलेले होते, त्यांत त्याचें बिम्ब गडप होऊन गेलें होतें. जमिनीवर ठेवलेल्या दिव्याच्या प्रकाशानें जसें घर उजळून जावें, तसा त्या ढगांनीं गिळलेल्या सूर्यबिम्बाच्या प्रभेनें आकाशाचा सारा मंडप तेजाळून गेला होता; व ढगांच्या कडांनाहि सोनेरी रंगाची झिलई दिल्यासारखी दिसत होती. त्या ढगांआडून प्रकाशाचे जे तीन चार निळसर पट्टे नभोमध्यापर्यंत पसरले होते, ते पाहून सर्च लाईटच्या झोताची आठवण होत होती. त्या छायासंमिश्र सायंप्रभेंत पावसानें धुवून निघालेलीं हिरवीं गार झाडें आणि शेतांतून हातभर वर आलेलीं टवटवीत पिकें यांची रंगशोभा कांहीं विलक्षण दिसत होती. गुरांच्या गळ्यांतील घंटांचा आवाज आणि शेतांतून उडणाऱ्या बगळ्यांचा साद हा त्या रम्य सायंतन शांततेंत नादमाधुरी ओतीत होता.

चंदन आंत आली, त्या वेळीं हिरा छपरींत उभी होती. ती हंसत हंसत म्हणाली—

" महालक्ष्म्यांचं जेवण आतांच आटपलेलं दिसतंय अंजुमावशीकडलं— "

" हो बाई. मग चलतेस ना फिरायला ?— "

" चलते. पण आतांच चहा ठेवलाय— "

" आतां चहा न् तो कुणासाठीं ?— "

" वरती अवधूत न् अभि बोलत बसले आहेत, त्यांच्यासाठीं. तूं वर जा. मी चहा घेऊन येतें. मग फिरायला जाऊं आपण— "

तिची ती सूचना ऐकून चंदन घोटाळल्यासारखी झाली आणि म्हणाली—

" मी खालींच थांबलें तर ? चहा तयार झाल्यावर आपण बरोबरच वर जाऊं दोघी— "

" नको. तूं येणार हें माहित आहे त्यांना. अवधूतनीं चौकशी सुद्धां केली आल्याबरोबर तुझी— "

तेव्हां चंदन कांहीं न बोलतां मुकाट्यानें वर गेली.

तिला पहातांच अभिमन्यु हंसत हंसत म्हणाला—

" तूं आपल्या मस्तकावर महालक्ष्म्यांचा प्रसाद धारण केलेला दिसतोय आज चंदन— "

" हो. हा केवडा निर्माल्यांतलाच आहे त्यांच्या— "

तिनें आपल्याकडे टक लावून बघत असलेल्या अवधूतकडे न पहातां किंचित् लाजून म्हटलें.

" मी सुद्धां जाणार आहे आतां याच्याकडे जेवायला. आमच्यांत कांहीं हा सण नाहीं. लहानपणीं राजवाड्यांतल्या महालक्ष्म्या बघितल्यावर मीं जेव्हां मोठ्या मायला विचारलं, तूं महालक्ष्म्या कां मांडीत नाहींस म्हणून, तेव्हां ती मला म्हणाली, " हा मोठ्या लोकांचा सण आहे बापा ! आपल्या महाराच्या घरांत कुठल्या आल्या आहेत महालक्ष्म्या ? " मी महालक्ष्म्यांचं जेवण प्रथम याच्याकडेच जेवलों. याच्याकडल्या महालक्ष्म्यांचा थाट पहाण्यासारखा असतो—"

" छे रे, पहाण्यासारख्या महालक्ष्म्या आमच्या चंदनवाडीला असत. तो खरा थाट— "

अवधूत मध्येंच म्हणाला.

" चंदनवाडीला ?— "

चंदननें एकदम चरकून विचारलें. तिच्या चेहऱ्यावरला सगळा उल्हास नष्ट झाला होता.

"हो. का बरं ! तुम्ही दचकलांत कां एवढ्या चंदनवाडीचं नांव घेतल्या-बरोबर ?—"

पण चंदन आतां भानावर आली होती. ती बळेंच हंसून म्हणाली—

"कांहीं नाहीं. उगाच. मी आजच ऐकलंय तें फार सुंदर गांव आहे म्हणून—"

"खरं आहे तें. तुम्ही याल माझ्याबरोबर दिवाळींत आमच्या घरीं ? आपण तिथून कौंडिण्यपूरच्या यात्रेलाहि जाऊं. हा येणार आहे—"

"तुम्हीच मालगुजार का त्या गांवचे ?—"

"हो. आम्ही चंदनवाडीचे देशपांडे—"

त्यानें अभिमानानें म्हटलें. पण चंदन कांहीं बोलली नाहीं. तिच्या सर्व अंगाला दरदरून घाम सुटला आणि आपल्याला भोवळ येते कीं काय असें तिला वाटलें. तोंच अवधूत पुढें म्हणाला—

"पण आतां चंदनवाडी किती दिवस आमच्या ताब्यांत राहील हा प्रश्नच आहे एक—"

"कां बरं ?—"

"पूर्वीसारखी चांगली स्थिति राह्यलेली नाहीं आमची आतां. त्यामुळंच तर आमची मंडळी तिथून निघून नागपूरला राह्यला आली यंदा. तिथला खर्च न् रुबाब हीं दोन्ही परवडेनाशीं झालीं—"

तो तें सांगत असतांनाच चंदनच्या मनांत आलें, एकूण मघाशीं आपली मोठी माय बोलत होती, तें सगळें खरें तर मग ?

हा विचार तिच्या मनांत येत आहे, तोंच हिरा चहा घेऊन वर आली आणि तिनें तो कपांत ओतून त्या दोघांना दिला.

"या नाहीं घेणार चहा आपल्याबरोबर थोडा ?—"

अवधूतनें चंदनकडे पहात अभिमन्यूला विचारलें.

"मी आतांच जेवून आलें आहे माझ्या मावशीकडून—"

"तरी पण तुम्ही दोघीहि घ्या थोडासा आमच्याबरोबर. काय अभि ?—"

"घेतील रे त्या. हिरा, कप आण आणखी दोन. आपण सगळींच घेऊं

थोडा थोडा. पण का रे, तूं या चंदनला अहोजाहो कां म्हणतोस तिऱ्हाइतासारखं? आतां तुमची ओळख झाल्याला दोन वर्षे होतील— "

" मग काय म्हणूं ?— "

अवधूतनें त्याला हंसून विचारलें.

" नुसतं एकवचनी चंदन म्हण. आज महालक्ष्म्यांचा दिवस आहे. आजपासून सुरवात कर हिला एकवचनानं संबोधायला. ' न बहुवचनाला जागा कांहीं। एकवचन यथार्थचि होई '— "

अभिमन्यूनें 'मूकनायकां 'तल्या त्या पदाचे चरण हंसत हंसत म्हणतांच चंदन लाजेनें चूर होऊन गेली.

इतक्यांत हिरानें कप आणले. अवधूतनें आपल्या कपांतला अर्धा चहा त्यांत ओतला आणि तो कप चंदनच्या हातीं दिला.

त्याच्या हातांतून कप घेतांना चंदनला वाटलें, आपल्या हातांतून तो खालीं पडून फुटतो कीं काय ?

त्यानें किटलींतला उरलेला चहा दुसऱ्या कपांत ओतला आणि तो हिराला दिला.

चहा पिऊन होतांच चंदन म्हणाली, "जाऊं या आतां फिरायला आपण हिरा—"

" हो. मी हें घेऊन जातें खालीं. तूं ये मागोमाग माझ्या— "

हिरा लगेच चहाचें सामान घेऊन खालीं गेली.

तिच्या मागोमाग चंदन खोलींतून बाहेर पडून जिन्यापाशीं येते, तोंच अवधूतनें बाहेर येऊन विचारलें—

" हा रुमाल तुझा आहे का, चंदन ?—"

चंदननें मागें वळून पाहिलें आणि म्हटलें—

" हो—"

" काय सुंदर वास येतोय् याला ! कसला सेंट टाकलाय ?—"

" सेंट नाहीं. फक्त चमेलीचीं फुलं ठेवलीं होतीं त्यांत वास येण्यासाठीं—"

त्यानें त्या रुमालाचा पुन्हा एकदां वास घेतला आणि तो तिच्या हातांत दिला.

क्षणमात्र त्यांची दृष्टादृष्ट झाली.

तो हंसला—

पण, ती थरथरा कांपत आहे, असें त्याला वाटलें.

# शेवटची भेट

# ११

“ अजून तरी थोडा विचारानं वागशील तूं अशी आशा आहे मला. तूं पुलगांवच्या संपांत भाषण केल्यामुळं माधवदास शेठजीनं मला गिरणींतून काढलं आणि तूं जर असाच चळवळींत भाग घेत राहिलास, तर आपल्या गांवांवर सुद्धां जप्ती येईल उद्यां. आज कॉंग्रेस मंत्रिमंडळ अधिकारारूढ असल्यामुळं वायद्याच्या बाबतींत सारखी सवलत मिळते आहे आपल्याला. पण, तूं जर असा वागत राह्यलास, तर ते तरी किती दिवस गय करतील आपली ? या उतारवयांत तेवढीच एक अप्रतिष्ठा व्हायची राह्यली आहे माझी. तो प्रसंग तूं आणूं नकोस माझ्यावर—”

दादासाहेब रागारागानें बोलत होते. पिकून वाळूं लागलेल्या पानांतला रसरशीतपणा जसा नाहींसा व्हावा, तसा त्यांच्या सुरकुतलेल्या तोंडावरला सगळा रुबाब पार उतरून गेला होता.

अवधूत टेबलाला ओठंगून उभा होता आणि मुकाट्यानें त्यांचें तें बोलणें ऐकत होता.

सिराज तिथें आला, तेव्हां त्याला कल्पनाहि नव्हती कीं, दादासाहेब या वेळीं अवधूतच्या खोलींत असतील. त्यांचा तो कडकडाट कानावर पडतांच तो दारापाशींच थबकला. त्याच्या मनांत आलें, याच पावलीं आपण मुकाट्यानें परत जावें. म्हणून तो मागें वळणार, तोंच दादासाहेबांची नजर दाराकडे जाऊन त्यांनीं करड्या आवाजांत विचारलें—

“ कोण आहे रे तो ? इथं काय काम आहे या वेळीं ?—”

“ मैं सिराज हूं दादासाब—”

तो पुढें आला आणि त्यानें हात जोडून अदबीनें उत्तर दिलें. त्याबरोबर दादासाहेबांचा आवाज एकदम नरमला आणि ते म्हणाले—

" ये, ये, सिराज. मी थोडें कामाकाजासंबंधीं बोलत होतों याच्याशीं. पण संपलंच आहे आमचं बोलणं आतां— "

आणि ते पुन्हा त्याच्याकडे न पहातां ताठरपणानें पावलें टाकीत खोलींतून बाहेर पडले.

सिराज आंत आला आणि आपल्या स्वागतार्थ पुढें आलेल्या अवधूतचे
धरून म्हणाला—

" क्यों भाई, ये क्या बात है ?— "

" कुछ नहीं. तुझ्या कानांवर पडलं वाटतं कांहीं ?— "

" हो. दादासाहेब जप्तीबद्दल कांहींतरी बोलले; न् त
असं कांहींतरी अर्धवट ऐकलं मीं. खरं म्हणजे
पण तितक्यांत त्यांनीं मला पाह्यलं न् मग निग

" बरं झालं तूं आलास हें. त्याम
प्रसंगांतून— "

" पण खरं सांग मला काय
आणखी कांहीं केलंस का ?–

" तुझी अशी का सम
घराण्याला आले म्हणून
घेऊन माधवदास शेठज
नसतों, तरी ते निघाले
त्यांना ठेवलं, तेंच मो
आणि मॅनेजिंग डायरे
भावनेनं त्यानं इतके

" मग गिरणीश

" हो. तो एक

" पाश का म
अशी भाषा वाप

" कुटुम्ब त

फारकतीचा दावा दादांनीं सगळं कर्ज आपल्या एकट्याच्या डोक्यावर घेऊन आपसांत मिटवला घराण्याची आब जाऊं नये म्हणून. त्या कर्जाच्या ओझ्याखालीं चिरडतों आहोंत आतां आम्ही-- "

" पण कांहीं गांवं विकून कर्ज फेडतां येणार नाहीं का हें ?— "

" येईल. पण गांव विकायला काढणं कमीपणाचं वाटतं दादांना. शिवाय, जीं थोडीशीं गांवं आमच्या वाटणीला आलीं आहेत, तीं सगळीं विकलीं तरीहि कर्ज

कीं नाहीं याची शंकाच आहे मला— "

ाडी विकूनसुद्धां ?— "

्याची कल्पनासुद्धां सहन होत नाहीं दादांना. चंदनवाडी विकली

ून हा बंगला तरी शिल्लक राहील आम्हांला; न् दादांचं आणि

ाईल. तो माधवदास शेठ चंदनवाडी विकत घ्यायला

ादांना तसं कुणी कांहीं सुचवलेलं सुद्धां आवडत

चवताळून गेले अगदीं. " यापेक्षां मला विष

ने तिला एकदम. कर्जलवाद कायद्यामुळं

ं स्वतःचं कर्ज मात्र वाढतच आहे

सुस्थळीं पडलेल्या असल्यामुळं

दादा कसलाहि खर्च कमी

ेकट होत चालली आहे.

ल्यामुळें त्यांचं नुकसान

र्थ नाहीं, असें बोलतां

हणाला—

ंसल्यासारखें करून

ाझा— "

ा हातांतलें जें

तें पुडकें त्यानें सोडलें आणि त्यांतली एक फ्रेम अवधूतच्या हातीं दिली.

त्रिमूर्तीचें, त्रिराष्ट्रवादाचें प्रतीक-चित्र होतें तें.

त्याच्याकडे आनंदानें डोळे विस्फारून पहात अवधूत म्हणाला—

" हें तूं त्या विलायतेला पाठवलेल्या मोठ्या चित्रावरून मुद्दाम तयार केलंस माझ्यासाठीं ? खरोखरी ही भेट तूं अभिमन्यूला द्यायला हवी होतीस, सिराज—"

" नाहीं. मी त्याचं मन बरोबर ओळखतों. त्याच्यासाठीं मीं मुद्दाम एक चित्र काढलंय न् आपण दोघांनीं तें आतां त्याच्याकडे जाऊन त्याला द्यावं असं मनांत आहे माझ्या—"

" बघूं मला तें चित्र—"

अवधूतनें उतावळेपणानें त्याच्या हातांतली दुसरी फ्रेम घेतली.

त्यानें त्या चित्राकडे न्याहाळून पाहिलें आणि म्हटलें—

" मला नीटसं समजलं नाहीं हें चित्र तुझं, सिराज— "

सिराज हंसला. त्या चित्रावर सौम्य प्रकाश पडेल अशा बेतानें तें त्यानें टेबलावर ठेवलें आणि तो म्हणाला—

" आतां पुन्हा पहा एकदां नीट— "

वसंतांतील सायंसूर्याचा रम्य प्रकाश त्या चित्रावर पडला होता. त्या प्रकाशांत तें काळ्या पांढऱ्या रंगांत काढलेलें चित्र उठावदार दिसत होतें.

" या पर्वताच्या शिखरावर उभा असलेला हा पुरुष आणि त्याच्या पायथ्याशीं उभे असलेले हे नाना प्रकारचे लोक–काय अर्थ आहे या चित्राचा ? हें महादेवाचं चित्र आहे का ?—"

" हो. या पर्वताच्या पांढऱ्याशुभ्र श्रेणी म्हणजे रांगा आहेत हिमालयाच्या. त्याच्या सर्वांत उंच शिखरावर हा जो पुरुष उभा असल्यासारखा दिसतो, तो महादेव. याच्या मस्तकावर गंगा, कपाळावर अर्धचंद्र, हातांत त्रिशूळ आणि गळ्यांत नाग असून, उजव्या हातानें तो अभयदान देत आहे सगळ्या मानव जातीला. भारताच्या राष्ट्रीयतेचं प्रतीक म्हणून मीं हें चित्र काढलंय, अवधूत. भारतांत ज्या अनेक उच्च-नीच संस्कृति संमीलित झाल्या आहेत, त्यांच्या निदर्शक आहेत या पर्वताच्या उंचसखल रांगा. त्यांतल्या सर्वांत उंच शिखरालाच मी महादेवाचं रूप दिलंय. तूं नीट पहा. तो शिखरावर उभा नाहीं. त्याचा फक्त अर्धा देह त्या शिखरावर दिसतो आहे. त्याच्या मस्तकावरून खालीं पडून या सर्व रांगांना पावन करीत

वहाणारी गंगा हें हिंदु संस्कृतीचं प्रतीक; आपल्या रम्य तेजानं त्या रांगांना उजळणारा त्याच्या ललाटावरला अर्धचंद्र हें मुस्लिम संस्कृतीचं प्रतीक; त्याच्या हातांतला त्रिशूळ हें इसाई संस्कृतीचं प्रतीक; न् त्याच्या गळ्यांतला नाग हें या भारताचं आद्य संतान जे वन्य आणि अस्पृश्य लोक त्यांच्या संस्कृतीचं प्रतीक आहे. कुऱ्हाड, फरस, पाश, भाला, तीरकमठा वगैरे हत्यारे घेतलेले जे हे लोक या पर्वताच्या पायथ्याशीं उभे राहून त्याला अभिवादन करित आहेत, ते सगळे नाग, संताळ, भिल्ल, ठाकूर, महार, गोंड, बैगा, राऊत, पंचम वगैरे वन्य आणि दलित समाजांचे प्रतिनिधि आहेत. आपला उजवा हात वर करून महादेवानं त्या सगळ्या समाजांना अभयदान दिलं आहे—"

"अत्यंत उदात्त आहे ही कल्पना तुझी, सिराज. अभीला खात्रीनं आवडेल त्याच्या आवडत्या महादेवाचं हें प्रतीक. तुझं त्रिमूर्ति हें चित्र जसं त्रिराष्ट्रवादाचं, तसा हा महादेव हें राष्ट्रवादाचं भव्य प्रतीक ठरेल. आपल्या या हिंदुस्थानांत जे अनेक धर्म, अनेक संस्कृति आणि अनेक जाति एकत्र आल्या आहेत, त्यांच्यांत सध्या चालू असलेल्या नाना प्रकारच्या संघर्षांतून सर्व मानव जातीला आदर्श असा नवा समाज, असं नवं मानव्य, अशी नवी विश्वसंस्कृति निर्माण होणार आहे. या पुरातन भरतखंडांत जगांतले सर्व धर्म एकवटलेले आहेत, जगांतल्या सर्व धर्मांचीं तीर्थक्षेत्रं आहेत. इस्राएल आणि पारशी यांच्यासारख्या देशोधडीला लागलेल्या समाजांना आश्रय देऊन या भरतभूमीनं आपल्या औदार्यानं सर्व जगाला धडा घालून दिला; व जेते म्हणून आलेल्या ग्रीकांना, हूणांना, शकांना, अरबांना आणि मोंगलांना आत्मसात् करून त्यांच्या संमीलनानं विश्वसंस्कृतीच्या सिद्धतेची पूर्वतयारी केली. भरतखंडांत स्थायिक झालेले हे सर्व धर्म, या सर्व संस्कृति आणि या सर्व जाति आज जरी एकमेकांशीं यादवी करायला प्रवृत्त झाल्यासारख्या दिसत असल्या, तरी एकमेकांशीं सहकार्य केल्याशिवाय, एकमेकांशीं समरस होऊन समान राष्ट्रीयता आणि समान संस्कृति उत्पन्न केल्याशिवाय त्यांना गत्यंतर नाहीं. हे अनेक धर्म, संस्कृति आणि जाति यांच्या संमीलनांतून ही जी समान राष्ट्रीयता आणि समान संस्कृति निर्माण होईल, तिच्यांतूनच नवें मानव्य, नवी विश्वसंस्कृति आविर्भूत होईल अशी ग्वाही देतंय माझं मन मला. त्या ग्वाहीचं, त्या उज्ज्वल स्वप्नाचं प्रतीक आहे तुझा हा महादेव, हा चंद्रशेखर—"

"होय, अवधूत ! तुझं हें बोलणं म्हणजे उदात्त भाष्य आहे खरोखरी माझ्या

या प्रतीक–चित्रावरलं. पण तुझ्या सारख्या कम्युनिस्टानं असं बोलावं याचं नवल वाटतं मला—"

" तूं कम्युनिस्ट कां म्हणतोस मला, सिराज ?— "

अवधूतनें एकदम त्याच्याकडे वळून विचारलें.

" सगळं नागपूर म्हणतं तुला कम्युनिस्ट; दादासाहेबसुद्धां समजतात तुला कम्युनिस्ट— "

" नागपूर काय वाटेल तें म्हणत असेल, न् दादा काय वाटेल तें समजत असतील. पण तूं मला कम्युनिस्ट म्हणावंस याचं मात्र आश्चर्य वाटतं, सिराज. समाजवादाचीं तत्वं मला बव्हंशीं मान्य आहेत हें खरं; व समाजवाद्यांच्या चळवळींत मी भाग घेतों हेंहि खरं. पण म्हणून कांहीं मी कम्युनिस्ट ठरत नाहीं. कम्युनिस्ट होणं म्हणजे स्वतःच्या देशाच्या दास्यमोचनासाठीं बाहेरल्या एका पक्षाच्या तोंडाकडे पहाणं आहे. मला ती कल्पनाच मुळीं उपमर्दकारक वाटते. माझ्या देशाचं राजकीय धोरण आणि भवितव्य हें दुसऱ्या देशानं किंवा त्या देशांतल्या पक्षानं ठरवावं हें मला स्वप्नांतसुद्धां सहन होणार नाहीं. रशियाच्या विश्वक्रांतीच्या कार्यक्रमाचा जो काय फायदा आपल्याला त्याच्या आहारीं न जातां घेतां येईल, तो घ्यायला हरकत नाहीं. पण आपलं राजकारण आणि राष्ट्रीय चळवळ ही रशियांतून येणाऱ्या किंवा कम्युनिस्ट पक्षाकडून सुटणाऱ्या फर्मानांनुसार चालवणं हें आपल्या स्वाभिमानाला कमीपणा आणणारं आणि अत्यंत धोक्याचंहि आहे. असल्या पर-प्रत्ययनेय धोरणामुळं उद्यां एखाद्या आणीबाणीच्या प्रसंगीं स्वदेशाच्या हितापेक्षां भलत्याच गोष्टींना महत्त्व दिलं जायचं न् त्यामुळें देशाचा घात व्हायचा— "

" तुझा हा कम्युनिस्टांवरला आक्षेप योग्य आहे अगदीं. पण, माझ्या बुद्धीला जो समाजवाद पटत नाहीं, तो या कारणामुळं कीं, ज्या देशांत राष्ट्रीयतेचीच भावना अद्याप पुरती मूळ धरीत नाहीं, ज्या देशाला राष्ट्रीय स्वातंत्र्यच अद्याप मुळीं मिळालेलं नाहीं, त्या देशांत समाजवादाचा पुरस्कार हा अकालिक ठरत नाहीं का ?—"

" हें तुझं म्हणणं बरोबर नाहीं, सिराज. समाजवादाचा एक उपयोग अगदीं निर्विवाद आहे. धार्मिक आणि जातीय उच्चनीचतेनं आणि यादवीनं ग्रासलेल्या या देशांत व्यक्तिमात्राला समान संधि आणि समान हक्क देणारा समाजवाद हाच सर्व जनतेला राष्ट्रीयतेच्या एका समान भूमिकेवर आणूं शकेल; धर्म आणि जाति

यांना आज असलेलं अवास्तव महत्त्व नष्ट करून समान संस्कृति निर्माण करूं शकेल. हिंदी राष्ट्राच्या निर्मितीला, भारतीय संस्कृतीच्या घटनेला समाजवादाची जर सगळ्यांत कोणती मदत होणार असेल, तर ती ही होय; व ही त्याची उपयुक्तता लक्षांत घेऊनच मी त्याचा पुरस्कार करतों—"

"अभीला मान्य आहेत हे तुझे विचार ?—"

"नाहीं. सध्यां त्याच्या डोळ्यावर जातवार चळवळीचा जोष आहे. पण जातवार चळवळीच्या उपयुक्ततेला एक मर्यादा आहे. ती मर्यादा गांठल्यावर अस्पृश्य समाजाला आपोआप राष्ट्रीयतेची गरज वाटूं लागेल. तोंपर्यंत थांबायला मी तयार आहें—"

त्यानें हंसून म्हटलें आणि तो पुन्हा त्या महादेवाच्या चित्राकडे पहात उद्गारला—

"तुझं हें महादेवावरलं प्रतीक खात्रीनं आवडेल अभीला—"

"मी विलायतेला गेल्यावर यावरून एक मोठं चित्र तयार करून तें भारतीय संस्कृतीचं प्रतीक म्हणून नॅशनल गॅलरींत ठेवायचा प्रयत्न करणार आहे. तो त्रिमूर्ति आणि हा महादेव हीं दोन्हीं चित्रं शेजारीं शेजारीं ठेवून हिंदुस्थानांतील त्रिराष्ट्रवाद आणि राष्ट्रवाद या दोहोंचींहि प्रतीकं उभीं करणार आहे मी जगापुढं—"

"केव्हां जाणार आहेस तूं ?—"

"खरोखरी तेंच सांगायला आलों होतों मी तुला, अवधूत. पण, दादासाहेबांचं तें बोलणं ऐकल्यावर मला ती बातमी सांगण्याचा हिय्या झाला नाहीं तुला—"

"त्यांत एवढं संकोच वाटण्यासारखं काय होतं, सिराज ?—"

"तूं विलायतेला जाऊं शकत नाहींस न् मी जायला निघणार हें चमत्कारिक वाटलं मला अगदीं. आपण बरोबर जाणार होतों दोघं नाहीं का अवधूत ?—"

"हो. पण तें आपलं विद्यार्थिदशेंतलं स्वप्न उध्वस्त झाल्याबद्दल यत्किंचितहि वाईट वाटत नाहीं मला, सिराज. तूं उगाच लावून घेऊं नकोस मनाला आपल्या. उलट, मला वाटतं, मला जर विलायतेला जायची संधि मिळाली असती, तर मी आमच्या काकासाहेबांच्याच वळणावर गेलों असतों. विलायतेहून जाऊन येणाऱ्या लोकांची एक निराळीच जात बनते. त्या जातीचा संबंध समाजाशीं रहात नाहीं न् त्यांचा कांहीं उपयोगहि समाजाला होत नाहीं—"

"आणि मी कशावरून होणार नाहीं तसा ?—"

" नाहीं. तुझीं हीं चित्रंच सांगतात तुझं हृदय, तुझी प्रतिभा, तुझी वृत्ति भारतीय आहे म्हणून. तुझ्या रोमरोमांत भारतीय संस्कृतीचं सत्त्व आणि सौहार्द भरलेलं आहे. तूं मुळींच वाईट वाटून घेऊं नकोस माझ्यासाठीं. मग केव्हां निघणार आहेस तूं ?— "

" बहुधा पुढल्याच आठवड्यांतच निघेन मी— "

" काय इतक्या लवकर ?— "

" लवकर कशानं आलंय, अवधूत ? गेले पांच सहा महिने खटपट चालली होती माझी. बी. ए. चा निकाल लागल्यावर मी तुमच्याप्रमाणं एम्. ए. कडे वळलों नाहीं. गेले सात आठ महिने मी हट्टानं घरीं बसलोंय; न् आग्रह धरला वडलांपाशीं कीं आतां इथली कोणतीहि परीक्षा न देतां युरोपांत जाऊन चित्रकलेचा अभ्यास करणार म्हणून. ' पांडवांचं स्वर्गारोहण ' या माझ्या चित्राचा विलायतेंत गौरव झाल्यामुळंच खरोखरी माझे वडील तयार झाले मला विलायतेला पाठवायला— "

अवधूत कांहीं बोलला नाहीं. तो आपल्याच विचारांत मग्न होता.

त्याच्या मनाची ती व्यग्रता सिराजच्या लगेच लक्षांत आली आणि तो त्याचा हात धरून म्हणाला—

" तूं कसला विचार करतो आहेस, अवधूत ?— "

" माझ्या मनांत असा विचार आला कीं, तूं जी ही वेळ विलायतेला जायला काढली आहेस, ती कांहीं चांगली नाहीं सिराज— "

" कां बरं ?— "

" मला असं वाटतं कीं, युरोपांत लवकरच युद्ध सुरू होईल आणि मग तुला परत येणं शक्य होणार नाहीं— "

" तूं इतकं खात्रीनं कशावरून बोलतोस ? तुला कुणा ज्योतिष्यानं भविष्य सांगितलंय् का ?— "

सिराजनें हंसत हंसत विचारलें. पण अवधूतचा चेहरा अगदीं गंभीर होता. तो म्हणाला—

" छे ! ज्योतिषी कशाला हवा ? रोजच्या आंतरराष्ट्रीय घडामोडी काळजीपूर्वक वाचणाराला हें भविष्य उघड दिसण्यासारखं आहे अगदीं. पण तूं हातांतला कुंचला खालीं ठेवून वर्तमानपत्र कधीं हातांत धरशील तर ना— "

" मग मी जाऊं नये, असं म्हणतोस तूं ?— "

" तसं म्हणणं नाहीं माझं. उलट तूं युरोपांत असतांना युद्ध जर खरोखरीच सुरू झालं, तर एवढी प्रचंड उलथापालथ तुला प्रत्यक्ष पहाण्याची संधि मिळाल्याबद्दल मात्र खरोखरीच हेवा वाटेल तुझा मला! पण असा संभव आहे ही गोष्ट लक्षांत घेऊन मनाच्या तशा तयारीनं जा तूं एवढंच मला सांगायचंय— "

सिराज क्षणमात्र स्तब्ध होता. नंतर त्यानें म्हटलें—

" पण युद्ध जर सुरू झालं, तर हिंदुस्थानांत तरी शांतता राहील हें कशावरून ?— "

" खरं आहे तुझं म्हणणं. गेल्या महायुद्धाच्या वेळीं जसं हिंदुस्थान शांत होतं, तसं तें या वेळीं राहण्याचा संभव नाहीं. विशेषतः, कॉंग्रेसनं साम्राज्यशाही युद्धांत भाग न घेण्याची घोषणा केलेली असल्यामुळं प्रत्यक्ष युद्धाला प्रारंभ झाल्यावर काय संघर्ष उत्पन्न होतील, हें सांगणं कठीण आहे— "

त्यानंतर ते दोघे कांहीं क्षण अगदीं स्तब्ध होते. खोलींतील सायंप्रकाश हळूहळू कमी होत होता. दोघांचींहि मनें कसल्या तरी गंभीर संवेदनेनें भरून गेलीं होतीं, भारल्यासारखीं झालीं होतीं. एकमेकांशीं कांहीं बोलावें असें त्यांना वाटेना आणि काय बोलावें हेंहि सुचेना. जणुं कांहीं आगामी भीषण घटनांची छाया आपल्या भावी जीवनमार्गावर पडलेली त्यांना स्पष्ट दिसत होती.

शेवटीं काळोख पडत चाललेला पाहून सिराज त्याला म्हणाला—

" आपण अभीकडे जाऊं या आतां. नाहीं तर वेळ होईल फार— "

" ठीक आहे. पण मला वाटतं, तोच कदाचित् येईल आतां इतक्यांत— "

अवधूतनें बोलतां बोलतां दिवा लावला. त्याबरोबर टेबलावर शेजारीं शेजारीं ठेवलेल्या त्या दोन्ही चित्रांवर विद्युत्प्रकाश पडून तीं अधिक खुलून दिसूं लागलीं.

ते दोघे त्या चित्रांकडे पहात उभे राहिले.

पहातां पाहतां अवधूतनें एकदम सिराजच्या खांद्यावर हात ठेवून म्हटलें—

"सिराज, तूं नुसता चित्रकार नाहींस, नुसता कलावंत नाहींस. तूं द्रष्टा आहेस—"

" नाहीं अवधूत, मी द्रष्टा नाहीं. तुझ्या ध्येयदृष्टीला या चित्रांत जें दर्शन घडलं, तें मला घडलं नव्हतं, तसली कांहीं कल्पना माझ्या मनांतहि आली नव्हती. मीं फक्त वस्तुस्थितीचं चित्रण करण्याचा प्रयत्न केलाय एवढंच. तूं आणि अभि नेहमीं म्हणत असतां महादेव हें मूळचं अनार्य दैवत आहे म्हणून. त्यावरून कल्पना

सुचली मला या चित्राची. पण, हें चित्र बघितल्यावर भारतांतील भिन्न संस्कृतीं-मधला सध्यांचा संघर्ष थांबून त्या सर्व संस्कृतींच्या संमीलनानं विश्वसंस्कृति निर्माण होण्याची जी कल्पना तुझ्या मनांत आली, ती कांहीं मला सुचली नव्हती— "

" मला श्रेय देऊं नकोस तूं या कल्पनेचं. अभि नेहमीं म्हणत असतो, हिंदु-स्थानाचा प्रश्न नुसत्या राजकीय स्वातंत्र्यानं किंवा नुसत्या समाजवादानं सुटणार नाहीं. तें खरं आहे अगदीं. तूं या चित्रांत हिंदु संस्कृतीची गंगा पर्वताच्या सर्व उंच-सखल रांगांवरून वहात गेलेली दाखवली आहेस. पण, हिंदु संस्कृति ही खरोखरीच इतकी उदार असती, तर आज आम्ही या दुर्गतीला येऊन पोचलों नसतों. स्वतःच्या पाडसालासुद्धां पान्हा चोरणाऱ्या नाठाळ गाईसारखी आहे हिंदु संस्कृतीची वृत्ति. ती वृत्ति आमूलाग्र बदलल्याशिवाय स्वातंत्र्य मिळालं, तरी तें टिकणार नाहीं. म्हणूनच नुसती राजकीय किंवा आर्थिक क्रांति होऊन भागणार नाहीं. सर्वांगीण राष्ट्रीय क्रांति हाच एक मार्ग आहे हिंदुस्थानाचा प्रश्न सुटायला. राजकीय स्वातंत्र्य आणि समाजवाद हीं या क्रांतीला पोषक होतील, यांत शंका नाहीं. पण, सर्वांगीण राष्ट्रीय क्रांति झाल्याशिवाय या भरतखंडांत नवें मानव्य आणि नवी विश्वसंस्कृति उत्पन्न होणार नाहीं—"

अवधूत अगदीं तन्मयतेनें बोलत होता.

तोंच मागाहून अलगद येऊन अभिमन्यूनें त्यांच्या खांद्यावर हात ठेवले आणि त्यांना विचारलें—

" तुम्ही काय पहातां आहांत दोघे एवढं ?— "

त्याबरोबर ते दोघे एकदम मागें वळले आणि अवधूतनें त्याला विचारलें—

" केव्हां आलास तूं, अभि ?—"

" आतांच. पण तुम्हीं हीं चित्रं पहाण्यांत इतके गर्क होतात कीं, मी आंत आल्याचं तुम्हांला कांहीं कळलं नाहीं. हें चित्र त्रिमूर्तीचं आहे. पण, हें दुसरं कशाचं आहे, सिराज ? आणि तुझ्या चित्रांचं काय प्रदर्शन भरवलंय का अवधूतनं हीं चित्रं अशा रीतीनं टेबलावर ठेवायला ?— "

" हो. आणि हें प्रदर्शन तुम्हां दोघांना अर्पण करणार आहे मी, अभि— "

सिराज हंसून म्हणाला आणि त्यानें तें महादेवाचें चित्र अभिमन्यूला समजावून सांगितलें.

आणि अखेर तो अगदीं गंभीरपणानें म्हणाला—

" अभि, आपण तिघं सहा सात वर्षं एकत्र शिकलों. आतां इथून आपल्या आयुष्याला वेगळया वाटा फुटणार. मी विलायतेला जातोंय पुढल्या आठवड्यांत. माझी ही शेवटली भेट आहे तुम्हां दोघांना— "

ते तिघेहि त्या चित्रांपुढें कांहीं क्षण स्तब्ध उभे होते.

नंतर अभिमन्यु सिराजला म्हणाला—

" तूं आम्हांला जी ही भेट दिली आहेस, तिच्यांत तूं आपल्या प्रतिभेचं सर्वस्व ओतलं आहेस, सिराज. पण, आम्ही काय देऊं शकतों तुला ? आमच्याजवळ कांहींसुद्धां नाहीं तुला देण्यासारखं— "

" तुम्ही मला एक गोष्ट देऊं शकतां दोघेहि, अभि— "

" कोणती रे ?— "

" अवधूतनं मघाशीं द्रष्टा म्हटलं मला हीं चित्रं काढल्याबद्दल. या चित्रांतून जर खरोखरीच कांहीं ध्येयदर्शन होत असेल, तर त्या ध्येयांच्या सिद्धतेसाठीं तुम्ही झटावं एवढीच फक्त अपेक्षा आहे माझी— "

# अग्निज्वालेचा स्पर्श १३

अवधूतचा चंदनवाडीशीं असलेला संबंध ज्या दिवशीं चंदनला कळला, त्या दिवसापासून तिच्या मनांत एका निराळ्याच भीतीनें ठाणें दिलें.

आजपर्यंत तिच्या त्या चिमुकल्या जीवनांत फक्त एकच शल्य होतें. तें म्हणजे ख्रिश्चियाना मावशीविषयीं तिच्या आईला वाटणारी वाढती असूया. पण, येसूला ख्रिश्चियानाविषयीं जो कृतज्ञतामिश्र आदर होता, त्यामुळें रखमाच्या मनांत वारंवार उफाळणारी ती असूया चंदनच्या जीवनावर फारसा विदारक परिणाम करूं शकली नाहीं.

पण अवधूतची गोष्ट अगदीं निराळी होती.

चंदनवाडीविषयींची चंदनची आठवण एरवी कदाचित् आजपर्यंत पार बुजूनहि गेली असती. पण, येसूच्या बोलण्यांत आपली चंदनवाडी आणि ती आपल्या घराण्यापासून बळकावून घेणारे देशपांडे यांचा उल्लेख आला नाहीं, असा बहुधा एक दिवसहि गेल्या दहा बारा वर्षांत गेला नव्हता. त्यामुळें एकादी जखम वारंवार टोचा मार मारून जशी वहाती ठेवावी, तशी चंदनवाडीची आठवण येसूच्या त्या बोलण्यामुळें चंदनच्या हृदयांत धगधगत ठेवली होती. किंबहुना, सरदार मोहित्यांशीं तिचें लग्न लावून देण्याच्या रखमाच्या बेताला संमति देण्याचा जो मोह येसूला कांहीं काळ पडला होता, तो सुद्धां या आशेनें कीं, तें लग्न झाल्यास देशपांड्यांच्या आजच्या पडत्या काळांत चंदनवाडी परत मिळवणें आपल्याला अगदीं सोपें जाईल. आणि तसें तिनें एकदां सुनेला स्पष्ट बोलूनहि दाखविलें होतें.

देशपांड्यांविषयींची वैरबुद्धि हा येसूच्या जीवनाचा जणुं एक भाग, एक घटक होऊन बसला होता. रखमा त्या विषयावर सहसा कधीं बोलत नसे. पण चंदनला माहीत होतें कीं, आपली आई ज्या विषयावर कधीं बोलत नाहीं, त्या विषयाबद्दलचा

तिच्या मनांतला दंश अत्यंत जालीम असतो. त्यामुळें आजीच्या बडबडीपेक्षां तिला आईच्या मौनाची दहशत जास्त वाटे. देशपांड्यांचें नांव सुद्धां आपल्यासमोर काढलेलें रखमाला खपत नसे. अवधूतनें पुलगांवच्या संपांत भाषण केल्याची बातमी जेव्हां येसूनें तिला मोठ्या उत्साहानें सांगितली, तेव्हां तिनें अगदीं संथपणानें एवढाच उद्गार काढला, " सापाच्या पिलाचा भरंवसा धरतां कामा नये कधीं. संपामध्यें त्यानं अशा रीतीनें भाग घेण्यांत सुद्धां कांहीं डाव असेल त्या बापलेकांचा–"

आपली आई ज्याला सापाचें पिलूं समजते, त्याच्याशीं आपला इतका स्नेहसंबंध असल्याचें जर तिला कळलें, तर तिच्या मनाला काय वाटेल? आणि आपल्या आजीच्या तरी मनांत काय येईल?

विशेषतः, ज्या दिवशीं संध्याकाळीं चंदन अवधूतबरोबर सिनेमाला गेली होती, त्या दिवशीं रात्रीं ती परत आल्यावर रखमानें जेव्हां तिला छेडलें, तेव्हां ती फारच गांगरून गेली. तिच्याबरोबर चंदन केव्हां केव्हां सिनेमाला जात असे, पण तिनें इंग्रजी बोलपट मात्र अजिबात पाहिला नव्हता. म्हणून अवधूतनें एक दिवस एलिझाबेथ ब्राउनिंगच्या प्रणयजीवनावरील 'बॅरेट्स ऑफ द विंपल स्ट्रीट' हा बोलपट पहाण्यासाठीं तिला आपल्याबरोबर येण्याचा फार आग्रह केला. तेव्हां, तो बोलपट बघण्यासाठीं ती पांचच्या सुमारास अभिमन्यु आणि हिरा यांच्याबरोबर बर्डीवर जावयाला निघाली असतां गिरणींतून घरीं परत येत असलेल्या रखमाच्या तीं तिघें वाटेंतच दृष्टीस पडलीं. त्या वेळीं रखमा कांहीं बोलली नाहीं. पण रात्रीं दहाच्या सुमारास चंदन घरीं परत आल्यावर रखमानें तिला विचारलें—

" आज किती जण गेलां होतांत तुम्ही सिनेमाला?— "

" फक्त तिघं जणं. हिरा, अभि न् मी— "

" तुम्हांला तिघांना तर मीं रस्त्यांतच पाह्यलंग. तिथं सिनेमाला गेल्यावर नाहीं कुणी भेटले अभिमन्यूच्या कॉलेजांतले दोस्त?— "

" हो. त्याला पुष्कळ भेटले त्याचे मित्र. पण आमच्याशीं कशाला बोलतील ते?— "

त्यावर रखमा क्षणमात्र स्तब्ध होती. नंतर आवंढा गिळून ती म्हणाली—

" यापुढं मला विचारल्याशिवाय इतक्या लांब जाऊं नकोस पुन्हा सिनेमाला—"

त्याबरोबर येसू मध्येंच रागानें म्हणाली—

" काय झालं एक दिवस पोर सिनेमाला गेली तर?— "

" सिनेमाला जायला मीं हरकत घेतली आहे का कधीं ? पण आपलं माणूस बरोबर असल्याशिवाय इतक्या लांब जायचं नाहीं येवढंच म्हणणं आहे माझं— "

" हिरा न् अभिमन्यु हीं काय परकीं आहेत का सूनबाई ?—"

" तें नाहीं मला समजत. तुम्ही किंवा मी बरोबर असल्याशिवाय हिनं संध्या-काळच्या वेळीं जातां कामा नये इतक्या लांब पुन्हा कधीं— "

रखमानें अगदीं तुटक, करड्या आवाजांत ते शब्द उच्चारले आणि पुन्हा ती त्या विषयावर बोलली नाहीं.

पण त्यानंतर अवधूतनें जेव्हां जेव्हां सिनेमाला जाण्याची गोष्ट काढली, तेव्हां तेव्हां चंदननें कांहीं ना कांहीं तरी सबब सांगून त्याला नकार दिला.

तथापि, तिला वारंवार वाटे कीं, त्याचा आणि आपला हा वाढता संबंध आपण किती दिवस आपल्या आईपासून आणि आजीपासून लपवून ठेवूं शकूं ? आपण त्याला कांहींहि कल्पना दिलेली नाहीं, कोणत्याच प्रकारे सावध केलेलें नाहीं. तो जर एकाद दिवशीं आपल्याला भेटायला आपल्या घरीं आला, तर केवढा अनर्थ होईल ?

मॅट्रिकच्या परीक्षेचा निकाल ज्या दिवशीं लागला, त्या दिवशीं प्रान्तांतील सर्व विद्यार्थिनींत ती पहिली आल्याचें समजल्यामुळें तो तिचें अभिनंदन करण्या-साठीं मुद्दाम तिच्या घरीं जायला निघाला. पण नागनदीच्या पुलापाशींच चंदन त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां तो सायकलवरून खालीं उतरून तिला म्हणाला—

" चंदन, मी तुझ्याचकडे चाललों होतों— "

त्याबरोबर ती दचकली आणि एकदम उद्गारली—

" माझ्याकडे ? कशाला ?— "

तो उद्‌गार तिच्या तोंडून बाहेर पडत असतां तिच्या मुद्रेवर आलेली विवर्णता, श्वासांत उत्पन्न झालेला वेग आणि डोळ्यांत डोकावलेली भीति जर त्याच्या लक्षांत आली असती, तर त्याला धक्काच बसला असता. पण, ती वाटेंत अचानक भेटल्याचा जो आनंद त्याच्या मनाला झाला, त्या आनंदाच्या भरांत तिची ती अवस्था आणि त्या उद्‌गारांचा तुटकपणा त्याच्या ध्यानांत आला नाहीं. इतकेंच नव्हे, तर तिनें त्याला तिथून दोन तीन मिनिटांच्या अंतरावर असलेल्या स्वतःच्या घरीं येण्या-विषयीं एका अवाक्षरानेंहि न विचारतां आपल्याबरोबर अभिमन्यूकडे येण्याची

विनंती केली, याचेंहि त्याला नवल वाटलें नाहीं. तो मुकाट्यानें तिच्याशीं बोलत चालावयाला लागला.

" मग आतां कॉलेजांत येणार ना तूं आमच्या ?— "

" तें आजच कसं सांगूं मी !— "

" नाहीं तरी आतां कांहीं शिक्षणाच्या खर्चाचा प्रश्न नाहीं. मग काय हरकत आहे ?— "

" खर्चाची अडचण नव्हतीच मुळीं. मी जरी तिसऱ्या वर्गात आलें असतें, तरी-सुद्धां मावशीनं कांहीं तरी सोय केलीच असती माझ्या पुढल्या शिक्षणाची— "

" मग अडचण कसली आहे ?— "

" माझ्या आईची इच्छा नाहीं मीं आतां पुढं शिकावं अशी— "

" मग काय लग्न करून देण्याच्या विचारांत आहे ती यंदा तुझं ?— "

" हो. तोच विचार चालू आहे सध्यां— "

" छे, छे, ती गोष्ट मुळींच घडतां कामा नये. तुझं सगळं आयुष्य वायां जाईल त्यामुळं— "

त्यानें एकदम आवेशानें म्हटलें.

त्याबरोबर तिनें डोळे विस्फारून त्याच्याकडे पहात हंसत हंसत विचारलें—

" ज्या मुली लग्न करतात, त्यांचं आयुष्य वायां जातं का अवधूत ?— "

तिचा तो प्रश्न ऐकतांच अवधूत गोंधळला. पण लगेच सांवरून म्हणाला—

" छे ! तसा नाहीं माझ्या म्हणण्याचा अर्थ. इतर मुलींची गोष्ट निराळी आणि तुझी गोष्ट निराळी. तूं प्रान्तांतल्या सर्व मुलींत पहिली आली आहेस. तेव्हां अशा स्थितींत त्यांनीं तुझ्या शिक्षणाच्या आड येणं म्हणजे नुकसान करणं नाहीं का तुझं ?— "

" पण नुकसानीच्या प्रत्येकाच्या कल्पना वेगळ्या असतात— "

" म्हणजे तूं लग्नाला तयार आहेस असं समजायचं का मीं ? तसं असेल, तर तुझ्याविषयींच्या माझ्या अपेक्षा चुकल्या असं म्हणावं लागेल मला— "

त्याच्या आवाजांत पुन्हा आवेश उत्पन्न झाला.

तिच्या मनांत क्षणमात्र असा विचार येऊन गेला कीं, त्याच्या आपल्याविषयींच्या अपेक्षा काय आहेत हें त्याला एकदां विचारून पहावें. तोंच तो म्हणाला—

" तुझ्या आईचा जर तुझ्या शिक्षणाला इतर कोणत्या कारणामुळें विरोध असेल, तर मी घरीं येईन तुझ्या आणि समजावून सांगेन तिला— "

त्याचें तें विधान ऐकतांच ती एकदम थांबली आणि त्याच्या नजरेला नजर देऊन म्हणाली—

" अवधूत, मी एक विनंती करणार आहे तुम्हांला— "

" कोणती ?— "

" तुम्ही केव्हांहि माझ्या घरीं येऊं नका— "

" का बरं ? काय चमत्कारिक विनंती आहे तुझी ही, चंदन ?— "

" चमत्कारिक खरीच. पण मी निरुपायानें करितें आहे— "

" पण मला कारण सांगितलं पाहिजेस तूं चंदन—"

" कारण—"

तेवढा शब्द तिनें उच्चारला आणि ती क्षणमात्र घोटाळली. पण लगेच म्हणाली—

" कारण अगदीं साधं आहे. आम्ही अगदीं गरीब आहोंत न् म्हणून तुम्ही आमच्या घरीं येणं आम्हांला परवडणार नाहीं—"

"हेंच जर कारण असेल तर मी तुझी ही विनंती मान्य करीत नाहीं चंदन—"

त्याबरोबर ती एकदम भयभीत झाली आणि म्हणाली—

" अवधूत, मी पदर पसरतें. माझी एवढी विनंती मान्य करा तुम्ही—"

त्यानें तिच्याकडे आश्चर्यानें पाहिलें. तिचे डोळे भरून येत आहेत असें त्याला वाटलें आणि तो चटदिशीं म्हणाला—

" बरं ठीक. तुझं कारण मात्र मला मुळींच पटत नाहीं—"

त्यानंतर ती कांहीं बोलली नाहीं. आणि तीं दोघें मुकाट्यानें अभिमन्यूकडे गेलीं.

पण, त्याच्या मनांत हा प्रश्न किती तरी वेळ सारखा थैमान घालीत होता कीं, तिनें आपल्याला स्वतःच्या घरीं न येण्याची अशी चमत्कारिक विनंती का करावी ? परंतु तिला मात्र त्यानें त्या बाबतींत पुन्हा विचारलें नाहीं किंवा तिच्या कॉलेजांत जाण्यासंबंधींहि कधीं चौकशी केली नाहीं.

तथापि, त्या दिवशीं रस्त्यांत जें हें त्याच्याशीं तिचें तीन चार मिनिटें बोलणें झालें, त्याचा तिच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. महालक्ष्म्यांच्या दिवशीं

झालेल्या भेटीपासून गेले आठ नऊ महिने जरी त्यांचा संबंध सारखा वाढत गेला होता, तरी हिरा आणि अभिमन्यु यांच्याशीं ज्या प्रेमानें तो वागतो, त्यापेक्षां आपल्याविषयीं त्याच्या मनांत कांहीं निराळी भावना असेल, असें मानावयाला तिला आजवर कांहीं आधार मिळाला नव्हता. पण त्या दिवशीं तिच्या कॉलेजांत जाण्या-संबंधीं त्यानें दाखविलेली कळकळ आणि त्याहिपेक्षां तिच्या लग्नाच्या कल्पनेला त्यानें केलेला विरोध—त्या कळकळीच्या आणि विरोधाच्या मुळाशीं कोणत्या भावना असतील, याचा विचार करण्याचा हिय्या तिला होईना.

कारण, त्या विचारांत सुख आणि दुःख यांची विचित्र सरमिसळ झालेली होती.

त्याला आपल्याविषयीं कांहीं एक विशेष प्रकारचें प्रेम वाटतें हा विचार तिला जितका सुखकर वाटे, तितकाच तें प्रेम कदाचित् अनर्थाला कारण होईल हा विचार दुःखदायक वाटे. उंटखान्यांतल्या तिच्या त्या नीरस एकेरी जीवनांत आजपर्यंत यौवनाची मधुर, मदिर जाणीव उत्पन्न करणारी कोणतीहि गोष्ट घडली नव्हती. महालक्ष्म्यांच्या दिवशीं आणि त्यानंतर मॅट्रिकच्या निकालाच्या दिवशीं अवधूतच्या बोलण्यांत तिच्याविषयींची जी एक नाजूक भावना व्यक्त झाली, त्या भावनेनें तिच्या रोमांचित शरीराला प्रथमच सांगितलें कीं, तुझ्या जीवनांतला यौवनाचा बहर सुरू झाला आहे आणि तिच्या हृदयांतल्या सगळ्या मूक भावनांच्या तारा उन्मत्तपणानें छेडल्या.

पण त्या जाणिवेंत नुसता यौवनाचा उन्माद, नुसती प्रणयाची नशा नव्हती; तर ती जाणीव अग्नीच्या ज्वालेप्रमाणें आपल्या हृदयांत कसली तरी निराळीच दीप्ति प्रज्वलित करीत आहे, आपल्या जीवनमार्गावर कांहीं तरी निराळाच प्रकाश पाडीत आहे, असा भास तिच्या मनाला होई.

यौवन आणि प्रणय यांची जाणीव ही काय अग्नीची ज्वाला आहे? होय. ती अग्नीची ज्वाला आहे, असाच अनुभव तिला अवधूतच्या सहवासांत असतांना येत असे. अवधूतच्या व्यक्तित्वांत इतकी कांहीं प्रखरता होती कीं, सूर्यानें आलिंगन द्यावयाला उत्सुकतेनें हात पुढें करितांच कुंति जशी दिपून करपून जाऊं लागली, तशी तिची अवस्था त्याच्या सान्निध्यांत असतांना पुष्कळदां होत असे.

आधुनिक सुशिक्षित जगाशीं कॉलेजांत गेल्यावर तिचा प्रथमच संबंध आला. त्यापूर्वी अवधूत आणि अभिमन्यु या दोघांशिवाय तिनें सुशिक्षित तरुण मुलीं पाहिलेच नव्हते. उंटखान्यांतल्या त्या हलक्या वस्तींत त्यांतल्या त्यांत सुधारलेले

असे जे कॅथॉलिक ख्रिस्ती रहात असत, त्यांच्या सुधारणेच्या किंवा सुशिक्षणाच्या मुख्य खुणा म्हणजे रविवारीं सकाळी देवळांत जातांना केलेला झकपक साहेबी पोषाख, तोंडांत वेळीं अवेळीं आढळणारा पाईप, घरांतून निघणारे इंग्रजी गाण्याचे कांपरे सूर आणि दर शनिवारीं रात्रीं दारूपायीं होणारी धूम. हे सुधारलेले कॅथॉलिक मोडक्या तोडक्या इंग्रजींत किंवा रांगडया हिंदींत बोलावयाचे. मराठी शब्द त्यांच्या तोंडून सहसा निघत नसे. त्यांच्या तरण्या ताठ्या पोरींना भेटण्यासाठीं म्हणून जे हंपयार्डवरले निमगोरे किंवा सांवळे ख्रिस्ती तरुण शनिवारीं आणि रविवारीं येत, त्यांच्या अंगांत तर साहेबी मस्ती इतकी ओतप्रोत भरलेली असे कीं, वस्तींतल्या गरीब गुरीब ख्रिस्ती किंवा ख्रिस्तीतर लोकांना ते कुत्र्याच्या मोलानें लेखीत. दारू, चिरूट आणि साहेबी रहाणी या सुशिक्षितपणाच्या मनांत उबग उत्पन्न करणाऱ्या तीनच खुणा काय त्या चंदननें त्या वस्तींत बघितल्या होत्या.

आणि गेलीं तीन चार वर्षें जे हे दोघे सुशिक्षित तरुण ती पहात होती, ते अगदीं वेगळ्या प्रकारचे होते. अवधूतचा पोषाख शुद्ध शुभ्र खादीचा असे. अभिमन्यु जरी खादी वापरीत नसे, तरी नागपूरच्या गिरण्यांतला कपडा वापरण्यावर त्याचा विशेष कटाक्ष होता. कॅलिको मिल्सच्या तलम शर्टिंगची त्याच्याजवळ कोणी तारीफ केली, म्हणजे तो म्हणत असे—

"नागपुरांत पैदा होणारा कपडा हा महार न् कोष्टी या दोन जातींच्या मेहनतीनंच मुख्यतः तयार होतो. इतर गिरण्यांतून निघणारा तलम कपडा वापरण्यापेक्षां त्यांनीं तयार केलेलें कमी दर्जाचं कापड वापरण्यांत माझ्या मनाला एकच समाधान वाटतं. तें म्हणजे मी त्यांच्या जगण्याच्या धडपडींत त्यांना थोडी तरी मदत करतों हें—"

कॉलेजांतील विद्यार्थ्यांत स्वतःला समाजवादी म्हणविणारा जो एक गट होता, तो स्वदेशी आणि विदेशी यांत कांहींच फरक करीत नसे. त्या गटाच्या दृष्टीनें स्वदेशी भांडवलवाले हे परदेशी भांडवलवाल्यांप्रमाणेंच स्वदेशाचे शत्रु असून, त्यांच्या गिरण्यांत तयार होणारें कापड वापरणें हें त्यांच्या खिशांत पैसा ओतण्यासारखेंच होतें. त्या गटाच्या या युक्तिवादाला अभिमन्यु असें उत्तर देत असे कीं—

"हिंदी भांडवलशाही आणि विदेशी भांडवलशाही यांच्यांत फरक करूं नये, हें म्हणणें तत्त्वतः ठीक असेल कदाचित्. पण हिंदी मजूरवर्ग आणि विदेशी मजूरवर्ग यांच्या हितसंबंधांत फरक नाहीं, असें म्हणणें मात्र मूर्खपणाचं आहे. ब्रिटिश मजूर-पक्ष जरी हिंदी राष्ट्रीय चळवळीविषयीं सहानुभूति दाखवीत असला, तरी आणी-

बाणीच्या प्रत्येक प्रसंगीं मात्र त्यानें ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या प्रतिगामी धोरणाचा पाठपुरावाच केला आहे. जगांतल्या सगळ्या कामगार वर्गाचे आर्थिक हितसंबंध एक आहेत ही कल्पनाच मुळीं चुकीची आहे. युरोप आणि अमेरिका हीं सर्व प्रकारच्या यांत्रिक उत्पादनाचीं केंद्रें रहावींत व आशिया आणि आफ्रिका हीं त्यांनीं पैदा केलेल्या मालाचीं गिऱ्हाइकें रहावींत म्हणून स्वतःला साम्यवादी म्हणविणाऱ्या युरोपांतील लबाड अर्थशास्त्रज्ञांनीं हें समान हितसंबंधांचें खूळ काढलें आहे. हितसंबंध समान आहेत हें खरें. पण ते फक्त जगांतल्या गोऱ्या कामगार वर्गाचे !—"

आधुनिक सुशिक्षितांच्या व्यसनांपैकीं कोणतेंच व्यसन त्या दोघांना नव्हतें. अभिमन्यूला मात्र पानतंबाकूची विलक्षण चटक होती. या त्याच्या व्यसनाबद्दल अवधूत मधून मधून त्याला बोलत असे. तेव्हां तो म्हणायचा—

" अरे, मी कांहीं पांढरपेशा रहाणींत वाढलेला मुलगा नाहीं, अवधूत. तंबाकू न् दारू हीं पांचवीला पुजलेलीं आहेत आम्हां लोकांच्या. आमचे सगळे सण न् आनंदाचे प्रसंग तंबाकू न् दारू यांच्याशिवाय साजरे होत नाहींत कधीं. आमच्या वेटाळांत जर तूं थोडासा हिंडलास, तर पांच सहा वर्षांचीं पोरंसुद्धां विडीचीं न् सिगारेटचीं थोटकं ओढतांना दृष्टीस पडतील तुझ्या. अशा वातावरणांत वाढलेला मी मनानं न् शरीरानं इतका निर्मळ, इतका निर्व्यसनी आहे याबद्दल धन्यवाद दिले पाहिजेस तूं खरोखरी मला—"

" पण तुझं हें अडाण्यासारखं दिवसभर पानतंबाकू खाणं मुळींच आवडत नाहीं मला— "

" अरे, पण तूं मला अडाण्यापेक्षां निराळा कां समजतोस ! मी कॉलेजांत जात असलों, तरी माझ्या दृष्टीनं कांहीं पांढरपेशा नाहीं मी. मला स्वतःला काळपेशा न् अडाणी म्हणवून घेण्यांतच आनंद वाटतो. कारण, तुमच्यांत मी कितीहि मिळून मिसळून वागलों, तरी शेवटीं माझं स्थान माझ्या स्वतःच्या समाजांतच आहे, हें विसरूं शकत नाहीं मी. आणि कां रे, तंबाकू खाण्यांत न् पिण्यांत काय फरक करतोस तूं ? कॉलेजांतले बहुतेक सारे पांढरपेशे विद्यार्थी दिवसभर सिगारेट ओढून आपल्या छातीचं न् तोंडाचं धुराडं बनवितात त्याची नाहीं लाज वाटत तुला न् बिचाऱ्या अडाण्यांचं तंबाकू खाणं मात्र कमीपणाचं वाटतं का तुला ?—"

" अरे, पण मी स्वतः तर यांपैकीं कोणतीच गोष्ट करीत नाहीं ना, अभि ! त्या

अधिकारानं बोलतों मी तुला. माझ्या दृष्टीनं चिलीम न् चिरूट ओढणारांत किंवा शिंदी न् बीअर पिणारांत कांहींच फरक नाहीं— "

" पण आमच्या महादेवाच्या उपासनेंत साऱ्या मादक पदार्थांना स्थान आहे हें विसरूं नकोस तूं— "

" पूर्वी असेल कदाचित्. पण आम्ही आर्यांनीं त्याला पावन करून घेतल्यावर शिवस्वरूप प्राप्त झालं त्या भैरवाला— "

अवधूत त्याला हंसत हंसत म्हणावयाचा.

पण, त्या दोघांवरून नवीन पिढीविषयीं जी कल्पना तिनें केली होती, तिला कॉलेजांत गेल्यावर धक्का बसला.

कॉलेजांत तिला जें जग आपल्या भोंवतीं दिसलें, तें पाहून तिच्या मनांत असा संभ्रम उत्पन्न झाला कीं, इथें जीं हीं तरुण मुलें शिक्षणासाठीं म्हणून गोळा झालीं आहेत, तीं खरोखरी हिंदुस्थानांतच जन्मलेली आणि वाढलेलीं आहेत का ? ती स्वतः बाळपणापासून आपल्या भोंवतीं दारिद्र्य आणि दैन्य पहात आली होती. चंदन-वाडीला असतांना काय किंवा नागपूरला आल्यावर काय, हिंदु समाजांतील नाना जातींचें जें लोकजीवन तिनें पाहिलें, त्यांतील दैन्याचा तिच्या चौकस, चिंतनशील मनावर विदारक परिणाम झाला होता. त्यामुळें कॉलेजांतलें तें चैनी चंडोल वातावरण बघून तिच्या मनांत वारंवार येई कीं, आपल्या भोंवतीं पसरलेलें तें अघोर दारिद्र्य आणि दैन्य, मिशनमध्यें येणारे ते पंगु भिकारी आणि तीं निराधार अर्भकें, गिरणींत पिळून निघणारीं तीं देशोधडीला लागलेल्या कास्तकारांचीं कुटुंबें आणि हिंदुत्वाच्या सरहद्दीवर उपेक्षित जिणें कंठणाऱ्या त्या हीन दीन अस्पृश्य जाति–हिंदुस्थानाच्या विराट् दैन्याचीं जीं हीं जिवंत प्रतीकें आपण आजवर पहात आलों, त्यांचा आणि कॉलेजांत शिक्षण घेत असलेल्या या नव्या पिढीचा कांहीं संबंध, कांहीं लागाबांधा, कांहीं जिव्हाळा आहे का ? नाकातोंडांतून धूर काढीत तोंडानें वर्गकलहाच्या वल्गना करीत हिंडणारे विद्यार्थी बघितले म्हणजे तिला वाटे, सुटाबुटांत रहाणारे, फर्डे इंग्रजी बोलणारे, आपल्या अफाट बहुजिनसी समाजाच्या धड कोणत्याच भागाची नीट ओळख नसलेले हे समाजवादी या देशाचा काय उद्धार करणार ? कॉलेजांतलें तें सगळें वातावरण तिला विजातीय वाटे; त्या वातावरणांत तिचा जीव गुदमरल्या-सारखा होई.

विशेषतः ज्या दिवशीं मॅट्रिकचा निकाल लागला, त्या दिवशीं रात्रीं तिच्या

मावशीनें तिला मेरीच्या पुतळ्यापुढें बसवून जें सांगितलें, त्याची आठवण झाली म्हणजे तिला वाटे, इथलें हें शिक्षण घेण्यांत आपण चूक तर करीत नाहीं? जीवनाचा जो लढा आपल्या देशांत आज सर्वत्र चालू आहे, त्या लढ्यांत भाग घ्यावयाला, त्या लढ्याचें स्वरूप आणि शास्त्र समजावयाला या शिक्षणाचा काय उपयोग आहे?

त्या दिवशीं रात्रीं सिस्टर ख्रिश्चियानानें तिला मेरीच्या पुतळ्यासमोर बसविलें आणि म्हटलें—

"या माउलीच्या कृपेनं तुला आजचा दिवस दिसला, चंदन. माझी प्रार्थना आज तिला एवढीच आहे कीं, तुला जें हें उच्च शिक्षण मिळतंय, त्याचा उपयोग आपल्या समाजाच्या उन्नतीसाठीं करण्याची बुद्धि या माउलीनं तुला द्यावी—"

सिस्टरचे डोळे भरून आले होते, कंठ दाटून आला होता.

चंदनच्या डोक्यावरून तिनें हात फिरवला आणि म्हटलें—

"पोरी, या मिशनची दीक्षा घेतल्यापासून गेल्या तीस चाळीस वर्षांत कोणताहि पाश मीं स्वतःला लावून घेतला नाहीं. पण नऊ वर्षांपूर्वी तूं मला भेटलीस आणि प्रभूच्या पायांवर वाहिलेल्या माझ्या जीवनांत हा मायापाश उत्पन्न झाला. तूं ख्रिस्ती झालीस तर आनंद वाटेल मला. पण, तूं ख्रिस्ती व्हावंस असं मात्र म्हणणार नाहीं मी. पण, एक गोष्ट मात्र या माउलीला साक्ष ठेवून सांगणार आहें मी तुला आज. तूं आपलं सगळं आयुष्य आपल्या समाजांतल्या अनाथअपंगांच्या, हीनदीनांच्या सेवेंत घालव. माझ्याप्रमाणं तूं जोग घे असं मी म्हणत नाहीं तुला. तुला वाटलं तर तूं लग्न कर. पण लग्न करतांना तूं फक्त एवढीच काळजी घे कीं, तुझा पति तुझ्या समाजसेवेच्या कार्याच्या आड येणार नाहीं. मीं चाळीस वर्षं काढलीं आहेत या दयाधर्माच्या कार्यात. त्या अनुभवावरून मी तुला सांगतें कीं, आपल्या देशाचं दैन्य हिमालयासारखं आहे; न् त्याचं निवारण करण्यासाठीं अनेक पिढ्यांना आपलं आयुष्य खर्ची घालावं लागेल. परदेशांतल्या मिशनरींनीं या देशांत यावं आणि इथल्या अनाथअपंगांच्या, जंगली जातींच्या न् दलित समाजाच्या सेवेंत सारा जन्म काढावा, पण त्यांच्या जातीचे आणि रक्ताचे जे आपण लोक त्यांनीं मात्र त्यांच्यासाठीं कांहीं करूं नये, ही परिस्थिति अत्यंत लाजिरवाणी, अत्यंत उपमर्दकारक वाटते मला. ही जाणीव तूं सतत आपल्या मनांत जागृत ठेव न् पुढलं शिक्षण घे. मी रोज

प्रार्थनेंत प्रभूला म्हणतें कीं, माझ्या या मुलीचं पाऊल योग्य मार्गावर पडूं सेवेच्या पवित्र कार्यांत पडण्याचा संकल्प हिच्या मनांत उत्पन्न होऊं दे— ”

सिस्टरचे ते उद्गार आठवले म्हणजे तिला वाटे, आपल्या आईचा जळफळाट ओढवून घेऊन आपल्या मावशीनं जें हट्टानें आपल्याला कॉलेजांत घातलें, तें कोणत्या उद्देशानें ? येथें मिळणारे शिक्षण, मनावर आणि बुद्धीवर होणारे संस्कार हे आपल्याला समाजसेवेची स्फूर्ति देतील, अशी जर तिची कल्पना असेल, तर ती चूक नाहीं का ?—

त्यामुळें शारदामंडळाच्या निवडणुकीच्या वेळीं तिला कार्यकारिणीवर घेण्याची उत्सुकता जेव्हां कांहीं विद्यार्थ्यांनीं दाखविली, तेव्हां ती त्यांना म्हणाली—

“ माझा काय उपयोग होणार आहे तुम्हांला ? मीं मराठी फारसं वाचलेलं नाहीं न् मला वाङ्मयाविषयीं फारशी गोडीहि नाहीं. तुम्ही माझ्याऐवजीं हिराला घ्या. तिला वाङ्मयाची आवड आहे न् लिहिण्याचीहि हौस आहे— ”

कारण, कॉलेजांत आल्यापासून हिराचें अस्पृश्यांच्या जीवनावरील ललित लिखाण नियतकालिकांतून प्रसिद्ध होऊं लागलें होतें; व तिच्या लेखनगुणांचा लौकिकहि कॉलेजांत पसरला होता. पण हिरा लेखनचतुर असली, तरी सभोंवतालच्या विस्कळित हिंदु वातावरणांत खुलून वेगळें दिसणारे जें मोहक वैशिष्ट्य चंदनच्या तेजस्वी व्यक्तित्वांत होतें, तें तिच्या लेखनगुणाहून अधिक प्रभावी ठरलें; व त्यामुळें प्रथम वर्षाची प्रतिनिधि म्हणून तिनेंच मंडळावर यावें, असा बहुतेक विद्यार्थ्यांचा आग्रह पडला. इतकेंच नव्हे, तर एका उत्साही विद्यार्थ्यानें तिला असेंहि म्हटलें कीं,—

“ अवधूत हे यंदा मंडळाचे कार्याध्यक्ष होणार असल्यामुळें तुम्ही प्रतिनिधि म्हणून मंडळावर निवडून येणें अवश्य आहे— ”

तेव्हां ती त्याला हंसून म्हणाली—

“ त्यांचा माझ्यापेक्षां हिराशींच खरोखरी जास्त स्नेह आहे. तुम्ही त्यांना विचारून पहा. मला साहित्यांत कांहीं कळत नाहीं असंच सांगतील ते तुम्हांला—”

“ पण तुम्ही आमच्या मंडळांत आलांत, म्हणजे आपोआप गोडी वाटूं लागेल तुम्हांला साहित्याविषयीं— ”

“ कदाचित् वाटेलहि. पण साहित्याविषयीं गोडी वाटूं लागल्यानं आपल्या जीवनावर कांहीं विशेष परिणाम होईल असं वाटतं नाहीं मला— ”

“ का ? साहित्याच्या सामर्थ्यावर विश्वास नाहीं का तुमचा ?-- ”

" साहित्यांत जें सामर्थ्य येतं, तें सामर्थ्य साहित्य निर्माण करणाराच्या व्यक्तित्वाच्या आणि चारित्र्याच्या प्रभावावर अवलंबून असतं नाहीं का? माझा विश्वास साहित्याच्या सामर्थ्यावर नाहीं, चारित्र्याच्या आणि सेवेच्या सामर्थ्यावर आहे—"

आणि तिनें शारदामंडळाच्या कामांत भाग घेण्याचें नाकारलें.

पण, कॉलेजांतलें तें शिक्षण आणि त्या चळवळी पाहून तिच्या मनांत वारंवार येई, त्यागी, सेवारत जीवनाची स्फूर्ति देणारें यांत काय आहे?

आणि मग तिला आपल्या गुलाबताईची आठवण होत असे. तिच्या मावशीच्या जीवनाइतकाच गुलाबताईचाहि जीवनक्रम त्यागी आणि सेवारत होता. तिचें शिक्षण कोणत्याहि सरकारी संस्थेंत झालेलें नव्हतें. वर्ध्याच्या महिलाश्रमांत ती शिकलेली होती. तिचें तें कष्टिक, सेवामय जीवन पाहिलें म्हणजे चंदनला वाटे, आपल्या धर्मांत, आपल्या संस्कृतींत, आपल्या तत्त्वज्ञानांतहि, ख्रिस्तीधर्माप्रमाणें, जनसेवेंत आयुष्य घालविण्याची संधि आणि शिकवण असली पाहिजे.

पण, त्याबरोबरच तिच्या मनांत येई कीं, गुलाबचें जीवन हें कांहीं सर्वसामान्य हिंदु स्त्रीचें जीवन नव्हे. उलट हिंदुत्वाच्या बहुतेक मर्यादा जिनें झुगारून दिल्या आहेत, अशा लोकोत्तर स्त्रीचें जीवन आहे तें. ती इतकी कांटेकोर वागणारी असतांहि लोक तिच्याविषयीं केव्हां केव्हां किती वाईट बोलत, हें चंदनला माहीत होतें. त्यामुळें तिच्या मनांत पुष्कळदां अशी शंका येई कीं, गुलाबताई ज्या मार्गानें जात आहे, तो मार्ग आपल्या समाजांत कांहीं शिष्टसंमत नाहीं.

ही आपली शंका जेव्हां तिनें एकदां गुलाबजवळ बोलून दाखविली, तेव्हां तिनें हंसून म्हटलें—

" हा गांधींचा मार्ग आहे, चंदन— "

आणि त्यानंतर गुलाबनें त्या मार्गाचें शास्त्र विशद करणारीं गांधी, विनोबाजी, कालेलकर, कृपलानी, जावडेकर, धर्माधिकारी प्रभृतींचीं पुस्तकें आणि लेख तिला वाचावयाला दिले. तीं वाचून तिच्या मनाला असें वाटलें कीं, आपल्या समाजांतहि लोकसेवेचा मार्ग स्त्रियांना खुला आहे आणि त्या सेवेचें पद्धतशीर शिक्षण देणाऱ्या संस्थाहि आहेत.

ती गोष्ट जेव्हां तिनें एक दिवस अवधूतजवळ बोलून दाखवली, तेव्हां तो म्हणाला—

" हो. भारतीय जीवनाची सर्वांगांनीं पुनर्घटना करण्याचा गांधींचा जो प्रयत्न

सारखा चालू आहे, त्याचाच भाग आहे तो एक. स्त्रिया इतक्या मोठ्या प्रमाणांत राष्ट्रीय चळवळीत आल्या, याचं सर्व श्रेय त्यांना आहे. कर्वे आणि देवधर यानीं स्त्रियांना सामाजिक चळवळींत आणल्या. पण, जीवनांतील सर्वांत उग्र असा जो स्वातन्त्र्याचा लढा, त्यांत स्त्रियांना आणण्याचं श्रेय सर्वस्वीं महात्माजींना आहे—"

आणि क्षणैक थांबून त्यानें तिच्या नजरेला नजर देत विचारलें—

"तुझा राजकीय चळवळींत भाग घ्यायचा विचार आहे का, चंदन ?—"

त्याच्या त्या सरळ प्रश्नानें ती गोंधळून गेली आणि म्हणाली—

"हो. केव्हां केव्हां वाटतं. पण, राजकीय चळवळींत भाग घेण्यापेक्षां कांहींतरी समाजसेवेचं कार्य करावं असंच जास्त वाटतं मला नेहमीं—"

"तेंहि करायला हरकत नाहीं. पण आपला देश जोंपर्यंत स्वतंत्र होत नाहीं आणि समतेच्या तत्त्वावर आपल्या समाजाच्या एकंदर जीवनाची जोंपर्यंत पुनर्घटना होत नाहीं, तोंपर्यंत भूतदयेच्या कामांचा फारसा उपयोग होण्याचा संभव नाहीं. आपल्या सगळ्या दुर्दशेच मूळ राजकीय आणि सामाजिक विषमतेंत आहे—"

"पण राजकीय लढ्यात पडण्याची ज्यांची तयारी नाहीं, त्यांनीं भूतदयेचीं कामं करायला काय हरकत आहे ? खुद्द गांधीनीं सुद्धां हरिजनसेवेचा स्वतंत्र कार्यक्रम ठेवलाच आहे ना ?—"

"हो. पण आज या देशांत आपलं राज्य असतें, तर हरिजनांचा प्रश्न कायद्याच्या जोरावर बऱ्हंशी सोडवतां आला असता आपल्याला. सतीची चाल ही अत्यंत पुरातन आणि पवित्र मानलेली असतांनाहि ब्रिटिश सरकारनें ती लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशीं बंद केलीच कीं नाहीं ?—"

चंदन कांहीं बोलली नाही.

"भूतदयेच्या कामांची उपयुक्तता मला मान्य आहे. पण राजकीय सत्तेचा जोर मागे नसल्यास भूतदया ही लटकी पडते. शिवाय, आपल्या समाजाचं दैन्य हें बऱ्हंशीं राजकीय पारतंत्र्य आणि सामाजिक विषमता यांच्यामुळं उत्पन्न झालेलं आहे. त्यांचं निर्मूलनच काय पण, निवारण सुद्धां नुसत्या भूतदयेनं होणार नाहीं. म्हणून, मला वाटतं, तुला जर आपल्या हातून कांहीं व्हावंसं वाटत असेल, तर तूं राजकारणांत भाग घ्यायला हवास—"

"पण, त्याला एक निराळीच हिंमत, निराळीच धडाडी लागते नाहीं कां ?—"

" ती हिंमत न् धडाडी त्यांत पडल्यानं आपोआप येते, चंदन—"

अवधूतनें हंसून म्हटलें.

तेव्हां ती किंचित् लाजून म्हणाली—

" पण मीं विचार केला नाहीं अजून या प्रश्नाचा—"

" मग आजपासूनच विचार करायला लाग तूं. आपण सध्यां अशा परिस्थितींत आहोंत कीं, एवढ्या जिव्हाळ्याच्या प्रश्नाचा विचार करणं उद्यांवर टाकून चालणार नाहीं. हिंदुस्थानाला पुढलीं पांच सहा वर्षे क्रांतिकारक जातील असं वाटतं मला; व गेल्या पाऊणशें वर्षांत घडले नाहींत असे उत्पात कदाचित् पुढल्या पांच सहा वर्षांत घडतील. त्या लोकशाहीच्या क्रांतींत जर आपला हात नसेल, आपल्या सामर्थ्याचा एकहि बिंदु जर खर्ची पडलेला नसेल, तर आपलं जीवन व्यर्थ गेलं, एवढया प्रचंड आंदोलनाच्या काळांत आपण फुकट जन्म घालवला असं भावी पिढया म्हणतील आपल्याबद्दल. विश्वक्रांतीच्या या विराट् यज्ञांत आपल्या हातची एकादी समिध जरी पडली, तरी जीवनसाफल्याचं जें समाधान आपल्या मनाला लाभेल, तें संसारांतल्या कोणत्याहि सुखापेक्षां श्रेष्ठ समजतों मी—"

ते त्याचे उद्गार तिला अग्निज्वालेच्या स्पर्शासारखे वाटले.

# जुन्या जगाची चिता १३

अवधूतचे ते उद्गार आठवले, म्हणजे चंदनचें मन अगदीं बेचैन होऊन जाई. मिशनच्या ज्या कर्मठ वातावरणांत ती वाढली होती, त्या वातावरणांत दयाधर्माशिवाय दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीला स्थान नव्हतें. त्या मिशनमध्यें ज्या फ्रेंच आणि हिंदी भगिनी काम करीत असत, त्यांना आपल्या भोंवतालच्या हिंदी समाजाच्या दैन्याची जरी तीव्र जाणीव होती, तरी त्या दैन्याचें मुख्य कारण जें राजकीय पारतंत्र्य त्याचें मात्र मुळींच भान नव्हतें. शिवाय, अनाथ, अपंग आणि निराश्रित अर्भकें यांची व्यवस्था ठेवण्यांत त्या इतक्या कांहीं व्यग्र असत कीं, जीवनाचा जो भीषण लढा देशांत निरनिराळ्या रूपांनीं सर्रास चालूं होता, त्याकडे लक्ष द्यावयाला त्यांना मुळीं वेळच मिळत नसे. शहरांत राजकीय किंवा जातीय दंगा होऊन आठवडी बाजार बंद पडले, आणि मिशनमधील भिकाऱ्यांची रहदारी अजिबात थांबली, म्हणजे मग त्यांना बाहेरल्या जगांत चालूं असलेल्या प्रचंड वादळांचा कानोसा लागे. तथापि, वारंवार होणारीं हीं वादळें कोणत्या स्वरूपाचीं आहेत, हें जाणून घेण्याची इच्छा मात्र त्यांना सहसा होत नसे. भिकारी नेहमीं गांधीजींचें नांव घेत, म्हणून तें त्यांना माहीत झालेलें होतें; व तो कंगालखाना पहावयाला मधून मधून येणारे युरोपिअन मिशनरी किंवा प्रवासी गांधीजींविषयीं कौतुकमिश्र आदरानें जें बोलत, तें ऐकून त्यांना एवढेंच वाटे कीं, ज्याच्यामुळें वारंवार संप, हरताळ किंवा दंगली होतात, धरपकड चालते आणि गोऱ्या कातडीच्या उपऱ्या लोकांवर कांहीं काळ सर्व हिंदी जनतेचा राग होतो, तो हा गांधी कांहीं अगदींच भयंकर वाईट माणूस नाहीं.

आणि मग मात्र सिस्टर झेवियरा एकादे वेळीं म्हणे, गांधी हा जर इतका शांततावादी माणूस आहे, तर ब्रिटिश सरकारनें त्याच्याशीं समेट कां करूं नये?

सीरियांतल्या कडव्या आरबांना आम्ही फ्रेंचांनीं नाहीं कां स्वातंत्र्य दिलें ? त्यांच्या-पेक्षां हिंदी लोक कितीतरी सभ्य आणि कायद्याचीं बंधनें निष्ठेनें पाळणारे आहेत.

सिस्टर झेवियरा ही फ्रेंच होती. तिची वृत्ति जरी कर्मठ होती, तरी स्वतंत्रता, समता आणि बंधुता या आपल्या देशांत गाजलेल्या तत्त्वत्रयीचा तिला अभिमान होता; व फ्रेंच लोक काळ्या, सांवळ्या किंवा पिवळ्या लोकांना इतर गौरकायां-प्रमाणें तुच्छतेनें वागवीत नाहींत, ही गोष्ट ती वारंवार बोलून दाखवीत असे. देवाच्या राज्यांत काळा, गोरा असा भेदभाव नाहीं, असलाच तर तो फक्त ख्रिस्ती आणि ख्रिस्तीतर एवढाच आहे, असें तिला मनापासून वाटे. त्यामुळें ब्रिटि-शांच्या वर्णविद्वेषी धोरणाची आणि हिंदुस्थानाला पिळून काढणाऱ्या राजनीतीची ती केव्हां केव्हां कुचेष्टा करीत असे.

पण असे प्रसंग शहरांत फारच राजकीय दंगल झाली म्हणजे केव्हांतरी यावयाचे.

त्यामुळें चंदनच्या मनाची स्थिति, राजकीय बाबतीत, कांचघरांत कुंडीमध्यें वाढविलेल्या शोभेच्या विलायती झाडासारखी झाली होती.

तिच्या आईची वृत्तीहि मिशनमधील भगिनींच्या वृत्तीपेक्षां वेगळी नव्हती.

नागपूर मिल्समध्यें संप वारंवार होत; व त्यांपैकीं कांहीं संप महिना दोन महिने चालून लाठीहल्ल्यापर्यंतहि कामगारांच्या चळवळीची मजल जात असे. पण रख-माला संपाविषयीं एक प्रकारचा भयसंमिश्र तिटकारा होता. ती अंगावरल्या कामावर चांगले पैसे मिळवीत असे. शिवाय, त्यांचें कुटुंब अगदीं सुटसुटीत असल्यामुळें, इतर कामगारांना जी आर्थिक हलाखीची झळ सारखी लागे, तिची तिला तितकीशी जाणीव नसे. त्यामुळें संप हें तिला एक संकट, आपल्या सुर-क्षित जीवनांत बिघाड उत्पन्न करणारी एक बला वाटे. म्हणून, संप सुरू झाला कीं, ती जी घरीं बसे, ती संप मिटून गिरणीचा पोंगा होईपर्यंत पुन्हा घरांतून बाहेर पडत नसे.. स्त्रीकामगारांत ती सुशिक्षित समजली जावी अशी खरोखरी तिची बौद्धिक ऐपत होती; व कामगार पुढाऱ्यांनीं तिला आपल्या संघटनेंत ओढण्याचाहि प्रयत्न केला. रखमाला संघटनेचें महत्त्व पटे पण भयहि वाटे. त्यामुळें संघ आणि संप यांच्यापासून ती दूर रहात असे.

उलट, संप होतांच मिशनभोंवतालच्या वस्तींत जें बेकारीचें भीषण वातावरण उत्पन्न होई, त्यामुळें संप सुरू झाल्यापासून चंदनच्या कानांवर संप आणि त्याचे

पुढारी यांच्याविषयींचा जळफळाट मात्र सारखा पडे. उपासमारीनें गांजलेल्या नवराबायकोंची दिवसभर चालणारी कचकच, तान्ह्या मुलांचे पोषणाच्या अभावीं होणारे अपमृत्यु आणि कामगार घरीं बसल्यामुळें वस्तींत अहोरात्र चालणारी धूम–मिशनमधील सिस्टरना संप हा एक अनर्थ वाटत असे त्यामुळें. पण, संपाच्या मूलभूत कारणांची चौकशी करण्याऐवजीं त्या ' दयेच्या भगिनी ' संपामुळें उत्पन्न होणारी अस्वस्थता, आजार आणि अपमृत्यु यांच्याकडे बोट दाखवून कामगार आणि विशेषतः त्यांचे पुढारी यांच्या नांवानें खडे फोडीत असत. संपांतील उपासमारीच्या काळांत बालमृत्यु फार होतात म्हणून जळफळणाऱ्या त्या भगिनींना कमी पगारावर रात्रंदिवस अर्धपोटी काबाडकष्ट करणाऱ्या कामगारांचीं कुटुंबें कशीं अल्पायुषी होतात, हें मात्र कधींहि उमजलें नाहीं.

अर्थात् संपाच्या मागें असलेले आर्थिक आणि राजकीय प्रश्न चंदनच्या कदाचित् कधींच लक्षांत आले नसते.

पण हिरा आणि अभिमन्यु यांची संपाच्या बाबतींत अगदीं निराळी वृत्ति होती; व संप सुरू झाल्यावर तीं भावंडें ज्या उत्साहानें संपवाल्यांच्या सभांना हजर रहात आणि संपाविषयीं बोलत, त्यामुळें चंदनला संपाच्या मुळाशीं असलेल्या प्रश्नांची थोडीतरी ओळख होत असे. कामगारसंघ किंवा त्याचे पुढारी यांच्याविषयीं अभिमन्यूला मुळींच प्रेम नव्हतें. इतकेंच नव्हे, तर स्वतंत्र मजूरपक्षातर्फे महार कामगारांची जातवार संघटना निर्माण करावी, असाहि प्रयत्न त्यानें केला होता. पण तो यशस्वी झाला नाहीं. तथापि, नागपूरच्या कामगारवर्गांत महारांचा भरणा फार मोठा असल्यामुळें, प्रत्येक संपाची तड यशस्वी रीतीनें लागावी आणि आपल्या जातवाल्यांची आर्थिक स्थिति सुधारावी, याबद्दल त्याला साहजिकच कळकळ वाटे; व त्या दृष्टीनें संपाच्या उठावणींत तो थोडाबहुत भागहि घेत असे. त्या दोघां भावंडांबरोबर चंदनहि केव्हां केव्हां संपवाल्यांच्या सभांना जात असे.

त्यामुळें ' नागपूर मिल्स बॉयकॉट ' पासून तों ' इन्किलाब जिंदाबाद ' पर्यंत नाना प्रकारच्या संघगर्जना तिच्या कानांवर पडल्या होत्या.

पण, त्या गर्जनांचा परस्परांशीं असलेला संबंध आणि त्यांच्या मुळाशीं असलेली आर्थिक आणि राजकीय पुनर्घटनेचीं तत्त्वें यांची मात्र तिला नीटशी कल्पना नव्हती.

नाहीं म्हणावयाला, ती जेव्हां जेव्हां अंजुमावशीकडे जात असे, तेव्हां तेव्हां

गांधीजींच्या राजकीय चळवळीसंबंधीं मात्र तिला पद्धतशीर माहिती मिळत असे. अंजिराचें घर म्हणजे शहरांतील ब्राह्मणेतर कॉंग्रेस कार्यकर्त्यांचा एक अड्डाच होता; व कॉंग्रेसतर्फे होणाऱ्या शहरांतील हरएक चळवळींत पंजाबरावाचा हात असल्यामुळें तिच्या घरीं गेल्यावर त्या चळवळीची कांहीं ना कांहीं बातमी कानांवर पडली नाहीं, असें सहसा होत नसे. स्थानिक आणि प्रांतिक निवडणुकी, कॉंग्रेस कमिट्यांतील पक्षोपपक्ष, मंत्रिमंडळांतील लाथाळी वगैरे नाना प्रकारांची चर्चा त्या अड्ड्यावर अहोरात्र होत असे. पण, या हंगामी राजकारणाच्या मागें उभें असलेलें गांधीजींचें लोकातिग विभूतिमत्व आणि त्यांचें लोकविलक्षण तत्त्वज्ञान यांचें जें हृदयंगम विवरण तिला गुलाबच्या तोंडून ऐकायला मिळे, तेंच खरोखरी तिचें मुख्य राजकीय शिक्षण होतें. पण, गुलाबची भेट ही सणावारींच होणारी असल्यामुळें, चंदनवर तिच्या सहवासाचाहि संस्कार प्रबलतेनें झाला नाहीं.

उलट, हिराच्या घरीं अवधूत आणि अभिमन्यु यांचे जे वाद नेहमीं चालत आणि अवधूतच्या निरनिराळ्या उद्योगांची जी माहिती त्या वादांतून मिळत असे, तिचाच परिणाम चंदनच्या मनावर दिवसेंदिवस जास्त जास्त होत होता. मिशनमधील कर्मठ वातावरणाची आणि भूतदयेच्या कामाची जी कुचेष्टा ते दोघे करीत, ती जरी तिला आवडत नसे, तरी त्यांच्या त्या सतत कानांवर पडणाऱ्या टीकेमुळेंच मिशनबाहेरील अफाट जगाची जाणीव तिला हळुहळू होऊं लागली होती. विशेषतः, गेल्या ईस्टरच्या सणांत 'मास' पहावयाला ते दोघेहि मिशनमध्यें आले असतांना सिस्टर झेवियरा आणि अवधूत यांचा जो संवाद झाला, तो ऐकून ख्रिस्ताच्या चरित्रासंबंधीं ज्या नवीन कल्पना युरोपांत प्रचलित आहेत, त्यांची गंधवार्तासुद्धां मिशनमधील कर्मठ सिस्टरना नाहीं, याची कल्पना चंदनला प्रथमच आली.

त्या दिवशीं 'मास' आटोपून देवळांतून बाहेर आल्यावर सिस्टर झेवियरानें अवधूतला विचारलें—

"तुम्हांला आवडली का आमची पूजा ?—"

"हो. पण ख्रिस्ताच्या चरित्रावर नवीन दृष्टीनं केलेलं भाष्य इथं ऐकायला मिळेल, अशी जी माझी अपेक्षा होती, ती मात्र फसली—"

"नवीन दृष्टीनं केलेलं भाष्य ? तें कसलं ?—"

सिस्टरनें आपले खांदे किंचित् हलवून त्याच्याकडे आश्चर्यानें पहात विचारलें.

"ख्रिस्त हा केवळ धर्मप्रवर्तक नसून क्रांतिकारक होता आणि रोमन

सत्तेविरुद्ध बंड उभारण्याचा प्रयत्न केल्याबद्दल त्याला सुळावर चढविण्यांत आलें, हें मत ऐकलंय का कधीं तुम्हीं ?—"

"नाहीं. हें नवीनच पाखंड दिसतंय एक—"

सिस्टरनें आपल्या सुरकुतलेल्या गोऱ्यापान कपाळाला क्रूसानें स्पर्श करीत म्हटलें.

"तुम्ही पुरतं ऐकून घेण्यापूर्वीच पाखंड म्हणतां याला ?—"

"हो. कारण आमच्या प्रभूचा सगळा प्रयत्न स्वर्गाचं राज्य आणि आत्म्याचं तारण यांच्यासंबंधीं होता. या जगांतील घडामोडींकडे त्यानं कधीं लक्ष दिलं नाहीं—"

"हो. त्याला पकडण्याच्या वेळीं जे त्याचे शिष्य तोंड चुकवून पळाले, त्या भ्याड शिष्यांनीं नंतर त्याची जीं चरित्रं आपआपल्या कल्पनेप्रमाणं रंगवून लिहिलीं, त्या चरित्रांवरून तसा बोध होतो खराच. कारण त्या शिष्यांनीं खिस्तानं केलेल्या राजकीय संघर्षाचं स्वरूप जाणून बुजून बदलून टाकलं आहे. पण स्वजनांच्या उद्धारासाठीं राज्यक्रांति घडवून आणण्याचा प्रयत्न केल्यामुळें खिस्ताला सुळावर जावं लागलं हें मत आतां सर्वमान्य होत चाललं आहे—"

"मी हें सगळं प्रथमच ऐकतें आहे तुमच्या तोंडून—"

"इतकंच नव्हे, तर जगांतला पहिला समाजवादी असं खिस्ताचं वर्णन कांहीं सोशॅलिस्ट करितात; व खिस्ती समाजवाद असा एक स्वतंत्र पंथच आहे त्यांचा—"

सिस्टर कांहीं बोलली नाहीं.

"तो प्रेमाचा आणि दयेचा संदेश घेऊन आला होता, असं तुम्ही म्हणतां. पण, त्याचा संदेश विग्रहाचा आणि विप्लवाचाहि होता. मानव समाजांतील आर्थिक विषमतेचा दुर्धर रोग नुसत्या भूतदयेच्या मलमपट्ट्यांनीं बरा होणार नाहीं; तो नष्ट होण्यासाठीं शस्त्रक्रियाच करावी लागेल असं त्याला वाटत होतं आणि तें उघडपणें बोलून दाखविल्याबद्दल त्याला सुळावर जावं लागलं—"

"प्रभूच्या कार्याविषयींची अगदीं विचित्र उपपत्ति आहे ही—"

"विचित्र असेल. पण तुम्ही ती समजावून कां घेत नाहीं ? आपल्या धर्माविषयीं नवीन संशोधन किंवा विवरण काय केलं जात आहे, हें माहित करून घ्यायला नको कां तुम्हीं ?—"

" इथल्या कामामुळं आम्हांला वेळच मिळत नाहीं मुळीं— "

" असं म्हणून कसं चालेल ? वेळांत वेळ काढून तुम्हीं आपल्या प्रभूच्या चरित्राविषयींचं नवीन संशोधन वाचलं पाहिजे सगळं. मॉरिस मॉटरलिंकचं ' मेरी माग्दालन ' हें नाटक तरी वाचलंय कां तुम्हीं ?— "

" नाटक ? छे, तसलं कांहीं आम्ही वाचीत नाहीं कधीं; न् या लेखकाचं नांवहि मीं ऐकलेलं नाहीं— "

" मी देईन तें पुस्तक तुम्हांला. तेवढं छोटं नाटक जरी तुम्हीं वाचलंत, तरी ख्रिस्ताच्या चरित्राकडे बघण्याच्या नव्या दृष्टीची कल्पना येईल तुम्हांला— "

" बरं पाठवा. चंदन वाचून दाखवील मला— "

आणि खरोखरी फक्त चंदननेंच तें नाटक वाचलें. सिस्टर झेवियरानें पहिला प्रवेश वाचल्यावरोबर तिला सांगितलें कीं, प्रभूच्या चरित्रावरील असलीं अनधिकृत पुस्तकें वाचणें हा वेळेचा अपव्यय आहे. पण चंदननें तें नाटक दोनदां वाचलें; व तिच्या मनांत ज्या एक दोन शंका उद्‌भवल्या त्या लगेच तिनें अवधूतजवळ बोलून दाखविल्या.

" तुम्ही ख्रिस्त समाजवादी आहे असें जें परवां म्हटलंन तें कोणत्या अर्थानं ?— "

" तो सर्व प्रकारच्या विषमतेच्या विरुद्ध होता या अर्थानं. पण खरोखरी त्याला समाजवादी म्हणण्यापेक्षां राष्ट्रीय क्रांतिवादी म्हणणंच अधिक समर्पक होईल. कारण, त्यानं परतंत्र यहुदी राष्ट्राच्या जीवनाची सर्व बाजूंनीं पुनर्घटना करण्याचा प्रयत्न जिवावर उदार होऊन केला— "

" पण मग यहुदी जनता त्याच्या जिवावर कशी उठली ?— "

" यहुदी जनता त्याच्या जिवावर उठली, हें म्हणणं खोटं आहे, चंदन. रोमन सुभेदारापाशीं ज्यांचं वजन होतं अशा शास्त्री, याजक, सावकार, दरबारी वगैरे त्याच्या क्रांतिकारक प्रचारामुळं दुखावलेल्या प्रतिष्ठित लोकांनीं त्याला सुळावर देण्याचा हट्ट धरला. जनतेनं नव्हे. तो जर नुसता राजकीय क्रांतिकारक असता, तर या प्रतिष्ठित लोकांनीं कदाचित् त्याला गुप्त रीतीनं मदतहि केली असती. पण, त्यानें परंपरागत धर्माचारांत आणि आर्थिक व्यवस्थेंत हात घातल्यामुळें हे प्रतिष्ठित लोक त्याच्या जिवावर उठले. अगदीं आपल्या डोळ्यांसमोरलं उदाहरण द्यायचं म्हणजे टिळकांनीं धार्मिक बाबतींत लोकविरुद्ध बोलण्यावागण्याचं टाळल्यामुळं

त्यांच्या राजकीय क्रांतिवादाला जुन्या समाजाचा पाठिंबा मिळाला. उलट गांधी आणि सावरकर यांनीं आपल्या क्रांतिवादांत राजकीय पारतंत्र्याबरोबरच धार्मिक आणि सामाजिक विषमतेचाहि अंशतः समावेश केल्यामुळं समाजांतील अनेक वर्गांना ते अमान्य आणि अप्रिय होऊन बसले आहेत— "

अवधूत अशा रीतीनें एखाद्या विषयावर बोलूं लागला, म्हणजे त्याच्या त्या सयुक्तिक पण आवेशपूर्ण प्रतिपादनानें चंदन अगदीं मोहून जात असे. कॉलेजांतील आपल्या बरोबरीच्या विद्यार्थ्यांपेक्षां तो केवळ शरीरानेंच उंच आणि थोराड आहे असें नव्हे, तर त्याच्या मनाचीहि उंची आणि थोरवी कांहीं विशेष आहे, असें तिला अलिकडे जास्त जास्त वाटूं लागलें होतें. इतर विद्यार्थ्यांसारखा त्याचा जीवनक्रम निरुद्देश आणि विस्कळीत नव्हता. त्यानें एम्. ए. ला राज्यशास्त्र घेतलें होतें. सकाळचें लॉ कॉलेज आटोपल्याबरोबर तो दुपारीं एम्. ए. च्या वर्गांना हजर रहात असे; व त्या वर्गांचें काम संपतांच सायंकाळीं पांच वाजेपर्यंत विद्यापीठाच्या ग्रंथालयांत वाचीत असे. उरलेल्या वेळांत कॉलेजांतील निरनिराळीं मंडळें आणि विद्यार्थ्यांच्या चळवळी. शिक्षण संपेपर्यंत सार्वजनिक चळवळींत पडण्याची त्याची इच्छा नव्हती. पण वर्धा मिल्सच्या कारभारांतील स्वदेशीच्या नांवावर चाललेला खाबूपणा त्याला अगदीं असह्य झाला होता; व त्या खाबूपणाला तोंड पाडण्यासाठीं म्हणून संपाच्या वेळीं त्यानें कामगारांच्या सभेंत भाषण केलें. पण, त्या ओजस्वी बाणेदार भाषणामुळें त्याचा कामगार चळवळीशीं जो एकदां संबंध आला, तो पुढें वाढतच गेला. कामगार चळवळीच्या बाबतीतहि अभिमन्यु जी जातीय दृष्टि दाखवीत असे, ती त्याला अगदीं नापसंत होती; व त्यावरून त्या दोघांचे जे खटके वारंवार उडत, त्यामुळें जातवार चळवळीची भूमिका किती ठिसूळ आहे, हें चंदनच्या लक्षांत आलें होतें. इतकेंच नव्हे, तर मुस्लिम लीगनें पाकिस्तान योजनेचा पुरस्कार केल्याची बातमी आल्यावर त्या दिवशीं सायंकाळीं त्या दोघांचा जो वाद अभिमन्यूच्या घरीं झाला, तो ऐकून राष्ट्रीय क्रांतिवादाची जी कल्पना अवधूतच्या बोलण्यांत नेहमीं येत असे, तिच्या स्वरूपाची चंदनला यथार्थ जाणीव झाली.

"मुसलमानांचं स्वतंत्र राष्ट्र असल्याचं तत्त्व जर ब्रिटिश सरकारनं मान्य केलं, तर अस्पृश्यांचं स्वतंत्र राष्ट्र असल्याचं तत्त्वहि मान्य करायला भाग पाडूं आम्ही त्यांना— "

अभिमन्यु पाकिस्तानचा पुरस्कार करतांना मोठ्या उल्हासानें त्याला म्हणाला.

तेव्हां अवधूतनें हंसत हंसत त्याला म्हटलें,—

" तुझ्या या मागणीला माझा पूर्ण पाठिंबा आहे, अभि—"

" तूं टिंगल करतो आहेस माझी. तूं हिंदु आणि त्यांतून ब्राह्मण. माझा मुळींच विश्वास नाहीं तुझ्यावर या बाबतींत—"

" नाहीं. मी थट्टा मुळींच करीत नाहीं. मुसलमानांच्या बरोबरीनं तुम्ही दर्जा किंवा हक्क मागण्यांत मुळींच तोटा नाहीं आमचा—"

" तूं मुद्दाम उलटं बोलून राह्यला आहेस मला खिजवण्यासाठीं. आज तुमच्या-पुढं फक्त मुसलमानांना तोंड देण्याचा प्रश्न आहे. पण आम्ही तिसरा वांटा मागितल्याबरोबर तिरंगी स्वरूप येईल या यादवीला—"

" चुकीची कल्पना आहे तुझी. अस्पृश्यांशीं भांडण्याचं आम्हांला मुळीं कारणच नाहीं. अस्पृश्यांनीं स्वतःला तिसरं राष्ट्र म्हणवलं, स्वतंत्र राजकीय दर्जा प्राप्त करून घेण्यासाठीं धडपड केली किंवा पाकिस्तानप्रमाणं स्वतःचं दलितस्थान स्थापन करण्याचा चंग बांधला, तरी त्यामुळं आम्हांला भिण्याचं किंवा चिडण्याचं मुळींच कारण नाहीं. कारण अस्पृश्य हे किती झाले, तरी आमचेच सहोदर आहेत. त्यांची भाषा, परंपरा, संस्कृति सर्व या भरतभूमींतूनच निर्माण झाली आहे; व या भूमीशिवाय जगांत अन्यत्र कुठेंहि त्यांना थारा नाहीं. मुसलमानांप्रमाणं ते हिजरातची भाषा सुद्धां बोलूं शकत नाहींत. उलट, आदि हिंदु, आदि द्रविड किंवा आदिवासी या नांवांनीं जेव्हां ते या भूमीवर अग्रजन्माचा हक्क सांगतात, तेव्हां हें स्पष्ट दिसतं कीं, त्यांची आणि मुसलमानांची सांस्कृतिक आणि राजकीय भूमिका सर्वथैव भिन्न आहे. त्यामुळं ते हिंदूंशीं कितीहि भांडले, तरी हिंदूंपासून फुटून निघणं त्यांना अशक्य आहे. म्हणून मला अस्पृश्यांच्या कोणत्याहि मागणीची आणि चळवळीची भीती वाटत नाहीं. इतकेंच नव्हे, तर स्वतःला तिसरं राष्ट्र म्हणविण्याचा हा त्यांचा अट्टाहास मुसलमान आणि ब्रिटिश सरकार या दोघांनाहि एक नवा पेंच घालणार आहे या जाणिवेनं उलट मौज वाटते या त्यांच्या मागणीची मला—"

" पण लक्षांत ठेव, आम्ही आपल्या स्वतंत्र अस्तित्वासाठीं जरूर तर तुमच्याशीं लढायला सुद्धां उभे राहूं—"

अवधूतच्या त्या युक्तिवादानें कुंठित झालेला अभिमन्यु रागारागानें म्हणाला.

" तुम्ही खरोखरीच लढायला उभे राहिलांत, तर माझी अवस्था कुरुक्षेत्रावर

आपल्या बांधवांना पाहून हातांतून धनुष्यबाण खालीं टाकणाऱ्या अर्जुनासारखी होईल, अभि— ”

अवधूतनें हंसत हंसत त्याला उत्तर दिलें.

त्याबरोबर तो चिडून उद्गारला—

“ तूं थट्टा करतोस काय आमच्या चळवळीची ? मुसलमानांची थट्टा करायची हिंमत नाहीं होणार तुम्हांला अशी— ”

“ नाहीं रे, थट्टा नाहीं करीत बाबा तुमची ! माझ्या राष्ट्रीय क्रांतिवादाचं पहिलं कलम अस्पृश्यांच्या अग्रजन्माच्या हक्काला मान्यता देण्याचं आहे. राष्ट्रीय क्रांतिवादाच्या कार्यक्रमाप्रमाणं जर आपल्या समाजाची आणि देशाची पुनर्घटना झाली, तर अस्पृश्य या नांवाच्या जातीच मुळीं शिल्लक रहाणार नाहींत हिंदुस्थानांत ! म्हणून, तूं जेव्हां मला म्हणतोस आम्ही तुमच्याशीं स्वतःच्या स्वतंत्र अस्तित्वासाठीं लढणार म्हणून, तेव्हां मला कळत नाहीं मी तुझ्याशीं कशासाठीं लढायचं तें— ”

“ आमची अस्पृश्यता नष्ट करून आम्हांला हिंदु समाजाचं घटक बनवायची कल्पना आहे का ही तुझी ? पण छे ! आम्ही आमचं वैशिष्ट्य गमावून हिंदु समाजांत लोपून जायला तयार नाहीं मुळींच !— ”

“ तुम्ही आपलं वैशिष्ट्य गमवावं असं म्हणतो कोण ? तें खुशाल कायम ठेवा तुम्ही. इतिहाससंशोधकांना उपयोग होईल मानव वंशाचं संशोधन करतांना त्या वैशिष्ट्याचा— ”

त्याच्या त्या उत्तरांतला उपरोध अभिमन्यूला अगदीं मर्मी लागला. पण त्याला पुढं काय बोलावें हें सुचेना. म्हणून तो त्याची टिंगल करण्यासाठीं म्हणाला—

“ का रे, तुझ्या या राष्ट्रीय क्रांतिवादानं हिंदुस्थानांतले सगळे प्रश्न सुटतील अशी जर तुला खात्री आहे, तर तूं तें जाहीर कां नाहीं करीत स्वतःचं स्वतंत्र तत्त्वज्ञान म्हणून ?— ”

“ तुझी पहिली चूक अशी होते आहे अभि कीं, तूं राष्ट्रीय क्रांतिवाद हें मीं निर्माण केलेलं नवीन तत्त्वज्ञान समजतोस. पण तसलं भलतंच श्रेय थट्टेंत सुद्धां घेण्याची इच्छा नाहीं मला. राष्ट्रीय क्रांतिवादाची कल्पना राष्ट्रसभेइतकीच जुनी आहे. न्या. रानड्यांनीं विरोधी कल्पनांतील संघर्ष टाळण्यासाठीं राष्ट्रीय सुधारणावादाचं सात्विक, सौम्य तत्त्वज्ञान उत्पन्न केलं. पण, पारतंत्र्याचा उच्छेद

असल्या सौम्य तत्त्वज्ञानानं होणं अशक्य आहे हें लक्षांत घेऊन टिळक आणि परांजपे यांनीं राजकीय क्रांतिवादाचा पुरस्कार केला. परंतु, आपलें हें क्रांतिवादाचें तत्व ते धार्मिक आणि सामाजिक विषमतेला लागू करायला मात्र तयार झाले नाहींत. त्यामुळं महाराष्ट्रांतील राष्ट्रीय चळवळीला टिळकांच्या हयातीत कधींच सर्वांगीण क्रांतीचें विशाल आणि प्रभावी स्वरूप प्राप्त झालें नाहीं. गांधींनीं टिळकांच्या पुढें किती तरी मोठी मजल मारली आणि राष्ट्रभाषेच्या निर्मितीपासून तों अस्पृश्यतेच्या निर्मूलनापर्यंत सर्व प्रश्न राष्ट्रीय चळवळीच्या कक्षेंत आणले. त्या दृष्टीनं गांधींनाच खरोखरी राष्ट्रीय क्रांतिवादाचे जनक म्हणावं लागेल. पण धार्मिक बाबतींत चातुर्वर्ण्याला मान्यता देऊन आणि आर्थिक बाबतीत ट्रस्टीशिपच्या कल्पनेची तरफदारी करून धार्मिक आणि आर्थिक विषमतेचा नायनाट करण्याचं गांधींनीं पर्यायानं नाकारलं आहे. गांधींच्या राष्ट्रीय क्रांतिवादाच्या तत्त्वज्ञानांतील या वैगुण्यामुळंच खरोखरी समाजवादाला हिंदुस्थानांत डोकं वर काढायला जागा मिळाली. धार्मिक आणि आर्थिक समतेचा गांधीजी जर निरपेक्ष पुरस्कार करते, तर समाजवादाची हिंदुस्थानांत गरजच पडती ना. त्यांचा क्रांतिवाद हा टिळकांच्या निव्वळ राजकीय क्रांतिवादाच्या मानानं जरी अतिशय व्यापक असला, तरी समाजाच्या सर्वांगीण उन्नतीला अवश्य अशी विराट् क्रांति घडवून आणण्याइतका तो विशाल किंवा मूलगामी नाहीं. माझी राष्ट्रीय क्रांतिवादाची कल्पना सर्वस्पर्शी आहे. आपल्या राष्ट्रीय जीवनांतील सर्व प्रकारचं पारतंत्र्य आणि सर्व प्रकारची विषमता यांच्यावर त्या क्रांतिवादानं शस्त्र उचललं आहे. तो निष्कारण कोणाचीहि हिंसा करणार नाहीं. पण, हिंसेशिवाय पाऊल पुढें पडूं शकत नाहीं असं जेव्हां त्याला आढळेल, तेव्हां ती आवश्यक हिंसा कराव्यालाहि तो कचरणार नाहीं— ''

" तुझ्या या राष्ट्रीय क्रांतिवादाचं पर्यवसान शेवटीं नाझीवादांत होईल अशी भीति वाटते मला, अवधूत— "

" छे ! चुकीची आहे कल्पना तुझी. या राष्ट्रीय क्रांतिवादांत कोणत्याहि प्रकारच्या आक्रमणाला, कोणत्याहि प्रकारच्या विषमतेला आणि विजिगीषेला थारा नाहीं. मानव्याचा अनिर्बंध विकास हें त्याचं ध्येय आहे; व त्या ध्येयाच्या सिद्धतेला अनुकूल अशी कर्मभूमि अनेक धर्मांनीं, संस्कृतींनीं आणि जातींनीं गजबजलेल्या या भरतखंडांत असून, येथें जर हा क्रांतिवाद यशस्वी झाला, तर सर्व जगाच्या

पुनर्घटनेचा मार्ग मानवजातीला दाखविण्याचं श्रेय भारताला मिळेल, अशी माझी श्रद्धा आहे— ”

“म्हणजे विश्वक्रांतीच्या दृष्टीनं समाजवाद तुला अपुरा वाटतो म्हणायचा ?—”

“ हो. कारण समाजवादाची दृष्टि फक्त भौतिक आहे. माणसाला जसं पोट आहे, तसाच आत्माहि आहे, त्याला जशी भाकरीची गरज आहे, तशीच अध्यात्माचीहि आहे, हें समाजवाद ओळखीत नाहीं. मानवी जीवनाचं आणि आकांक्षांचं अतींद्रिय स्वरूप लक्षांत न घेतां माणूस हें निव्वळ एक अवजार, एक यंत्र आहे असं गृहीत धरून समाजवादानं जगाच्या पुनर्घटनेचा प्रयत्न चालवला आहे. समाजवाद आत्मा ओळखीत नाहीं, अस्मिता ओळखीत नाहीं, संस्कृति ओळखीत नाहीं, राष्ट्रीयता ओळखीत नाहीं. पैसा हें मानवी व्यवहाराचं एकमेव केंद्र कल्पून पैदा केलेलें आत्मशून्य, अमानुष तत्त्वज्ञान आहे तें. त्याची अपूर्णता आणि आत्मशून्यता लवकरच प्रत्ययाला येईल जगाच्या. लोकसत्ताक आणि अनाक्रमक अशा राष्ट्रीय क्रांतिवादामुळंच जगांत विश्वसंघ आणि आंतरराष्ट्रीय शांतता यांच्या स्थापनेचा मार्ग सुकर होईल. तें कार्य समाजसत्तावाद करूं शकणार नाहीं अशी खात्री होऊन चुकली आहे अलिकडे माझी—— ”

त्या दोघां मित्रांचें हें संभाषण चंदन मुकाट्यानें ऐकत होती. उतावळ्या रागीट अभिमन्यूला ज्या शांत निर्धारानें अवधूत उत्तरे देत असे, त्याचें तिला नवल वाटे. अभिमन्यूच्या अभ्यासाचे विषय वेगळे असले, तरी तो कांहीं कमी व्यासंगी किंवा कमी बुद्धिमान् नव्हता. पण त्याची भूमिका मूळांतच संकुचित आणि सदोष होती; व अवधूतच्या युक्तिवादामुळें जों जों तें त्याच्या लक्षांत येई, तों तों तो जास्तच चिडून जात असे. पण त्या दोघांच्या नित्य होणाऱ्या या वादांमुळें चंदनला प्रचलित प्रश्नांची चिकित्सक माहिती हळुहळू मिळत होती.

परंतु, निव्वळ राजकीय तत्त्वज्ञानावरील अगदीं प्राथमिक असें एकादें पुस्तक जरी अवधूतनें तिला वाचावयाला दिलें, तरी तिला कंटाळा वाटे. बर्नार्ड शॉचें साम्यवादावरील बुद्धिमान् स्त्रियांसाठीं म्हणून लिहिलेलें पुस्तक जेव्हां तिनें जेमतेम अर्धेंच वाचून परत केलें, तेव्हां अवधूत तिला हिणवण्यासाठीं हंसत हंसत म्हणाला—

“ हें पुस्तक ज्या अर्थी तूं पुरतं वाचूं शकली नाहींस, त्या अर्थी तूं बुद्धिमान् नाहींस असं म्हणावं लागेल आतां मला—— ”

" म्हणा ना ! माझी हरकत नाहीं मुळींच. माणसाचं महत्त्व आणि सामर्थ्य त्याच्या बुद्धिमत्तेंत असतं असं वाटत नाहीं मला. बुद्धिमान् माणसं किती नीच किंवा उलटया काळजाचीं असतात हें इतिहासांत वाचलेलं नाहीं का आपण ? माणसाची उन्नति त्याच्या आत्म्याच्या शुद्धतेवर आणि उदात्ततेवर अवलंबून आहे; बुद्धीच्या किंवा मनाच्या विकासावर अवलंबून नाहीं— "

" मग तूं कांहीं न वाचतांच आत्म्याची उन्नति करून घेणार आहेस वाटतं ?—"

" तसं कुठं म्हणतें मी ? पण मला असं वाटतं कीं, माणसाचं ज्ञान वाढलं, त्याच्या मनाचा अत्यंत विकास झाला किंवा बुद्धीची धार तीक्ष्ण झाली, म्हणून तो चांगला वागेलच असं नाहीं, समाजाच्या उपयोगी पडेलच असें नाहीं. मी वाचन हें गौण समजतें. आपल्या भोंवतालच्या परिस्थितीचें यथार्थ ज्ञान माणसानं करून घेतलं म्हणजे पुरे. वाचनानं माणसांचीं मनं निव्वळ पुस्तकी बनून तीं विशिष्ट तत्त्वांच्या केव्हां केव्हां इतकीं आहारीं जातात कीं, आपल्या भोंवतालच्या वास्तविक परिस्थितीशीं समरस होण्याची त्यांची शक्ति नष्ट होऊन जाते. वाचनापेक्षां सहृदय अवलोकनानं आणि सानुकंप आचरणानंच माणसांच्या जीवनाचा खरा विकास, आत्म्याची खरी उन्नति होते— "

" तुझ्या गुलाबताईनं आपल्या तत्त्वज्ञानाचा पाठ दिलेला दिसतोय हा तुला—"

" छे ! गुलाबताई न् मावशी या बिचाऱ्या इतकं काम करतात दिवसभर कीं, त्यांना वाचायला न् वाद करायला वेळच मिळत नाहीं मुळीं— "

" मी समजलों तुझ्या बोलण्याचा अर्थ. आमचं वाचन न् वाद हे व्यर्थ वाटतात तुला—"

" तो बुद्धिविलास आहे एक. ज्यांना वेळ न् ऐपत असेल, त्यांनीं रमावं त्यांत. इतरांनीं समाजाच्या खस्ता खाव्यात— "

" मग तूं स्वतः खस्ता खायला कधीं प्रारंभ करणार आहेस ? राजकारणांत पडण्याचा विचार करणार होतीस ना तूं ? तो विचार ठरला नाहीं का अजून ?—"

" राजकारणांत बुद्धिभेदाला आणि मतभेदाला फार वाव असतो. त्यापेक्षां समाजसेवेचं कार्य हें सरळ न् सात्विक वाटतं मला— "

" हाच निर्णय दिला का अखेर तुझ्या बुद्धीनं— "

" नाहीं. अजून निश्चय होत नाहीं माझ्या मनाचा. तो झाला म्हणजे लगेच सांगेन मी तुम्हांला— "

" मी वाट पहातोंय तुझ्या निर्णयाची, चंदन-- "

" कां बरं ?-- "

तिनें एकदम चमकून त्याच्याकडे पहात विचारलें.

पण त्याचे डोळे अगदीं नेहमींसारखेच प्रसन्न होते. तो तिच्या दृष्टीला दृष्टि देऊन गंभीरपणानें म्हणाला—

" तूं जर राजकारणांत पडायचं ठरवलंस, तर मला सहचारिणी मिळाल्याचा आनंद होईल, चंदन-- "

त्याचा तो उद्गार ऐकतांच तिच्या अंगावर एकदम रोमांच उभे राहिले. पण ती कांहींहि बोलली नाहीं.

तिच्या हृदयांत दिवसभर त्याचें तें उत्तर डांचत होतें. त्याचा आणि आपला दिवसेंदिवस झपाट्यानें वाढत असलेला हा स्नेहसंबंध—त्या संबंधाचें पर्यवसान अखेर कशा रीतीनें होणार ? तिच्या रूपावर लुब्ध असलेल्या कॉलेजांतल्या इतर कांहीं विद्यार्थ्यांप्रमाणें त्यानें आपली तिच्याविषयींची भावना कोणत्याहि रीतीनें सहसा व्यक्त होऊं दिली नव्हती. पण, त्याच्या बोलण्यावागण्यांत जो हा एक संयम होता, त्या संयमामुळेंच तिला त्याचें आकर्षण आणि भयहि अधिक वाटे. त्याच्या दृष्टींतून आणि उद्गारांतून एकादे वेळींच व्यक्त होणारी ती भावना—त्या भावनेचा आपल्या भवितव्यावर काय परिणाम होणार असा प्रश्न तिच्या मनांत उद्भवला, म्हणजे तिच्या जिवाचा अगदीं थरकांप होऊन जात असे.

त्याचा सगळा पूर्वेतिहास तिला आतां माहित झाला होता. पण तिच्या पूर्वेतिहासाची मात्र त्याला यत्किंचित्हि कल्पना नव्हती. त्यासंबंधीं त्यानें कधीं विचारलें नाहीं, तिनें कधीं सांगितलें नाहीं. पण, तो डोळ्यांसमोर नसला, म्हणजे त्या पूर्वेतिहासाचें स्मरण तिच्या मनाला सतावून सोडीत असे. आणि मग तिला पुष्कळदां वाटे कीं, आपल्या आजीला विश्वासांत घ्यावी आणि तिला सगळें कांहीं एकदां स्पष्ट सांगून टाकावें. त्याचे आजोबा आणि वडील यांची सावकारी जरी आपल्या आजोबांच्या आणि वडलांच्या नाशाला कदाचित् कारण झाली असली, तरी त्यांत त्याचा दोष काय आहे ! आणि त्याच्या आजोबांच्या आणि वडलांच्या वर्तनाचा दंश मनांत कायम ठेवून त्याचा राग त्याच्यावर काढण्यांत काय अर्थ आहे ? आपल्या आजीला ही गोष्ट खात्रीनें पटेल, आपण तिची समजूत खात्रीनें घालूं शकूं.

पण आपली आई ? आईची आठवण होतांच आजीला विश्वासांत घेण्याचा तिचा विचार तत्क्षणींच करपून जात असे.

' सहचारिणी ' ! त्याच्या संयत भावनेंतलें सगळें सामर्थ्य आणि सगळी मोहनी सांठवलेली होती त्या एका सूचक शब्दांत. पण त्याची सहचारिणी व्हावयाला आपण खरोखरीच पात्र आहोंत का ? राजकारण हा त्याचा स्वभावधर्म आहे. उलट राजकीय तत्त्वज्ञानाचा आणि धकाधकीचा आपल्याला अगदीं कंटाळा आहे. मग आपल्याला स्वतःची सहचारिणी बनविण्याच्या त्याच्या या बेताला उत्तेजन देण्यांत काय अर्थ ? त्याच्या अपेक्षा पूर्ण करण्याचें सामर्थ्य जर आपल्यांत नाहीं, तर त्याला भलत्या मोहांत गुरफटवण्याचें पातक आपण कां करावें ? त्याच्या प्रीती-साठीं आपला जीव तुटतो आहे, तगमगतो आहे, हें खरें. पण ती प्रीति अग्नि-ज्वालेसारखी आहे. त्या ज्वालेला कवटाळून, कापराप्रमाणें, तिच्याशीं एकरूप होण्याची पात्रता जर आपल्या ठिकाणीं नसेल, तर आपण त्याची फसवणूक कां करावी ?

तो विचार मनांत आला आणि तिनें ठरवून टाकलें कीं, उद्यां जेव्हां त्याची कॉलेजांत गांठ पडेल, तेव्हां त्याला सांगून टाकावयाचें कीं राजकारणांत पडायचें नाहीं, असा माझ्या मनाचा निश्चय झाला आहे.

पण, दुसऱ्या दिवशीं प्रयत्न करूनहि तो तिला कॉलेजांत भेटला नाहीं. म्हणून ती संध्याकाळीं मुद्दाम हिराच्या घरीं जावयाला निघाली.

पावसाची झिम झिम सुरू होती. पण, पश्चिम क्षितिजावरल्या एका पांढुरक्या ढगाच्या आडून लकाकणारें सूर्यबिम्ब खिडकीच्या धूसर तावदानामागें तळपत असलेल्या विद्युद्दीपाची आठवण देत होतें. त्याचा फिका प्रकाश अतिवृष्टीनें चिंब झालेल्या सृष्टीवर पडून तिला विशोभित पांडुरता आली होती. त्या प्रकाशांत छावलेल्या घरांवरील पावसानें शेवाळून बुरसलेल्या कौलारांत जी एकादीच नव्या कौलांची लाल लाल रांग दिसे, ती एकाद्या जुन्या मलिन वस्त्राला नव्या धाग्यानें केलेल्या रफूसारखी वाटत होती. गणेशोत्सव नुकताच संपला होता. पण ज्वारी कांहीं अद्याप जमिनींतून गुडघाभर सुद्धां वर आली नव्हती; व तिच्या पातीला येत चाललेला पिवळेपणा त्या प्रकाशांत, अकालीं पिकलेल्या केसांच्या तकाकीसारखा, विद्रूप दिसत होता.

तें उदास दृश्य पहात चंदन सडकेवरून खालच्या बाजूला आली आणि हिराच्या

घराकडे वळली. मशिदीसमोरल्या नळावर बायकांची कचकच चालू होती; व मशिदीच्या ओठ्यांवर बसलेले मुसलमान तरुण त्यांच्याकडे पाहून नाना प्रकारच्या कुचेष्टा करित होते.

ती झपाटयानें चालत परसदाराशीं आली आणि तें उघडून आंत पाऊल टाकणार, तोंच तिच्या कानांवर शब्द पडले—

" आज सुरू झालेलं हें युद्ध म्हणजे जुन्या जगाची चिता आहे, अभि. त्या चितेंतून नवा देह धारण करून स्वतंत्र हिंदुस्थान बाहेर पडेल-- "

ते घंटानादासारखे खणखणीत, सुरेल पण गंभीर शब्द कानांवर पडतांच तिच्या मनांतलें सगळें औदासीन्य लोपलें आणि कसली तरी विलक्षण ईर्ष्या आपल्यांत उसळत आहे, असें तिला वाटलें.

हिराची आजी पडवींतल्या एका खांबाला ओठंगून तरटावर बसली होती. चंदनला बघतांच ती तपकिरीची चिमूट नाकांत कोंबून म्हणाली--

" वर बसले आहेत सगळे न् केवढ्या मोठ्यानें बोलताहेत. रस्त्यानं जाणाऱ्या माणसांना कडाक्याचं भांडण चाललंय घरांत असं वाटायचं एकाद वेळीं— "

चंदन कांहीं न बोलतां मुकाटयानें जिना चढून वर गेली.

ती दृष्टीला पडतांच अवधूत म्हणाला—

" मग काय ठरलं तुझं चंदन ? आतां विचार करायला वेळ नाहीं मुळींच— "

" का बरं ? काय झालं एवढं ?— "

" तुला कळलं नाहीं अजून ? जर्मनीनं पोलंडवर स्वारी केली. दुसरं जागतिक युद्ध सुरू झालं आजपासून-- "

तो बोलतां बोलतां मोठ्यानें हंसला. त्याच्या त्या हास्यांत विलक्षण उत्साह भरला होता. आणि त्याचे ते विस्फारलेले डोळे कसल्या तरी विलक्षण आवेशाच्या दीप्तीनें झळाळत होते. तो हंसत हंसत म्हणाला—

" आतां विचार करायला वेळ नाहीं मुळींच. तुला जें काय ठरवायचं असेल, तें आतांच ठरवून टाकलं पाहिजे. अभीलाहि तेंच सांगितलं मी आत्तां— "

" मग त्यांनीं काय उत्तर दिलं ?— "

" मी याला सांगून टाकलं कीं, आतां आमच्या तिसऱ्या राष्ट्राच्या मागणीला जोर येईल आणि ती मागणी पदरांत पडेपर्यंत आम्ही तुमच्या स्वातंत्र्याच्या चळवळीचा मार्ग रोखून धरूं— "

अभिमन्यूनें मध्येंच म्हटलें.

" म्हणजे हा स्वातंत्र्याचा लढा कसा होणार तो पहा आतां, चंदन. एका बाजूला ब्रिटिश सरकार, स्वतःला तटस्थ म्हणविणारे मुसलमान आणि अस्पृश्य व दुसऱ्या बाजूला स्वातंत्र्याकांक्षी बहुजनसमाज— "

" कॉंग्रेस म्हण— "

अभिमन्यूनें त्याला मध्येंच रागानें अडवलें.

" नाहीं. बहुजनसमाजच. कॉंग्रेस स्वातंत्र्य मागणार आणि मिळवणार तें बहुजनसमाजासाठीं; एका पक्षासाठीं किंवा जातीसाठीं नव्हे, अभि. मग काय चंदन, तूं काय ठरवतेस ? या लढ्यांत भाग घेणार कीं एकादं भूतदयेचं निरुपद्रवी काम करित बसणार ?— "

चंदन स्तब्ध होती. तो उत्साहानें, आवेशानें बोलत होता. हिरा त्याच्याकडे कौतुकानें पहात होती. अभिमन्यु फुरंगटल्यासारखा होऊन चुळबूळ करित होता. तो पुन्हा मध्येंच म्हणाला—

" काय घाई चालवली आहेस तूं ही, अवधूत ! जणुं कांहीं कॉंग्रेस उद्यां लढा सुरू करणार आहे न् तुम्ही दोघं भाग घेणार आहांत त्यांत. दिवाणगिऱ्या सोडून असल्या बिकट परिस्थितीत कॉंग्रेस लढा सुरू करील असं वाटतं तरी कसं तुला ?— "

" कॉंग्रेस लवकर लढा सुरू करील, असं मलाहि वाटत नाहीं. पण, परिस्थितीच अशी येणार आहे कीं, कॉंग्रेसला लढा सुरू केल्याशिवाय गत्यंतर उरणार नाहीं आणि तो प्रसंग कोणत्या क्षणीं येईल याचाहि कांहीं नेम नाहीं. त्या प्रसंगासाठीं मन तयार केलेलं असावं म्हणून मी घाई करतोंय हिला. मग काय चंदन, काय विचार आहे तुझा ? या लढाईला जसा विद्युद्वेग आहे, तसा आपल्या विचारांनाहि राह्यला पाहिजे आतां— "

तो बोलतां बोलतां पुन्हा मोठ्यानें हंसला. त्या हास्यांतला जोष चंदनला विलक्षण वाटला. तिनें विस्मयानें डोळे विस्फारून त्याच्याकडे पाहिलें आणि तिच्या तोंडून उद्‌गार निघाला—

" मी लढ्यांत भाग घेईन तुमच्याबरोबर, अवधूत— "

## गत शतकांचीं पापें घोरें १४

चंदननें जेव्हां लढ्यांत भाग घेण्याचें आश्वासन अवधूतला दिलें, त्या वेळीं तिला कल्पनाहि नव्हती कीं, आपण इतक्या लवकर चळवळीच्या भोंवऱ्यांत खेचले जाऊं.

कारण, युद्ध सुरू झाल्यावरहि देशांत कॉंग्रेसचीं मंत्रिमंडळें कारभार पहात होतीं; व राष्ट्रसभेपासून तों स्वतंत्र मजूरपक्षापर्यंत साऱ्या पक्षोपपक्षांनीं सरकारला पाठिंबा देण्याचें आपलें धोरण जाहीर केलें होतें. इतकेंच नव्हे, तर गांधीजी आणि नेहरू या दोघांनींहि युद्धाच्या पहिल्याच आठवड्यांत अशी घोषणा केली होती कीं, इंग्लंडच्या अडचणींचा फायदा घेऊन या आणीबाणीच्या वेळीं कोणत्याहि प्रकारचा सौदा करण्याची आमची इच्छा नाहीं. ब्रिटिश सरकारनें आपले युद्धहेतु विशद करावेत आणि ज्या लोकशाहीच्या रक्षणार्थ इंग्लंड युद्धांत पडलें आहे, त्या लोकशाहीचें तत्त्व ब्रिटिश सरकार हिंदुस्थानाला कशा रीतीनें लागू करणार हेंहि स्पष्ट करावें, अशी जी मागणी वर्किंग कमिटीनें आपल्या युद्धविषयक ठरावांत केली होती, तीहि गांधीजींना पसंत पडली नाहीं. त्यांनीं त्या ठरावावर टीका करून आपला असा अभिप्राय व्यक्त केला कीं, राष्ट्रसभेला जें काय सहाय्य इंग्लंडला करणें शक्य असेल, तें तिनें बिनशर्त करावयाला हवें होतें.

गांधीजींची ती टीका प्रसिद्ध होतांच अभिमन्यु अवधूतला म्हणाला--

" का रे, तूं तर अगदीं उतावळा झाला आहेस लढ्यासाठीं! पण तुझ्या महात्म्यानं वर्किंग कमिटींतील मतभेद चवाठ्यावर आणून कसा बिब्बा घातलाय भावी राजकारणावर पाहिलास ना? तरी मी तुला म्हणत होतों कीं, गांधींना या वेळीं हातांत असलेली सत्ता सोडायची मुळींच इच्छा नाहीं—"

" अरे, पण तूं जरा दमानं घे, अभि ! लढाई सुरू होऊन अद्याप पुरते पंधरा दिवसहि झाले नाहींत, तोंच तूं त्या म्हाताऱ्याला सुळावर द्यायची घाई का करतोस येवढी ? गांधींना कदाचित् लढा नकोहि असेल. पण गेल्या आठ दहा दिवसांत जी विलक्षण आर्थिक परिस्थिति उत्पन्न झाली आहे, तिच्यांतून कदाचित् पुढं नवीं सामर्थ्यं उत्पन्न होतील आणि ती राजकारणाला अगदीं नवं वळण देतील. या जागतिक युद्धांतून कोणत्या स्फोटक शक्ति प्रकट होतील आणि त्या हिंदुस्थानांत कोणते उत्पात घडवून आणतील हें आज सांगणं कठीण आहे खरोखरी— "

अवधूतनें केलेलें हें भाकित अक्षरशः खरे ठरलें.

कारण, काँग्रेसनें जरी राजकीय लढा सुरू न करण्याचा आपला विचार जाहीर केला होता, तरी महागाईचा आर्थिक लढा मात्र युद्धाला प्रारंभ झाल्या क्षणापासून देशांत सर्वत्र चालू झाला.

लढाई सुरू झाल्यानंतर जो पहिला रविवार बाजार भरला, त्यांत धान्य खरेदी करावयाला गेलेल्या येसूनें घरीं आल्याबरोबर रखमाला म्हटलें—

" आतां आठवड्याच्या आठवड्याला दाणा विकत घेऊन निभणार नाहीं, सूनबाई. वर्साचं एकदम घेतलं, तरच स्वस्त पडेल थोडं तरी— "

" पण वर्साचा दाणा एकदम घ्यायला पैसे कुठून आणायचे, सासूबाई ? मिलनं स्वस्त धान्याचं दुकान उघडावं न् महागाई भत्ताहि द्यावा अशी बोलवा सुरू झाली आहे कामगारांत. पण तें घडून येईल तेव्हां खरं—"

" मी आज बाजारांतून येतां येतां अंजिराला सांगून आलें आपल्यासाठीं दोन पोतीं ज्वारी राखून ठेव म्हणून. पण त्यांची ज्वारी त्यांनाच पुरायची मारामार. तेव्हां ती आपल्याला कुठून देणार ? पण तरी ती म्हणाली मी कुठून तरी पोतंभर ज्वारी आणून ठेवीन म्हणून. त्यांतून यंदा अवेळीं पाणी झाल्यानं पीकहि चांगलं निघालं नाहीं म्हणतात— "

" हूं ! पण हें सगळं आपल्यासारख्या रोजीवर जगणाऱ्या न् आठवड्याच्या आठवड्याला दाणा आणून खाणाऱ्या माणसांना भोवायचं. ज्यांच्या गांठीं शिलकी पैसा आहे, ते वर्सा दोन वर्साचं सामान एकदम खरेदी करून कोठ्या भरून ठेवतील आपल्या. त्यांना काय कर्म आहे लढाईनं कितीहि प्रळय केला तरी ? मरण आपल्यासारख्या रोजंदारीनं पोट भरणाऱ्या लोकांचं— "

" पण जगांत रोजदारीनं पोट भरणारीं माणसंच जास्त आहेत किती तरी !

शेतमजूर, मिलमजूर, खाणमजूर, विडीमजूर, रेलमजूर—जिकडे पहावं तिकडे आपल्यासारखेच निढळाच्या घामानं भाकर कमावणारे लोक दिसतात मला. ते काय स्वस्थ बसतील का श्रीमंतांच्या भरलेल्या कोठ्या न् त्यांची चैन पहात मुकाटयानं! पोटांतल्या आगीइतकी मोठी आग सगळ्या जगांत दुसरी नाहीं, सूनबाई! ती आग भडकली नाहीं, तोंपर्यंतच शांततेचं महात्म. तूं लढाईला प्रळय म्हणतेस. पण पोटांतल्या आगीसारखा प्रळय नाहीं जगांत दुसरा— ”

येसू त्वेषानें हातवारे करीत उद्गारली. पण रखमानें तें मुकाटयानें ऐकून घेतलें आणि ती अगदीं शांतपणानें म्हणाली—

“ ही महागाई अशीच वाढत राह्यली, तर संप सुरू होईल लवकरच. मला आजवर कधीं भीति वाटली नाहीं संपाची. पण या महागाईत संप म्हणजे मरण आहे आपल्या लोकांचं. अगदीं फाके पडतील कामगारांच्या बायकापोरांना-- ”

“ पण का ग, या भाद्व्याच्या महिन्यांत ऐन हंगामाच्या सुरवातीला जर ज्वारी चौदा पायल्यांवरून सात पायल्यांवर गेली, तर पुढं चैत्रवैशाखांत कसं होणार लोकांचं ?-- ”

“ चैत्रवैशाखापर्यंत कोणी पाह्यलंय काय होईल तें? आजच्या घटकेलाच अशी स्थिति आली आहे कीं, दोन्ही वेळां ज्वारीचा घाटा करून प्यावा न् घरांत दिवा लावायला तेल नाहीं म्हणून रस्त्यावर येऊन बसावं! म्हणून तर संपाची भाषा बोलायला लागले आठ दिवसांच्या आंत कामगार-- ”

पण येसूचें लक्ष तिच्या बोलण्याकडे नव्हतें. ती आपल्याच विचारांत गर्क होती, ती मध्येंच म्हणाली--

“ तूं आज चौकशी कर कामावर गेल्यावर. मी येतें उद्यांपासून घडयांचं काम करायला. घरांत पैसा जास्त आला नाहीं, तर महागाईत निभायचं नाहीं आपलं या—”

“ तुम्ही कामावर जायची कांहीं गरज नाहीं इतक्यांत. अगदींच फाके पडायची पाळी आली तर पाहूं—”

चंदन इतका वेळ तो संवाद मुकाट्यानें ऐकत होती. पण, आपली आजी घडया करण्याच्या खात्यांत कामाला जाण्याच्या विचारांत आहे हें ऐकतांच ती एकदम मध्येंच म्हणाली--

“खरंच माय, मोठ्या मायनं मुळींच कामावर जायची गरज नाहीं. मी वाट-

ल्यास धरतें एकादी शिकवणी. आज मावशीला सांगून ठेवतें माझ्यासाठीं शिकवणी पहायला-- "

" तुझ्यापर्यंत नाहीं आल्या या गोष्टी अजून, चंदन ! न् आपल्या मावशीला कांहीं सांगूंहि नकोस तूं इतक्यांत ! सध्यां कोणीच कांहीं करायची गरज नाहीं. ही महागाई कशी काय टिकते तें पाहूं न् मग ठरवूं काय करायचं तें--"

रखमानें तिला सट्कन म्हटलें.

आईचे ते उद्गार ऐकून चंदन ओशाळल्यासारखी झाली.

तीन माणसांच्या त्या छोट्या कुटुम्बामध्यें सगळ्यांत जास्त खर्च तिचा होता. रखमानें तिच्या शिक्षणाला वेळोवेळीं विरोध केला होता, हें खरें. पण, आपल्या मुलीला इतर शाळकरी मुलींपेक्षां कपड्यालत्त्याच्या बाबतींत कोणत्याहि प्रकारची कमतरता असूं नये, म्हणून ती फार जपत असे. घरचा इतर सर्व बाजारहाट येसू-कडे होता. पण, चंदनसाठीं घ्यावयाची प्रत्येक वस्तु मात्र रखमा स्वतः तिच्याब-रोबर बाजारांत जाऊन तिला विकत घेऊन देत असे. तिचे लाड पुरविण्याच्या बाबतींत रखमानें पैशाकडे कधीं पाहिलें नाहीं. एकादे वेळीं येसू भारी कपडा विकत आणल्याबद्दल कुरकुरली, म्हणजे रखमा तिला म्हणे—

" आपण दोघी एवढे कष्ट करतों, ते हिच्याचसाठीं ना ? मग हिच्या साजरेपणाला शोभेल असा कपडालत्ता घेण्यासाठीं थोडा अधिक आगळा पैसा खर्च झाला म्हणून काय बिघडलं ?— "

गुलाबच्या नादानें चंदननें जेव्हां खादी वापरण्याचा हट्ट धरला, तेव्हां मात्र रखमानें थोडी कुरकुर केली. खादीचा महागपणा हा तर तिच्या दृष्टीनें एक दोष होताच; पण तें जाडें भरडें कापड आपल्या मुलीनें वापरावें, हेंहि तिला रुचेना. म्हणून चंदननें खादीभांडारांत जाण्याची गोष्ट काढतांच रखमा तिला म्हणाली—

" अग, गुलाबवन्संची देशभक्ति परवडण्यासारखी नाहीं आपल्याला. त्या आहेत कमावऱ्या. शिवाय त्यांना ना घर ना पोर. आपण गरिबांनीं गिरणीचाच कपडा वापरावा— "

पण चंदन त्यावर मुकाट्यानें एवढेंच म्हणाली—

" माय, तूं मला चाराच्या ऐवजी कमी किंमतीच्या दोनच साड्या घेऊन दे. मी गुलाबताईपाशीं खादी वापरायचं कबूल केलंय् न् तें मला पाळलंच पाहिजे— "

रखमानें तिच्या त्या बोलण्याकडे प्रथम दुर्लक्ष केलें. पण बर्डीवरल्या काप-

डाच्या दुकानांत गेल्यावर चंदन जेव्हां नेहमींप्रमाणें कोणत्याच कपड्यावर स्वतःचें मत देईना आणि कोणत्याहि प्रकारची उत्सुकताहि दाखवीना, तेव्हां रखमानें तिच्या त्या असहकाराचा अर्थ ओळखला आणि थोड्याशा वैतागानें तिला म्हटलें—

" बरं, चल बाई खादीभांडारांत न् घे तुला काय हवं तें. पण, लक्षांत ठेव, खादी वापरण्याच्या पलीकडे मात्र तुझ्या देशभक्तीचे चाळे गेलेले आवडायचे नाहींत मला— "

पण, सुरवातीला जरी रखमानें चंदनच्या खादीव्रताला अशा रीतीनें थोडा विरोध केला, तरी नंतर मात्र खादीचीं तऱ्हतऱ्हेचीं सुंदर पातळें आणि साड्या तिला घेऊन दिल्या. आपल्या मुलीच्या रूपाचा आणि बुद्धीचा तिला अभिमान होता; व त्या रूपाला आणि बुद्धीला शोभेल अशी तिची रहाणी असावी, याबद्दल रखमाचा मोठा कटाक्ष असे.

त्यामुळें तिचें तें तुटक उत्तर चंदनला अतिशयच लागलें आणि तिच्या मनांत आलें, आपली आजी आणि आई या आपल्याला विश्वासांत घेऊन बरोबरीच्या नात्यानें कधींच वागविणार नाहींत का ? दहा वर्षांपूर्वीं आपण नागपूरला आलों, त्या वेळीं आपल्याशीं वागण्याची त्यांची जी तऱ्हा होती, तीच आजहि कायम आहे. त्यांच्या दृष्टीनें अजूनहि आपण पोरच आहोंत आणि आपल्यासाठीं विचार करण्याची जबाबदारी सगळी त्यांच्यावरच आहे. आपल्याला आपल्या बुद्धीप्रमाणें आणि विचारांप्रमाणें वागण्याचें स्वातंत्र्य त्यांच्या हयातींत कधींच मिळणार नाहीं का ?

हिरा आणि अभिमन्यु हीं दोन्हीं भावंडें तिच्या मानानें कितीतरी स्वतंत्र होतीं. आपल्या जातीच्या हरएक चळवळींत हिरा भावाच्याबरोबर उत्साहानें भाग घेत असे. उलट रखमाची तिच्या प्रत्येक हालचालीवर सक्त नजर होती. त्यामुळें तिला राहून राहून वाटे, आपण जरी अवधूतला चळवळींत भाग घेण्याचें वचन दिलें असलें, तरी आपल्या हातून त्याला काय मदत होणार ?

पण, कोणत्याहि सामुदायिक चळवळीचा प्रारंभ हा पुराच्या सुरवातीला येणाऱ्या प्रचंड पाणलोटासारखा असतो. त्या पाणलोटाच्या तावडींत सांपडलेलें सगळें वस्तुजात जसें वाहून उध्वस्त होऊन जातें, तशीच अवस्था चळवळीच्या तडाक्यांत सांपडलेल्या व्यक्तींची, कुटुम्बांची आणि समाजाची होते.

युद्धाच्या पहिल्याच आठवड्यांत बाजारभाव जे कडाडले, ते खालीं उतरण्याचें

कांहींच चिन्ह दिसेना. कारकून, शिक्षक वगैरे श्रमजीवी पांढरपेशा वर्ग हा त्याहि अडचणीच्या स्थितींत डोळ्यांवर कातडें ओढून मुकाट्यानें संसार करीत राहिला. पण, विद्येच्या आणि तज्जन्य खोटया सभ्यतेच्या संस्कारांपासून सुदैवानें अलिप्त असलेले सगळे खालच्या वर्गांतले आणि जातींतले लोक हे मात्र गप्प बसले नाहींत. त्यांची कमाई मूळांतच इतकी कमी होती कीं, महागाईमुळें त्यांना शरीर आणि प्राण हे एकत्र ठेवणें, त्यांची एकमेव संपत्ति जें कष्ट करण्याचें बळ तें रोजच्या रोज ताजें-तवानें जरी नव्हे तरी कायम ठेवणें कठीण होऊं लागलें; व त्यांना महागाईविरुद्ध निकराची उठावणी करण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं.

समाजाच्या सगळ्या खालच्या थरांत धुमसणाऱ्या या असंतोषाचा कामगारांच्या चळवळीच्या रूपानें प्रथम स्फोट झाला.

कारण, समाजांतील इतर कोणत्याहि श्रमजीवी वर्गापेक्षां गिरणी-कामगार हे संघटित होते आणि झगडण्याच्या कलेंतहि मुरलेले होते. कोणताहि अन्याय मुकाट्यानें सोसण्याची जी सामान्यतः लोकांची वृत्ति, ती सतत कराव्या लागणाऱ्या झगडयामुळें त्यांच्यांतून नष्ट झाली होती; व आर्थिक समतेच्या युयुत्सु तत्त्वज्ञानाचा उद्घोष कानांवर पडून भविष्याविषयींच्या अदम्य आशेचा जोष त्यांच्या जीवनांत संचरलेला होता. त्यामुळें युद्ध सुरू झाल्याबरोबर पहिल्या पंधरा दिवसांतच गिरणीकामगारांनीं महागाईचा प्रश्न ईर्ष्येनें हातीं घेतला.

पण या वेळीं त्यांचा मार्ग नेहमीं इतका सुकर मात्र नव्हता. कॉंग्रेस मंत्रिमंडळें अद्याप अधिकारारूढ होतीं; व कामगारांचें हित करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत फारसें नाहीं हें जरी गेल्या दोन अडीच वर्षांच्या अनुभवानें कळून चुकलें होतें, तरी युद्धामुळें आधींच बिकट झालेली त्यांची परिस्थिति अधिक बिकट करावी, असें कामगारांनाहि वाटत नव्हतें. त्यामुळें महागाईच्या मागणीला तोंड फुटलें, पण जोर मात्र येईना.

युद्धामुळें गिरण्यांचें काम एकदम दुपटी तिपटीनें वाढलें; सर्वच भांडवलवाल्यांना लहानमोठीं कंत्राटें मिळालीं; व मंदीनें ग्रासलेल्या बाजार पेठेला एकाएकीं तेजी आल्यासारखें दिसूं लागलें. पण कारखान्यांचें काम वाढलें, तरी कामगारांना भत्ता मिळेना; धान्याचे भाव वाढले, तरी शेतकऱ्यांना नफा पडेना; व देशांत नवे धंदे सुरू झाले, तरीं सुशिक्षित वर्गाची बेकारी हटेना.

असंतोषानें आंतल्या आंत धुमसत असलेल्या या सगळ्या वर्गांच्या लढ्याची आघाडी गिरणीकामगारांनीं मोठ्या धडाडीनें उघडली.

अवधूतनें त्या चळवळींत उत्साहानें भाग घ्यावयाला प्रारंभ केला. पण, ही चळवळ गिरणीकामगारांपुरतीच मर्यादित न रहातां, समाजांतले सगळे श्रमजीवी वर्ग तिच्यांत सामील करून घेतल्याशिवाय तिला प्रभावी स्वरूप येणार नाहीं, हें त्याच्या लक्षांत आलें; व म्हणून नागपूर शहरांत आणि प्रान्तांत सर्वत्र हिंडून त्यानें निरनिराळ्या प्रकारच्या कामगारांची एकमुखी मागणी तयार करण्याचा निश्चय केला. सुशिक्षित कारकुनापासून तों निरक्षर मेहनतरापर्यंत श्रमजीवी वर्गांत नाना तऱ्हेचे थर होते. पण, बाजारभावांत झालेल्या वाढीचें प्रमाण लक्षांत घेऊन, त्या प्रमाणांत या सर्व श्रमजीविकांना महागाई भत्ता मिळवून देण्यासाठीं एकमुखी मागणी तयार करणें अशक्य नव्हतें. अवधूतनें प्रथम तें काम हातीं घेतलें.

पण, महागाईविरुद्ध गिरणीकामगारांनीं केलेल्या या उठावणींत निरनिराळ्या प्रकारच्या मजुरांबरोबर कारकून, प्राथमिक शिक्षक वगैरे पांढरपेशा श्रमजीविकांनाहि सामील करून घेण्याची ही अवधूतची कल्पना अभिमन्यूला मुळींच पसंत पडली नाहीं. त्या कल्पनेवर जेव्हां त्यानें टीका केली, तेव्हां अवधूत त्याला म्हणाला—

" तूं या प्रश्नाकडे सुद्धां इतक्या कोत्या दृष्टीनं पहाशील अशी कल्पना नव्हती मला—— "

" माझी दृष्टि कोती कीं तुझी दृष्टि कोती, अवधूत ? आज जर सगळ्यांत जास्त पिळणूक कोणत्या वर्गाची चालली असेल, तर ती कामगारांची. कारकून किंवा शिक्षक यांची खात्रीनं नव्हे. पण तुझ्या पांढरपेशा दृष्टीला कामगारांइतकाच कारकून न् शिक्षक यांचाहि प्रश्न निकडीचा वाटतो— "

" हो. कारण मला माहित आहे कीं, कांहीं कारकुनांना आणि प्राथमिक शिक्षकांना कामगारांइतकंसुद्धां वेतन मिळत नाहीं. शिवाय या आर्थिक लढ्यांत जितके जास्तींत जास्त लोक ओढतां येतील, तितका त्याला जोर चढेल हें विसरूं नकोस तूं—"

" मला जी आवडत नाहीं, ती हीच गोष्ट. तुम्ही पांढरपेशे पुढारी प्रत्येक प्रश्नाकडे राजकीय दृष्टीनें पहातां, प्रत्येक चळवळीचा उपयोग राजकीय प्रक्षोभ वाढविण्यासाठीं करतां—"

" कारण आर्थिक आणि राजकीय प्रश्न एकांत एक गुंतलेले आहेत. तूं या प्रश्नाकडे पाहतांना थोडी सुद्धां व्यापक दृष्टि चालवूं नयेस, याचं नवल वाटतं मला–"

" नवल कसलं झालं आहे त्यांत ? मी फक्त आमच्या जातीच्या हिताच्या दृष्टीनं विचार करतों या सगळ्या गोष्टींचा. मला मुळींच कर्तव्य नाहीं तुमच्या कोणत्याच लढ्याशीं—"

" खरोखरी लाज वाटली पाहिजे तुला अशा रीतीनें बोलायची, अभि—"

अवधूत एकदम रागानें म्हणाला. त्याबरोबर अभिमन्यूनें त्याला चिडून म्हटलें–

" मला लाज कां वाटेल ? ' महार मेला न् विटाळ गेला ' अशा वृत्तीनं आमच्याकडे पहाणारे तुम्ही !–तुम्हांला काय हक्क आहे तुमच्या राजकीय लढ्यांत आम्हीं तुमच्या खांद्याला खांदा भिडवून उभं रहावं अशी अपेक्षा करण्याचा ? बाटून परधर्मांत जाणारा प्रत्येक अस्पृश्य हा आपल्या धर्माचा, संस्कृतीचा आणि देशाचा कमी अधिक प्रमाणांत शत्रु होतो ही साधी गोष्ट ज्यांच्या मुर्दाड बुद्धीला उमजली नाहीं, त्या स्पृश्य हिंदूंनीं आतां पाकिस्तानच्या मागणीबद्दल मुसलमानांच्या नांवानं खडे कां फोडावेत ! अल्पसंख्यांचा प्रश्न हा ब्रिटिशांच्या भेदनीतीनं उत्पन्न केलेला नाहीं, अवधूत. तुम्हां हिंदूंच्या स्पृश्यास्पृश्यतेच्या कर्मकांडांतून, जातिभेदाच्या कल्पनांतून पैदा झालेला आहे तो ! उद्याच्या हिंदी राष्ट्रांतलं आमचं स्थान न् दर्जा जोंपर्यंत निश्चित होत नाहीं, तोंपर्यंत आपल्या जातीच्या हितसंबंधांच्या दृष्टीनंच आम्ही पहाणार प्रत्येक प्रश्नाकडे—"

" मग त्यामुळं देशाचं कितीहि नुकसान झालं तरी त्याची पर्वा नाहीं तुम्हांला ?-- "

" देश ? कोणाचा देश ? आम्हां अस्पृश्यांच्या लेखीं देश ही चीजच नाहीं मुळीं. मुसलमान जसे फक्त धर्म जाणतात, तसे आम्ही फक्त जात जाणतों. ज्यांना देश असेल, त्यांना त्या देशाबद्दल अभिमान वाटणार कीं नाहीं ! देशाभिमान म्हणजे कांहीं नुसत्या जमिनीचा, नुसत्या मातीचा अभिमान नव्हे. मनुष्य एखाद्या भूमिभागावर स्वतःचा देश म्हणून जें प्रेम करतो, त्या भूमीविषयीं त्याला जो अत्यंत अभिमान वाटतो, तो त्या भूमींत त्याच्या हितसंबंधांचीं पाळेंमुळें खोल गेलेलीं असतात, त्याच्या संस्कृतीचा विकास पिढ्या न् पिढ्या होत आलेला असतो, त्याच्या स्वत्वाचें ती भूमि माहेरघर बनलेली असते, म्हणून वाटतो. तसा अभिमान

हिंदुस्थानाविषयीं आम्हांला वाटावा, असं काय शिल्लक ठेवलंय तुम्ही आमचं इथं ?— ”

“ मग अग्रजन्माचा हक्क सिद्ध करण्याचा खटाटोप सोडून दे तूं आजपासून, अभि— ”

“ छे, तो सोडण्याचं कारण नाहीं मुळींच. त्या अग्रजन्माच्या हक्कावर आमचं भावी अस्तित्व, आमचं राजकीय आणि सांस्कृतिक भवितव्य अवलंबून आहे. तुम्ही तो हक्क ज्या क्षणीं मान्य कराल, त्या क्षणीं तुमच्या खांद्याला खांदा भिडवून उभे राहूं आम्ही. हिंदुस्थानाच्या आजच्या अधोगतीला कारण खरोखरी तुम्ही वरिष्ठ जातीचे हिंदु आहांत. तुमचीं कर्मं इतकीं अघोर आहेत कीं, केशवसुतांनीं

गत शतकांचीं पापें घोरें
क्षालायाला पाहिजेत रे तुमचीं रुधिरें

असें जें तुमच्याविषयीं म्हटलंय तें अक्षरशः खरं वाटतं मला. त्या पापांचं प्रायश्चित्त तुम्ही पुरेपूर भोगाल, त्याच वेळीं हा देश पारतंत्र्यांतून मुक्त होईल— ”

“ हिंदूंच्या विरुद्ध तूं जें जें काय बोलशील, तें तें सगळं मान्य आहे मला, अभि. तरीसुद्धां तुझी ही जातीय दृष्टि कांहीं पसंत नाहीं मला. विशेषतः महागाई-सारख्या सर्वस्वी आर्थिक प्रश्नांत तूं जात आणावीस हें दुर्दैव आहे खरोखरी— ”

पण अभिमन्यूनें आपला मुद्दा सोडला नाहीं. महागाईच्या लढ्याकडे पाहण्याची त्याची दृष्टि दुहेरी होती. एक तर, कामगारांना महागाई भत्ता मिळाल्यास आपल्या जातीच्या लोकांचा तितकाच फायदा होईल असें त्याला वाटे; व दुसरें या चळवळीमुळं कॉंग्रेस मंत्रिमंडळाविरुद्ध म्हणजेच राष्ट्रसभेविरुद्ध खालच्या सर्वच वर्गांत आणि जातींत प्रचार करितां येतो, हा फायदा त्याच्या मतें जास्त महत्त्वाचा होता. त्याचें हें धोरण अवधूतच्या ध्यानांत येतांच त्याच्या मनाचा पराकाष्ठेचा विरस झाला. पण त्यानें अभिमन्यूला पुन्हा कधीं त्या बाबतीत छेडलें नाहीं; व त्याच्यापासून जें काय सहकार्य मधून मधून मिळे, तेवढ्यावर तो समाधान मानीत असे.

पण हिराची दृष्टि आपल्या भावापेक्षां जास्त व्यापक होती. साहित्य हा विषयच मुळीं असा आहे कीं, त्या विषयाची गोडी असलेली व्यक्ति ही जाति, धर्म, राष्ट्र आणि पक्ष यांच्याहून उच्च आणि अतीत असलेल्या कलानंदाचा आस्वाद मानवतेच्या विशुद्ध जाणिवेनें घेऊं शकते. हिराच्या ठिकाणीं जातिनिष्ठेपेक्षां कला-

सक्ति अधिक उत्कट होती; व त्यामुळें जातीय चळवळीकडेहि कलादृष्टीनें पाहून तिनें अस्पृश्यांच्या प्रश्नावर सुंदर ललित लेखन केलें होतें. कामगारांच्या वस्तीत ती अवधूत आणि चंदन यांच्याबरोबर पुष्कळदां फिरत असे. त्या फिरतीत पाहिलेल्या दृश्यांवर 'भुकेची हांक' या मथळ्याखालीं तिनें लहान लहान शब्दचित्रें लिहून तीं निरनिराळ्या साप्ताहिकांतून द्यावयाला प्रारंभ केला होता.

चंदननें जेव्हां एक दिवस त्या शब्दचित्रांची फार तारीफ अवधूतजवळ केली, तेव्हां तो हंसत हंसत हिराला म्हणाला--

"तूं लिहितेस सुंदर याबद्दल वाद नाहीं, हिरा. पण तुझीं हीं नाजूक शब्दचित्रें लोकांच्या मनांत चीड किंवा द्वेष उत्पन्न करण्याऐवजीं त्यांना फार तर रडायला लावतील; व सारखे नाकडोळे पुशीत रहाण्यापलिकडे त्यांच्या हातून कांहीं घडणार नाहीं— "

"बरोबर बोललास तूं, अवधूत! न् त्यांतल्या त्यांत तूं बोललास म्हणून कांहीं तरी हिला पटेल तें! मी हिला नेहमीं सांगतों कीं, दलितांच्या उद्धाराची तळमळ ज्याला लागली आहे, त्याची लेखणी आगरकरांसारखी हवी. त्या लेखणींतून उतरलेला लेख वाचल्यावर माणूस हातांत असेल तें शस्त्र घेऊन बंड करायला उठला पाहिजे. पण हिचं आपलं सगळं लिहिणं पहावं तर लिबलिबीत न् रडवं-- "

अभिमन्यूनें मध्येंच म्हटलें. त्याच्या त्या भडिमारानें हिरा खट्टू झाली; व चंदनला आपण उगाच तो विषय काढला असें वाटलें. म्हणून ती थोडीशी रागानेंच अवधूतला म्हणाली--

"मग तुम्ही स्वतःच लिहून दाखवा हिला एकदां म्हणजे ती तसं लिहीत जाईल— "

"हो. माझी तयारी आहे तुमचं शिष्यत्व पत्करायची. पण नुसती टीका मात्र ऐकून घ्यायला तयार नाहीं मी तुमची-- "

"स्वयंपाक बिघडला म्हटल्याबरोबर तुम्हीच स्वयंपाक करून दाखवा असं सांगण्यासारखं बोलणं आहे हें हिरा, तुझं. छे बुवा, तुम्ही साहित्यिक टीकेच्या बाबतींत फारच हळवे असता—"

"त्याचें कारण आहे. साहित्यिकांनीं कसंहि लिहिलं, तरी तुमचीं तोंडं उघडतात तीं त्यांना नांवं ठेवण्यासाठींच उघडतात— "

“ मग साहित्यिकांनीं लिहिणं सोडून देऊन अशा कृतघ्न जगाला धडा कां शिकवूं नये ?—— ”

अवधूतनें तिला हंसत हंसत विचारलें.

“ पण आम्ही जगासाठीं लिहितों असं का समजता तुम्ही ?—— ”

“ माझी आपली अशी समजूत होती कीं, साहित्यिक जें लिहितात, तें जगावर उपकार करायला लिहितात. पण, तुझ्या बोलण्यावरून आतां असं दिसतं कीं, तें केवळ स्वतःसाठीं लिहितात— ”

“ हो. तसंच समजा तुम्ही— ”

“ तरीच. मग खरोखरीच तुम्हांला लिहूं नका किंवा अमूकच लिहा असं सांगण्याचा कांहीं हक्क नाहीं आम्हांला—— ”

“ खरोखरीच नाहीं. लिहिणं ही साहित्यिकाची प्रकृति आहे आणि ती प्रकृति समाजनिरपेक्ष आहे—— ”

“ तें दिसतंच आहे. एरवीं समाज इतक्या दैन्यावस्थेंत आपल्या अस्तित्वासाठीं झगडत असतां साहित्यिक आत्मतृप्तीच्या कथा–कादंबऱ्या कां लिहीत बसते ? माझ्या मनांत केव्हां केव्हां एक अगदीं मजेदार कल्पना येते आपल्या साहित्यिकांची ही समाजनिरपेक्ष, आत्मतृप्त वृत्ति बघितल्यावर— ”

“ समजूं द्या तरी एकदां आम्हांला एवढी कसली मजेदार कल्पना आहे तें— ”

“ ती कल्पना अशी कीं, प्रळयकाळाच्या वेळीं सर्व सृष्टि पाण्यांत बुडून गेल्यावर भगवान् जेव्हां वडाच्या पानावर बालरूप धारण करून आपला आंगठा चोखीत सृष्टीच्या पुनरुज्जीवनाचं चिंतन करीत राहील, तेव्हां त्याच्या पायापाशीं एका कोपऱ्यांत आसनमांडी घालून एकादा साहित्यिक त्या प्रळयकाळाचं वर्णन लिहीत बसायचा— ”

“ कांहीं वाईट नाहीं ही कल्पना तुमची, अवधूत! साहित्यिक कोणत्याहि परिस्थितींत इतक्या स्थिरबुद्धीनं आपलं लेखनकर्तव्य करतात, म्हणूनच जगाला प्रत्येक महनीय घटनेचे इतिहास वाचायला मिळतात न् भावी पिढ्यांनाहि स्फूर्ति घेतां येते त्या इतिहासापासून. तुम्ही राजकारणांत पडलेले लोक खरोखरीच अगदीं अरसिक आणि कृतघ्न आहांत, अवधूत! तुमच्या कार्याच्या प्रसारार्थ आम्ही आपल्या लेखणीचा जो उपयोग करतों, त्याची कांहीं परवा नाहीं तुम्हांला— ”

तिनें तो आरोप करतांच इतका वेळ गंमतीनें त्यांचा वाद ऐकत असलेला अभिमन्यु मध्येंच म्हणाला—

" परवा नाहीं त्याचं कारण आहे, हिरा. मराठी वाङ्मय हें फक्त पांढरपेशा मध्यम वर्ग वाचतो; व त्या वाङ्मयांत प्रतिबिम्बहि बव्हंशीं त्याच्याच जीवनाचं पडलेलं असतं. महाराष्ट्रांतील बहुजनसमाज सारा सामान्यतः निरक्षर आहे. त्याच्यापर्यंत तुमचं वाङ्मय पोंचत नाहीं आणि त्याला त्या वाङ्मयांत गोडीहि वाटत नाहीं. कॉलेजांतले विद्यार्थी, सुशिक्षित स्त्रिया आणि वरच्या जातींतील शिक्षक, कारकून वगैरे लोक यांच्या पलीकडे वाचक नाहींत तुमच्या मराठी साहित्याला— "

अभिमन्यूनें केलेली मराठी वाङ्मयाच्या वाचकवर्गाची ती छाननी कडू खरी पण अगदीं समर्पक होती. त्यामुळें हिरा गप्प बसली. तेव्हां तिची उतरलेली चर्या पाहून अवधूत म्हणाला—

" त्याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं, साहित्यिकांकडून होत असलेल्या बौद्धिक सहाय्याची आम्हांला कांहीं जाणीव किंवा परवा नाहीं. निरक्षरता आणि जातिभेद यांच्यामुळं वाङ्मयाच्या उपयुक्ततेला आणि प्रसाराला अतिशय मर्यादा पडल्या आहेत, एवढंच फक्त आम्हांला म्हणायचं. शिवाय, साहित्यिक जोंवर निव्वळ भूतदया आणि सुधारणा यांवरच भर देत रहातील, तोंवर समाजांत क्रांतीला अवश्य असलेली ईर्ष्या उत्पन्न करण्यचं प्रभावी कार्य त्यांच्या हातून होणं अशक्य आहे असं नाहीं वाटत तुला? साहित्यिक हा नुसता अखबारनवीस असून भागणार नाहीं; नुसता प्रेक्षक, नुसता कथक असून चालणार नाहीं. मी त्याच्याकडे क्रांतीचा अग्रदूत, भविष्याचा द्रष्टा म्हणून पहातों— "

पण हिरा काहीं बोलली नाहीं. तेव्हां चंदननें त्याला विचारलें—

" पण प्रत्येक शिपाई हा सेनापति व्हावा अशी अपेक्षा करणं जितकं चुकीचं आहे, तितकंच प्रत्येक साहित्यिक हा द्रष्टा व्हावा अशी अपेक्षा करणंहि चुकीचं नाहीं का, अवधूत?— "

" खरं आहे तुझं म्हणणं. पण माझ्या भोंवतालच्या प्रत्येक माणसानं सेनापति व्हावं असं वाटतं मला. आपला हा देश म्हणजे अशोधित संपत्तीचं, असंस्कृत मानवतेचं आणि असंघटित सामर्थ्याचं निधान आहे खरोखरी. ही गोष्ट लक्षांत घेऊन जर आपल्यांतल्या प्रत्येक विचारी माणसानं स्वतःचं कर्तव्य केलं, तर

रशियासारखं समर्थ राष्ट्र निर्माण करूं शकूं आपण या भरतखंडांत. सामान्य माणसाच्या डोळ्यांना न दिसणारी आणि बुद्धीला न उमगणारी भरतखंडांतल्या या मानवतेच्या खाणींतली अज्ञात संपदा आणि असंघटित शक्ति साहित्यिकांनीं लोकांच्या निदर्शनाला आणून द्यायला नको का? यापेक्षां मला जास्त अपेक्षा नाहीं त्यांच्याकडून— ''

त्याच्या त्या कळकळीच्या बोलण्याचा परिणाम त्या दोघींच्या मनावर फार झाला.

चंदनच्या ठिकाणीं अभिमन्यूप्रमाणें जातीची जाणीव यत्किंचित्‌हि नव्हती किंवा हिराप्रमाणें साहित्याचीहि अभिरुचि नव्हती. मिशनच्या वातावरणांत वाढल्यामुळें कोणत्याहि प्रकारच्या दैन्याकडे शुद्ध मानवतेच्या दृष्टीनें पहाण्याची तिला संवय झाली होती. त्यामुळें अभिमन्यु आणि हिरा या दोघांपेक्षां तिचें सहकार्य त्याला जास्त जास्त लाभत गेलें; व आजपर्यंत फक्त कॉलेजांतल्या विद्यार्थ्यांना माहित असलेलें त्या दोघांचें साहचर्य आतां बाहेरल्या जगाच्याहि डोळ्यांत भरूं लागलें.

चंदनला त्याच्याबरोबर बाहेरगांवीं जाणें अर्थातच शक्य नव्हतें. पण, त्यानें गोळा केलेल्या माहितीवरून पद्धतशीर योजना तयार करण्याच्या, नागपुरांत वेळोवेळीं भरणाऱ्या सभांचे कार्यक्रम वगैरे ठरविण्याच्या आणि कामगार स्त्रियांत प्रचार करण्याच्या कामीं ती त्याला शक्य ती मदत करीत असे. त्यामुळें पुष्कळदां तीं दोघें पांच पांच सहा सहा तास एकत्र बोलत, फिरत किंवा काम करीत असत.

पण तो त्यांचा वाढता सहवास, सर्वांच्या डोळ्यांवर झपाट्यानें येत असलेलें तें त्यांचें साहचर्य त्या दोघांनाहि जितकें मधुर तितकेंच भयप्रद वाटत होतें. चंदन कोणत्याहि जाहिर सभेला सहसा त्याच्याबरोबर जात नसे. कारण आपली आई सभांना कधीं हजर रहात नाहीं हें जरी तिला माहीत होतें, तरी तिला वाटे, न जाणों आपण एखाद दिवशीं सभेला जावयाला आणि नेमक्या त्याच सभेला हजर रहाण्याची बुद्धि आईला व्हायला एक गांठ पडायची. तिच्या कानांवर अवधूतचें नांव आलें आहे कीं नाहीं, हें तिच्या तोंडून काढून घेण्याचा प्रयत्न जेव्हां चंदननें केला, तेव्हां तिला समजलें कीं, त्याचं नांव जरी आपल्या आईनं वारंवार ऐकलें असलें, तरी तो चंदनवाडीच्या देशपांड्यांचा मुलगा आहे, हें मात्र तिला अद्याप कळलेलें किंवा तिच्या मनांत आलेलें नव्हतें.

पण चंदनला सारखें असें वाटे कीं, एखादे दिवशीं जर तो चुकून म्हणा किंवा

निकडीच्या कामासाठीं म्हणा आपल्या घरीं आला, तर केवढा अनर्थ होईल ? तो विचार मनांत येतांच ती अगदीं भयभीत होऊन जात असे.

अवधूतच्या मनांतली भीति मात्र अगदीं निराळ्या प्रकारची होती.

चंदनची बुद्धिमत्ता आणि कार्यनिष्ठा जों जों त्याच्या अनुभवाला येई, तों तों त्याला वाटे, हिच्या साहचर्याविषयीं आपल्या मनांत उत्पन्न झालेली आसक्ति कधीं तरी सफल होण्याचा संभव आहे का ? आपली मिळकत ऋणमुक्त होण्याच्या दृष्टीनें दादासाहेब त्याचें लग्न मोंगलाईतील एका जहागिरदाराच्या मुलीशीं जमविण्याच्या खटपटींत असल्याचें त्याला माहित होतें; व म्हणून त्यानें, मला तूर्त लग्नच करायचें नाहीं, अशी नकाराची भाषाहि आईजवळ बोलून ठेविली होती. अशा स्थितीत चंदनच्या मोहामुळें जर उद्यां आपण तिच्याशीं लग्न करायचें ठरवलें, तर आईला काय वाटेल, दादा काय म्हणतील ? तिच्याशीं लग्न करून आपण जातकुळी बाट-वली असें त्यांना वाटेल आणि त्यांच्या उतारवयांत आपण त्यांना कायमचे पारखे होऊन बसूं.

त्यापेक्षां आपण तिच्याविषयींचा हा मोहपाश वेळींच तोडून टाकलेला काय वाईट ! गांधी, नेहरू आणि बोस हे आधुनिक भारताचे तिघेहि नेते जसे स्त्री-प्रेमापासून अलिप्त आहेत, तसें आपणहि राहण्याचा प्रयत्न कां करूं नये ? आईला आणि वडलांना त्यांच्या विपत्काळांत हताश करण्यापेक्षां आपण आपल्या हृदयां-तला हा कोंवळा प्रेमांकुर खुडून टाकणेंच अधिक इष्ट होणार नाहीं काय ?

पण, हा प्रश्न जितका आपला, तितकाच चंदनचाहि नाहीं का ? राजकारणाकडे यत्किंचित्‌हि कल नसतांनासुद्धां ती केवळ आपल्या शब्दाखातर आज चळवळींत भाग घेत आहे. अशा रीतीनें तिला चळवळींत ओढल्यानंतर आतां तिचा संबंध तोडून टाकणें हें कृतघ्नपणाचें होणार नाहीं का ? आई आणि वडील यांच्या आपल्या-वर केवढ्याहि आशा असल्या, तरी त्या आशा आपल्या एकाद्या शब्दानें किंवा कृतीनें आज ना उद्यां धुळीला मिळावयाच्या आहेत, हें त्याला दिसत होतें. किंबहुना, वर्धा मिल्सच्या संपांत ज्या दिवशीं त्यानें भाषण केलें, त्या दिवशींच त्यांचीं मनोराज्यें पूर्ण करावयाला अवश्य असलेली मनोवृत्ति आपल्या ठिकाणीं नाहीं, याची त्याला जाणीव झाली होती. तेव्हां त्यांची निराशा ही ठरलेलीच आहे. मग निष्कारण चंदनची तरी प्रतारणा आपण कां करावी ?

तिच्या आणि आपल्या साहचर्याचा बोभाटा दादासाहेबांच्या कानांवर गेला

असावा, अशी शंका त्याला येण्यासारखा एक प्रसंग नुकताच घडला होता. हैद्राबादहून आलेला त्या जहागिरदाराच्या मुलीचा फोटो दादासाहेबांनीं दिवाणजींबरोबर मुद्दाम त्याच्याकडे पाठविला. पण त्यानें तो उघडूनहि न पहातां परत केल्यामुळें ते अतिशय संतापले आणि त्याला ऐकूं जाईल अशा रीतीनें उद्गारले—

" चांगली आब ठेवतोस म्हणावं वडीलमाणसांची ! अशा मोठ्या घराण्यांतल्या मुलीचा फोटो जर त्याला पाह्यचा नाहीं, तर काय एकाद्या मजुराच्या मुलीशीं लग्न करणार आहे का तो ? तसं करणार असशील, तर सांगून टाक म्हणावं आत्तांच. म्हणजे आम्ही उद्यांच काशीयात्रेला जायचं प्रस्थान ठेवतों. तसलं कांहीं पाह्यचा न् ऐकण्याचा प्रसंगच नको मुळीं-- "

त्यांचे ते उद्गार ऐकल्यापासून चंदन आपल्याकडे आली, तरी ती त्यांच्या दृष्टीस पडूं नये, म्हणून तो विशेष काळजी घेत असे. कॉलेजांतल्या साऱ्या संस्थांशीं आणि चळवळींशीं त्याचा निकट संबंध असल्यामुळें अनेक मुली त्याच्याकडे नेहमीं येत. त्यामुळें चंदनचें त्याच्याकडे येणें जरी अलिकडे वाढलें होतें, तरी तें घरीं कोणाच्या लक्षांत आलें नाहीं. तरीसुद्धां ती आपल्याकडे आलेली घरांत कोणाला कळूं नये, म्हणून तो शक्य तितकी सावधगिरी घेत असे.

पण आपल्या मनांतलें हें शल्य चंदनला सांगून तिला सावध करण्याचा विचार मात्र त्याच्या मनांत कधींच आला नाहीं. उलट, आपल्या घरीं ती अलिकडे बरीच येऊं लागली असतां, ती स्वतःच्या घरीं मात्र आपल्याला चुकूनहि कधीं बोलावीत नाहीं, याचें त्याला नवल वाटे.

म्हणून एक दिवस नागपूर मिलसच्या समोरल्या पटांगणांत सायंकाळीं कामगारांची सभा भरावयाचें ठरलें असतां त्यानें तिला म्हटलें—

" आजच्या सभेला हजर राहून तूं बोललं पाहिजेस, चंदन. तुझ्या घराच्या अगदीं जवळ आहे सभा. तूं जर आली नाहींस, तर मी घरीं येईन तुझ्या न् घेऊन जाईन तुला— "

" तुम्हांला मी सांगितलं आहे ना एकदां मी कामगारांच्या सभेंत कधीं बोलणार नाहीं म्हणून ? ती अट घालून तर मी काम करतें आहे तुमच्याबरोबर. मग तुम्ही आज हा भलताच आग्रह का करतां आहांत मला ?— "

" पण तूं सभेला हजर तरी रहाशील ?— "

" नाहीं. आजच्या सभेला तर मुळींच येणार नाहीं-- "

" कां बरं ?-- "

" माझ्या आईला आवडणार नाहीं ती गोष्ट, अवधूत— "

" तूं चळवळींत भाग घेतेस, हें तरी आवडतं कां तिला ?-- "

" तें तिच्या कानांवर फारसं गेलेलं नाहीं अद्याप— "

" आणि गेलं तर ?— "

" ज्या दिवशीं तें तिच्या कानांवर जाईल, त्या दिवशीं माझा आणि चळवळीचा संबंध तुटलेला दिसेल तुम्हांला— "

" तुला स्वतःपेक्षां, स्वतःच्या हितापेक्षां आणि ध्येयापेक्षां आईच्या कोत्या कल्पनांचं महत्त्व जास्त वाटतं कां चंदन ?— "

" नाहीं. तिच्या कोत्या कल्पनांचं महत्त्व नाहीं जास्त वाटत. पण, तिनं मला वाढविण्यासाठीं, माझ्या शिक्षणासाठीं रक्ताचं पाणी केलंय आपल्या. त्यामुळं तिच्या उतारवयांत तिच्या मनाला दुःख होईल असं आपल्या हातून कांहीं घडावं असं वाटत नाहीं मला. मी तिची एकुलती एक मुलगी आहे, अवधूत--"

" मीहि माझ्या वडलांचा एकुलता एक मुलगा आहे, चंदन--"

त्यानें हंसून म्हटलें.

ती कांहीं बोलली नाहीं. पण तिच्या त्या मूकतेंत कांहीं तरी गाढ भावना ओथंबलेली आहे असें त्याला वाटलें आणि त्यानें आश्चर्यानें तिच्याकडे पाहिलें.

त्याच्या दृष्टीला तिची दृष्टि भिडतांच तिच्या डोळ्यांतले आवरलेले अश्रु एकदम गालावर ओघळले.

" चंदन, चंदन, हें काय हें ?--"

त्यानें एकदम तिचा हात धरला आणि म्हटलें.

" मी तुझ्या आईला भेटून समजावून सांगेन सगळी परिस्थिति. माझी खात्री आहे तिला माझं बोलणं पटल्याशिवाय रहाणार नाहीं--"

" नाहीं, नाहीं अवधूत, ती गोष्ट कधींहि घडतां कामा नये. तुम्ही कधींहि येतां कामा नये माझ्या घरीं, कधींहि भेटतां कामा नये माझ्या आईला--"

तिनें त्याच्या हातांतून आपला हात सोडवून घेऊन एकदम आवेशानें म्हटलें.

# सुखाचे दिवस संपल्याची जाणीव

## १५

" आज देशपांड्यांचा मुलगा सभेंत बोलला, सासूबाई—"

" तूं आपल्या डोळ्यांनीं पाह्यलास त्याला ?—"

भाकरी थापीत असलेल्या येसूनें चुलींतलीं लांकडें चटकन बाहेर ओढून आश्चर्यानें रखमाला विचारलें.

आणि आईशेजारीं बसून मुकाटयानें जेवीत असलेल्या चंदनच्या हातांतला घांस हातांतच राहिला.

" हो. आमच्या मिलसमोरच सभा होती आज—"

" पण तो दादासायबांचाच मुलगा कशावरून ? आपण त्याला दहा बारा वर्षांत पाह्यलेला नाहीं. दुसरा कोणी देशपांडे असेल. आपल्या वऱ्हाडांत गांवगन्ना देशपांडे आहेत—"

" नाहीं. दादासायबांचाच मुलगा आहे तो. हुबेहूब त्यांच्यासारखा आहे दिसायला. उद्यां जर तो दारांत येऊन उभा राह्यला, तर तुम्हांला वाटेल पुन्हा तरणे जवान झालेले दादासायबच येऊन उभे राह्यले आहेत आपल्यापुढं—"

येसू क्षणमात्र स्तब्ध होती. नंतर तिनें विचारलें—

" मग बापासारखाच साजरा न् उंचनिंच असेल नाहीं ?—"

" हो. तो उभा राह्यलाबरोबर ओळखला बघा मी त्याला. बोलतोहि छान—"

तेवढे शब्द उच्चारून खालीं मान घालून जेवीत असलेल्या चंदनला रखमानें विचारलें—

" तूं ओळखतेस कां चंदन त्याला ?—"

आईचा तो प्रश्न ऐकतांच चंदनला एकदम ठसका लागला.

त्याबरोबर येसू कळवळून म्हणाली—

" जेवतांना सुद्धां तुझी घाई, पोरी! वाघ लागला आहे जसा पाठीमागं. आतांशा सकाळीं नवाला जी घरांतून बाहेर पडते, ती दिवस बुडण्याच्या वेळेला परत येते घरीं. कुठें जाते न् काय करते परमेश्वराला माहीत. वर पाहून पाणी पी बेटा म्हणजे बसेल ठसका-- "

तिचा ठसका पुरता थांबतांच रखमानें पुन्हा विचारलें—

" तूं ओळखतेस कां त्याला, चंदन ?— "

" हो. मी सभांतून बोलतांना पाह्यलंय त्यांना-- "

चंदननें वर न पहातां उत्तर दिलें.

" कुठल्या सभेंत ? तूं तर जात नाहीं म्हणतेस कामगारांच्या सभाबिभांना कधीं— "

" नाहीं. आमच्या कॉलेजांतल्या सभांतून— "

" तुझ्याच कॉलेजांत आहे तो देशपांड्यांचा मुलगा, पोरी ?-- "

येसूनें फुललेल्या रसरशीत निखाऱ्यावरली फुगीर भाकरी तिच्या ताटांत टाकीत अभिमानानें आनंदून विचारलें.

" नको, नको माय मला! तूं विचारल्याशिवाय वाढीत रहातेस आपल्या मनाला येईल तें— "

" नको असायला काय झालं ग? नुसता पहिला भात खाऊन पोट भरलं कां तुझं? कां कुठें खाऊन आली होतीस आज? इतकं दिवसभर काम करतेस मिलच्या मजुरासारखं, त्या मानानं जेवण नको कां असायला? चांगली उन्हउन्हीत भाकर वाढली तर नको म्हणे!— "

येसू भाकरी थापतां थापतां ठसक्यानें उद्गारली आणि लगेच तिनें चंदनला विचारलें—

" तुझ्यापेक्षां पांच सहा वर्सांनीं मोठा आहे ना तो न् मग तुझ्या वर्गांत कसा!— "

" अग, माझ्या वर्गांत आहेत असं कुठं म्हटलं मी माय? यंदा एम्. ए. ला आहेत ते— "

" मग तुझं बोलणं चालणं असेलच त्याच्याशीं ?— "

रखमानें तो धागा पकडून विचारलें.

" नाहीं विशेष. सभांतून काय संबंध येईल तेवढाच— "

" अगदीं खरं सांगते आहेस ना तूं हें ? आज हिरा आणि अभि दोघंहि आलीं होतीं त्याच्याबरोबर सभेला; न् हिरा सारखी पुढं पुढं करीत होती त्याच्या— "

" ती पोर नाहीं तरी अधिकच आहे जरा— "

येसूनें मध्येंच म्हटलें.

" लोकांच्या पोरीला कशाला उगाच अधिक म्हणतां ? तुमच्या पोरीचं काय पाह्यलंय तुम्ही अजून ? तुमच्यासमोर मेंढरासारखी मुंडी खालीं घालून बसते, म्हणूनच चांगली म्हणतां कीं नाहीं तुम्ही तिला ?— "

" नाहीं ग, ही साधीच आहे तिच्यापेक्षां तूं कांहीं म्हटलंस तरी. पाह्यला गेलं तर ती रक्तचंदनची बाहुली आहे शुद्ध ! पण काय नटते थटते— "

" आई बाप दोघं मिळवताहेत, सरकार शिकायला पैसा देतंय; मग कां नाहीं राहूं थाटांत तिनं ? तिची न् त्या देशपांड्याची बरीच घसट दिसते, चंदन ?— "

" हो. तिचा भाऊ न् ते शाळेंत असल्यापासून बरोबर शिकताहेत गेलीं सात आठ वर्षं— "

" मग येणं जाणं असेलच त्याचं त्यांच्या घरीं ?— "

" हो— "

" आणि तुझीहि भेट होत असेल तिथं त्याच्याशीं ?— "

" विशेष नाहीं होत— "

" आणि झाली भेट त्याच्याशीं तरी त्यांत बिघडलं काय, सूनबाई ? त्यालाहि कळलं पाहिजे चंदनवाडीच्या देशमुखाची पोर किती साजरी न् हुशार आहे तें. त्याच्या बहिणी, त्या बालिस्टराच्या पोरी, असतीलच ना तुझ्या कॉलेजांत ?— "

" हो. त्यांतली एक ती सरोज तर वर्गांतच आहे माझ्या— "

" मग तर त्यांना हें कळायलाच हवं सूनबाई, कीं त्या बालिस्टराच्या मुलींपेक्षां माझी नात कांहीं कमी साजरी अगर कमी शिकलेली नाहीं. उलट कांकणभर सरसच ठरेल त्यांच्यापेक्षां प्रत्येक बाबतींत— "

पण रखमा मात्र नंतर कांहीं बोलली नाहीं. ती मुकाट्यानें जेवीत होती.

आपल्या आईचें तें मौन भावी वादळाचें सूचक असावें, असें चंदनच्या मनांत आलें. कारण, तिला माहित होतें कीं, आई जेव्हां एकाएकीं बोलेनाशी होते, तेव्हां तिचें मन कसला तरी कठोर निश्चय करण्याच्या विचारांत असतें.

आई जेवण संपवून हात धुवावयाला बाहेर जातांच तिनें उष्टीं सांवडतांना आजीला हळूच म्हटलें--

" माय ग, मी जरा मावशीकडे जाऊन येतें-- "

त्याबरोबर येसू तोंडांतल्या तोंडांत पुटपुटली—

" हातावर पाणी पडलं नाहीं, तों निघाली पुन्हा बाहेर ! हल्लींच्या पोरींचं मन मुळीं रमतच नाहीं घरांत— "

पण तिच्या त्या पुटपुटण्याकडे लक्ष न देतां चंदननें बाहेर येऊन पायांत चपला घातल्या आणि ती चालावयाला लागणार, तोंच आंतून करडी हांक आली—

" चंदन, कुठं चाललीस या वेळीं ?-- "

त्याबरोबर ती एकदम थबकली आणि तिनें बाहेरूनच उत्तर दिलें--

" मी जरा मावशीकडे जाऊन येतें, माय— "

तेवढें वाक्य उच्चारून ती कांहीं क्षण थांबली. तिला वाटलें आई कदाचित् आपल्याला आंत बोलावील. पण त्यानंतर आंतून कांहींच साद न आल्यामुळें ती चालावयाला लागली.

जेवतांना आईनें केलेल्या त्या उलट तपासणीमुळें तिचा जीव गुदमरून गेला होता. बाहेर आल्यावर वाऱ्याची झुळूक अंगाला लागतांच तिला एकदम बरें वाटलें.

पण तिच्या मनावरील दडपण मात्र कमी झालें नाहीं. आपला आणि अवधूतचा जो स्नेहसंबंध आतांपर्यंत आपल्या आईला माहित नव्हता, तो आज तिला कळला आणि त्यासंबंधीं जरी आतां तिनें कांहींच मत व्यक्त केलें नसलें, तरी तिच्या मनाचा त्या बाबतींत एकदां निर्धार झाल्यावर ती जें सांगेल, तें मुकाट्यानें ऐकल्याशिवाय आपल्याला दुसरी गति उरणार नाहीं, या एकच एक जाणिवेनें तिचें मन भारावून खचून गेलें होतें.

आणि त्या दारुण जाणिवेच्या तावडींतून सुटण्यासाठीं ती घरांतून बाहेर पडली होती.

आपल्या मावशीपासून तिनें आजवर कांहींहि लपवून ठेवलें नव्हतें. किंबहुना, आपल्यावर नितान्त प्रेम करणाऱ्या आणि आपला कैवार घेऊन क्वचित् आईशीं भांडणाऱ्या आजीपेक्षांहि तिला मावशीचा आधार जास्त वाटे. तिची मावशी ज्या समरसतेच्या जिव्हाळ्यानें तिच्याशीं वागत असे, ज्या बरोबरीच्या नात्यानें

प्रत्येक गोष्टीची चर्चा तिच्याशीं करीत असे, ती समरसतेची आणि समतेची भावना तिला आईच्या किंवा आजीच्या ठिकाणीं कधींच अनुभवाला आली नव्हती, येण्याची शक्यताहि नव्हती. त्यामुळें आपला आणि अवधूतचा संबंध आईला कळून चुकला आहे हें तिच्या ध्यानांत येतांच तिच्या मनांत प्रथम जर कोणती कल्पना आली असेल, तर ती ही कीं, मावशीला सगळी हकीगत सांगून या बाबतींत तिचा सल्ला आपण घेऊन ठेवावा.

सभेला कधीं न जाणारी आपली आई आज सभेला हजर राहिली आणि इतके दिवस ज्या प्रसंगाला आपण भीत होतों, तो प्रसंग आतां आपल्यापुढें येऊन ठेपला आहे. उद्यां जर तिनें अवधूतशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवूं नको असें आपल्याला सांगितलें, तर आपण तिला काय उत्तर द्यावें ?

त्याच्याशीं संबंध न ठेवण्याची कल्पना तिला असह्य आणि अन्याय्यहि वाटली. आपली आजी आणि आई समजतात त्याप्रमाणें त्याचे वडील कदाचित् खरोखरीच दुष्ट असतील; व त्यांच्या दुष्टाव्यामुळें देशोधडीला लागण्याचा प्रसंगहि आपल्या कुटुंबावर आला असेल. पण, ते वाईट असले तरी त्यामुळें अवधूत कसा वाईट ठरतो ! आणि त्यांच्या दुष्टपणाचा राग अवधूतवर काढण्यांत तरी काय अर्थ ? उलट, कामगार चळवळींत तो भाग घेत असल्यामुळें त्याच्या वडलांचा जो राग त्याच्यावर झाला आहे, त्यावरून त्यांच्यापेक्षां त्याची दृष्टि आणि वृत्ति अगदीं भिन्न आहे असेंच सिद्ध होत नाहीं काय ?

पण, हा न्यायान्यायाचा प्रश्न सोडला, तरी तिचें मन तिला सारखें सांगत होतें कीं, त्याचा संबंध तोडून टाकायला उद्यां आईनें खरोखरीच सांगितलें, तरी आपण तें बेलाशक ऐकूं नये. त्यासाठीं वाटेल तो त्रास सोसावा, वाटेल तो त्याग करावयाला तयार व्हावें.

आई देईल तो त्रास सोसण्याची तिची पूर्ण तयारी होती. पण, आपण आईचें न ऐकल्यास ती जो त्रास स्वतःच्या जिवाला करून घेईल त्याची वाट काय ? चार पांच तासांपूर्वीच आपण अवधूतला सांगितलें कीं, " माझ्या आईच्या उतारवयांत तिच्या मनाला दुःख होईल असं आपल्या हातून कांहीं घडावं असं वाटत नाहीं मला. " आणि आतां या क्षणाला आपण तिच्या मनाला दुःसह वेदना होतील असें उत्तर तिला देण्याच्या विचारांत आहोंत.

मनाच्या अशा संभ्रांत स्थितींत ती मिशनच्या फाटकाजवळ येते न येते, तोंच

आपल्यापेक्षां फूट दीड फूट उंच असलेल्या दोन काठ्या हातांत घेऊन खुरडत खुरडत रस्त्यावर येत असलेला दशरथ तिला म्हणाला—

" जयरामजीकी चंदनबाई ! गरिबाची आठवण ठेवा— "

" एवढ्या रात्रीं कुठं निघालास तूं दशरथ ?— "

" महालांत चाललों आहे. सध्यां देवीचं नवरात्र आहे. पाहतों कांहीं प्रसाद कोणी या आंधळ्याला वाढला तर ?— "

" अम्माजी आहेत का आंत ?— "

" मला माहीत नाहीं. बडी अम्मा न् छोटी अम्मा दोघी बाहेर गेल्या होत्या संध्याकाळीं वस्तींतल्या आजारी मुलांना पाह्यला. आतां आल्या असतील बहुतेक परत— "

" मग तूं आतां परत केव्हां येणार रे ? — "

" येईन केव्हां तरी. मला आंधळ्याला काय दिवस न् रात्र सारखीच. पण दसऱ्याला पुरणपोळी काढून ठेवायला विसरूं नका माझ्यासाठीं— "

" दशरथ, अरे, या पावसांत न् चिखलांत कशाला जातोस शहरांत ? उगाच मोटारीखालीं सांपडलास तर कोण पहाणार आहे तुला ?— "

" मला मुळींच धास्ती नाहीं ती, बाई. देव माझ्या नांवाची चिठ्ठी लिहायला विसरून गेला बघा. नाहींतर वस्तींतलीं इतकीं जवान माणसं प्रत्येक साथींत मरतात, तर मी कसा राह्यलों असतों जिवंत ?— "

" पण तुला शहरांत पोंचायला अपरात्र होईल. एवढ्या रात्री कांहीं मिळेल, अशी आशा आहे कां खरोखरी ?— "

" आशा असल्याशिवाय का मी चाललों आहे, बाई ? माझ्यासारख्या आंधळ्या, अपंग भिकाऱ्याला आशेशिवाय दुसरा कसला आधार आहे जगांत ? माझ्यासारखीं माणसं आशेवरच जगतात— "

चंदन कांहीं बोलली नाहीं. तो खुरडत विव्हळत पुढें चालूं लागला आणि ती फाटकांतून आंत गेली.

नुकत्याच पडून गेलेल्या पावसाचे थेंब झाडांच्या पानांतून टपाटप खालीं पडत होते. आकाशांत एकहि तारा दिसत नव्हता. पण झाडांतून काजवे मात्र चमचम करीत होते.

चंदन पुढें जातांच व्हरांड्यांत वेताच्या मोठ्या थोरल्या जुन्या खुर्चीवर बसून जपमाळेचे मणि ओढीत असलेली सिस्टर झेविएरा तिच्या दृष्टीस पडली. ती हंसून म्हणाली—

" ये बेटा. पण तुझी मावशी आली नाहीं अजून. मी सुद्धां तिचीच वाट पहातें आहे— "

" फार लांब गेली आहे का ती ? — "

" छे. संध्याकाळीं वस्तींतल्या आजारी लेंकरांना पहायला गेलों होतों आम्ही. या महागाईमुळं दूध अजिबात मिळत नाहीं मुलांना न् त्यामुळं फार वाढलंय आजाराचं प्रमाण त्यांच्या. पण, सरकार न् म्युनिसिपालिटी दोहोंचेंहि लक्ष नाहीं मुळींच. गरिबांच्या लेकरांची काळजी जर सरकारनं घ्यायची नाहीं, तर कोणी घ्यायची ? त्यांनीं मुलांना दूध पुरविलें पाहिजे निदान गरिबांच्या तरी या महागाईच्या काळांत— "

" मग नुसत्या औषधपाण्याचा काय उपयोग होणार तुमच्या ?— "

" पण तें सुद्धां घेत नाहींत धड गरीब लोक. उलट, पहांटे, अपरात्रीं तान्ह्या मुलांना घेऊन पाण्या पावसांत तळ्यावरल्या सटवीच्या दर्शनाला जातात. खरोखरी मला पहावत नाहींत वस्तींतल्या लेकरांचे हाल— "

बोलतां बोलतां तिच्या डोळ्यांना पाणी आलें. तें रुमालानें टिपून ती चंदनला म्हणाली—

" तुझं काम आहे का कांहीं मावशीशीं ? ती येईलच इतक्यांत. तूं थांब थोडा वेळ— "

" मग मी देवळांत थांबते तोंपर्यंत. ती आल्याबरोबर बोलवा मला— "

आणि ती चर्चमध्यें गेली.

देवळांत पाऊल ठेवतांच फुलें आणि धूप यांचा संमिश्र गंध तिला जाणवला; व त्या रिकाम्या निष्प्रकाश मंदिरांतली ती गंभीर, गंधयुक्त शांतता तिच्या त्रस्त मनाला सुखकर वाटली. वेदीवर मधोमध लोंबत असलेल्या नंदादीपाचा सौम्य प्रकाश ख्रिस्ताच्या पुतळ्याच्या तोंडावर पडून त्याच्या त्या प्रेमळ सात्विक मुद्रेला एक प्रकारची विलक्षण सजीवता आली होती. त्याचे ते करुणेनें ओथंबलेले डोळे आणि ते दीन दुबळ्यांना धीर देण्यासाठीं पुढें केलेले हात–तो जणुं आपल्याशीं बोलण्याच्या बेतांत आहे, असा भास क्षणमात्र चंदनच्या मनाला झाला.

तिनें गुडघे टेकून हात जोडले आणि तिच्या डोळ्यांत आंसवें दाटलीं.

प्रार्थनेसाठीं म्हणून तिनें हात जोडले होते, तिची अश्रुपूरित दृष्टि त्या दया-घनाच्या मुखावर स्थिर झाली होती. पण तिच्या मनांत मात्र वेगळेच विचार थैमान घालीत होते.

गेल्या वर्षी महालक्ष्म्यांच्या दिवशीं प्रथम तिला अवधूतचा आणि आपल्या घराण्याचा पूर्वसंबंध काय आहे, हें समजलें. तेव्हांपासून गेले बारा तेरा महिने तिनें एक प्रकारच्या भयसंकुल वातावरणांत काढले होते. आज तें वातावरण फाटून गेलें आणि पुष्कळ दिवस गच्च भरून गदमदत असलेल्या आभाळांतून अचानक वीज कोसळून मस्तकावर पडावी, तशी तिची या क्षणीं अवस्था झाली होती. आई पुढें काय सांगेल, काय करील याची तिला कांहींच कल्पना नव्हती. आपण तिला काय उत्तर द्यावें, काय करावें, हेंहि तिला उमजत नव्हतें.

पण तिचें मन अत्यंत भयविव्हळ झालें होतें. या प्रसंगीं कोणाचा तरी आसरा, कोणाचा तरी धीर घ्यावा, त्याशिवाय आईच्या आततायी हट्टापुढें आपला निभाव लागणार नाहीं, असें तिला सारखें वाटत होतें.

आपल्याला आसरा आणि धीर देतील अशा तीनच व्यक्ति तिच्या डोळ्यांपुढें आल्या—तिची आजी, गुलाबताई आणि मावशी.

येसूनें मघांशीं जेवतांना म्हटलें होतें, "आणि झाली भेट त्याच्याशीं तर बिघडलं काय त्यांत ?" आणि खरोखरीच आपला आणि अवधूतचा संबंध किती जिव्हा-ळ्याचा आहे हें जरी आपल्या आजीला उद्यां समजलें, तरी तिला त्याचें विशेष कांहीं वाटणार नाहीं, याबद्दल चंदनची खात्री होती. उलट, अवधूतचें आपल्यावरील प्रेम, त्याचें आणि आपलें साहचर्य हा तिला एक कौतुकाचा, आनंदाचा आणि अभिमानाचा विषय होऊन बसण्याचा संभव आहे.

पण, ती स्वतः जरी त्याच्या आणि आपल्या स्नेहसंबंधाच्या आड येण्याचा संभव नसला, तरी आईनें जर त्याचा संबंध तोडून टाकावयाला आपल्याला निक्षून सांगितलें, तर मोठी माय आपल्याला पाठीशीं घालील काय ? आपला कैवार घेऊन आईशीं भांडेल का ? छे, शक्य नाहीं ती गोष्ट.

आणि गुलाबताई ? गुलाबताईला विचारावयाला गेलें, तर ती सरळ म्हणेल, " तूं आईची भीड मुळींच धरूं नकोस. त्याचं जर तुझ्यावर प्रेम असेल, तर तूं खुशाल लग्न कर त्याच्याशीं. इतका समानशील सहचर मिळायला तूं पूर्वजन्मीं

हरताळका चांगली पुजली होतीस, चंदन ! जरूर तर आईपासून वेगळी रहा. तुझ्या भविनव्यावर सत्ता गाजवायचा कांहीं हक्क नाहीं तिला— ”

पण, हा तिचा सल्ला अंमलांत आणावयाला लागणारें धैर्य आपल्या अंगीं आहे का ? आपण अवधूतचा संबंध तोडायचें नाकारलें, तर आई कदाचित् आपलें पुन्हा तोंड पहावयाला तयार होणार नाहीं, संतापाच्या भरांत कदाचित् स्वतःच्या जिवाला अपायहि करून घेईल. तो तिचा राग, तो तिचा वैताग उघड्या डोळ्यानीं पाहाण्याची हिंमत आपल्यांत आहे का ? छे ! गुलाबताई म्हणजे मूर्तिमंत झुंज ! तिच झुंजारपणा आपल्या अंगांत यायला आपले आणखी किती तरी पावसाळे गेले पाहिजेत.

मग मावशीच काय ती येऊन जाऊन उरते. ती काय करील ? ती आपल्याल कोणता सल्ला देईल ? तिला विश्वासांत घेणें इष्ट आहे का ? तरुण स्त्रीपुरुषांना एक मेकांविषयीं वाटणाऱ्या अनिवार आकर्षणाची कल्पना त्या धर्मवादिनीला काय असणार ? तिनें जर आपल्याला आईचें मन मोडूं नकोस असें सांगितलें तर ?

या सगळ्या विचारांच्या आवेगांत चंदनला, सिस्टर देवळांत आली, तिनें ए गुढघा टेकून क्रुसाचें चिन्ह केलें आणि आपल्या मागें येऊन ती उभी राहिली, कांहीं कळलें नाहीं.

तिची ती बेभान अवस्था पाहून सिस्टर ख्रिश्चियानाला नवल वाटलें आणि आपल्या किनऱ्या गोड आवाजांत तिनें हाक मारली—

“ चंदन— ”

त्याबरोबर चंदन एकदम उभी राहिली आणि तिनें मागें पाहिलें.

सिस्टर ख्रिश्चियाना विलक्षण थकून गेलेली होती. पण, तिच्या त्या श्रांत सांवळ्या, सुरकुतलेल्या चेहऱ्यावर प्रेमळ हास्य पसरलें होतें, तिचे ते काळेभो त्रस्त डोळे वात्सल्यानें विस्फारले होते आणि आपले दोन्ही हात तिनें किंचि पुढें केले होते.

चंदननें तिच्याकडे पाहिलें, एकदम तिच्या जवळ जाऊन गुढघे टेकले आणि तिच्या कमरेला घट्ट मिठी मारली.

त्याबरोबर सिस्टर खालीं वांकली, चंदनचे हात धरून तिनें तिला पोटाशीं धरं आणि तिच्या पाठीवरून हात फिरवून म्हणाली—

“ बाळ, काय सांगत होतीस प्रभूला ?— ”

चंदन कांहीं बोलली नाहीं. तिनें फक्त मावशीच्या कुशींत आपलें डोकें लपवलें. पण, तिचे अश्रु आपल्या हातावर पडत आहेत, हें तत्क्षणींच सिस्टरच्या लक्षांत आलें आणि ती एकदम कळवळून उद्गारली—

" बोल, बोल, सांग काय होतंय तुला तें! मी आल्याबरोबर झेवियरानं मला सांगितलं तूं देवळांत बसली आहेस म्हणून. त्याबरोबर हातांतली औषधांची पेटी तशीच टेबलावर टाकून मी तडक इथं आलें. सांग, सांग, तुला काय होतंय तें. आई कांहीं बोलली का तुला आज? तुझं त्या सरदाराशीं लग्न करायचा हट्ट धरलाय का पुन्हा तिनं? सांग, काय झालं?— "

तिनें चंदनला वेदीजवळ पसरून ठेवलेल्या आसनापाशीं नेलें आणि त्या दोघी खालीं बसल्या. तिच्या त्या प्रेमळ शब्दांनीं चंदन आतां शांत झाली होती तिनें आपले डोळे पुसले आणि अगदीं संथपणानें सिस्टरच्या नजरेला नजर देत म्हटलें—

" मावशी, मी तुला आज एक प्रश्न विचारणार आहे न् त्याचं सरळ उत्तर दिलं पाहिजेस तूं मला— "

" विचार, विचार. संकोच करूं नकोस तूं अगदीं— "

तिनें चंदनला म्हटलें आणि तिचे दोन्ही हात आपल्या हातांत घेतले.

" मावशी, तूं आपल्या तरुणपणीं प्रेम केलं होतंस का कुणावर?— "

" प्रेम?— "

" हो. तरुणपणीं स्त्रीपुरुषांना एकमेकांविषयीं जें प्रेम वाटतं तें प्रेम. तसल्या प्रेमाचा अनुभव घेतला आहेस का तूं?— "

सिस्टर क्षणैक स्तब्ध होती. नंतर अगदीं मोकळेपणानें हंसून म्हणाली—

" तुला माझा कबुलीजबाब घ्यायची लहर आली आहे का आज? तसं असेल, तर त्या कन्फेशनलजवळ चल— "

" नाहीं, मावशी. तूं जर मोकळ्या मनानं मला उत्तर देशील, तरच मी बोलेन तुझ्याशीं. तूं थट्टा नको करूं या वेळीं. खरं सांग मला. तुझं कधीं प्रेम जडलं होतं का कुणावर?— "

सिस्टर पुन्हा घोटाळली, पण क्षणभरच. तिनें आवंढा गिळला, गळ्यांतला चांदीचा क्रॉस हातांत घेतला आणि म्हटलें—

" हो, बाळ. त्या प्रेमापायींच तर मी जोग घेतला ऐन तारुण्यांत. अशी कोणती

अभागी स्त्री असेल जगांत कीं, जिनं तारुण्यांत केव्हां ना केव्हां तरी प्रीतीचा दाहक विद्युत् स्पर्श अनुभवलेला नाहीं ?— ”

“ पण, त्या प्रेमापायीं जोग का घ्यावा लागला तुला ?— ”

“ ज्याच्यावर माझं प्रेम जडलं होतं, त्या तरुणाशीं लग्न होणं शक्य नव्हतं म्हणून. मला प्रेमभंगाच्या वेदना सोसवेनात; जीवनांत मला गोडी वाटेनाशी झाली. म्हणून मीं प्रभूच्या पायांचा आसरा घेतला शेवटीं— ”

“ लग्न होणं का शक्य नव्हतं तुमचं ?—

“ आतां आणखी कांहीं विचारूं नकोस तूं मला. तूं जो एक प्रश्न विचारलास, त्याचं सरळ उत्तर दिलं मीं. असल्या विषयावर मी आणखी बोलणं हें माझ्या सध्यांच्या आश्रमाला शोभणारं नाहीं मुळींच— ”

सिस्टर एकदम निग्रहानें म्हणाली.

चंदन कांहीं बोलली नाहीं. सिस्टरनें पुन्हा तिचे हात आपल्या हातांत घेऊन म्हटलें—

“ पण तूं सांगितलं नाहींस बेटा मला अजून तुझ्या मनांत काय घोळतंय तें ?— ”

“ मावशी, मी आजवर कोणाजवळहि बोललें नाहीं ही गोष्ट. पण आज जेवतांन माय जें म्हणाली, त्यामुळें घाबरून गेलें आहे मी. आतां तुझ्याशिवाय आधार नाह मला कुणाचा— ”

आणि तिनें हळुहळू अवधूतचा आणि आपला स्नेह, चंदनवाडीचा पूर्वेतिहास वगैरे सगळ्या गोष्टी सिस्टरला सांगितल्या.

सिस्टरनें तें सर्व मुकाट्यानें ऐकून घेतलें. कांहीं वेळ ती अगदीं स्तब्ध होती नंतर तिनें अगदीं गंभीरपणानें विचारलें—

“ माझ्यावर जेव्हां अशा तऱ्हेचा प्रसंग आला, तेव्हां मी कशी वागलें हें सांगि तलंच मी तुला आतां. पण तसं वागायचं म्हणजे मन अगदीं मारून टाकावं लागत स्वतःचं. तशी तयारी आहे का तुझी ?— ”

“ मी अद्याप विचारच केला नाहीं त्या गोष्टीचा, मावशी. पण, माझ्या मनाचं तशी तयारी नाहीं असं समजूनच तूं काय सांगायचं तें सांग मला— ”

“ मग, मला वाटतं, तूं आईला स्पष्ट सांगून टाक, मला त्याचा संबंध तोडायचं

इच्छा नाहीं म्हणून. बापाच्या कृत्याचा राग मुलावर काढण्यांत कोणत्याहि प्रकारचा न्याय नाहीं, हें पटवून दिलं पाहिजेस तूं तिला— "

" पण मावशी, तुला माहिती आहे ना माझी आई किती जिद्दी आहे तें ? तिला आणि आजीला इतका कांहीं द्वेष वाटतो देशपांड्यांविषयीं कीं, माझ्या कोणत्याहि युक्तिवादाचा परिणाम होणार नाहीं त्यांच्यावर— "

" तें खरं. पण तूं अगदीं सरळपणानं वाग त्यांच्याशीं. त्यांना पटवून द्यायचा प्रयत्न कर सगळ्या गोष्टी न् जर त्यांना नाहीं पटलं, तर मुकाट्यानं सोस त्या त्रास देतील तो. We must bear our cross meekly and patiently. दुसरा उपाय नाहीं बेटा— "

मावशीचा निरोप घेऊन चंदन रात्रीं घरीं आली, त्या वेळीं येसू तिची वाट पहात छपरींत बसली होती. ती दृष्टीस पडतांच येसू म्हणाली—

" किती वेळ केलास ग यायला ? मी निघणारच होतें तुला बोलवायला तूं इतक्यांत आली नसतीस तर. सध्यांच्या या धामधुमीच्या दिवसांत तुझ्यासारख्या मुलीनं एकट्या दुकट्यानं हिंडणं चांगलं नाहीं मुळींच— "

" मोठी माय, मावशी वस्तींत एका आजारी मुलाला पाह्यला गेली होती. तिला यायला उशीर झाल्यामुळें वेळ लागला मला इतका— "

चंदन भीतभीतच आंत गेली. तिला वाटलें, आई आपल्याला हांक मारते कीं काय ? पण रखमा आपल्या खाटेवर स्वस्थ पडलेली होती. चंदन आंत येतांच आपली आई या कुशीवरून त्या कुशीवर वळल्याचें तिच्या दृष्टीस पडलें. पण रखमा कांहीं बोलली मात्र नाहीं. चंदननें मुकाट्यानें हातपाय धुतले आणि ती आजीशेजारीं आपल्या खाटेवर येऊन पडली.

दुसऱ्या दिवशीं पहांटे गिरणीचा पोंगा झाल्याबरोबर जेव्हां चंदन उठली, त्या वेळीं रात्रीं सणसणून भरलेला हिंवताप झोपेंत अंगांतून साफ उतरून गेल्यावर ज्या प्रकारचा थकवा माणसाला सकाळीं जाग येतांच वाटतो, तशा प्रकारचा थकवा आपल्या शरीराला आणि मनाला आला आहे, असें तिला वाटलें; व झोपेमुळें मनांतलें तें शल्य इतका वेळ तिला जाणवलें नव्हतें, तें आतां उठल्याबरोबर एकदम चाळवून ठसठसूं लागलें. पण, लगेच तिला मावशीनें रात्रीं दिलेला तो कणखर सल्ला आठवला आणि मनाला एक प्रकारचा हुरूप येऊन ती नित्यक्रमाला लागली.

तिनें पाहिलें, आईचे व्यवहार अगदीं रोजच्या प्रमाणें संथपणानें चालले होते.

तिच्या मुद्रेंत किंवा वृत्तींत तिला कोणताहि फरक दिसला नाहीं. रोज वेणीफणीच्या वेळीं ती ज्या मोकळेपणानें चंदनशीं मोजक्या गप्पा मारीत असे, त्याच मोकळेपणानें ती आजहि बोलली; व न्याहारी झाल्यावर साताचा पोंगा होतांच ती सुपारीचें खांड तोंडांत टाकून घरांतून बाहेर पडली.

तिच्या त्या वर्तनाचा कांहींच उमज चंदनला पडेना. तिला पुनःपुन्हा वाटे, आईच्या मनाचा कांहींतरी निश्चय झालेला आहे आणि तो ती आपल्याला पुन्हा असाच एकादा प्रसंग साधून सांगणार असावी.

दुपारीं ती नेहमींप्रमाणें कॉलेजांत गेली. पण, तिथें मधल्या सुटींत अवधूत अपेक्षेप्रमाणें न भेटल्यामुळें ती संध्याकाळीं त्याच्या घरीं गेली.

ती गेली, त्या वेळीं तो खोलींतील सामान आवरीत होता. टेबलावर पत्रें, टिपणें, कात्रणें वगैरेंची रास केलेली होती; व त्यांतल्या प्रत्येक कागदावर नजर टाकून तो त्यांतले कांहीं कागद फाडून खालच्या टोपलींत टाकीत होता.

"हें काय? कुठं जायची तयारी चालली आहे तुमची?—"

"नागपूरला जायची—"

तिला पहातांच त्यानें खुर्चीवर असलेलीं पुस्तकें जमिनीवर ठेवून तीं तिच्याकडे ढकलीत हंसत हंसत उत्तर दिलें.

"म्हणजे? मी समजलें नाहीं—"

"मी अगदीं खरं खरं सांगतोंय तुला. दादांनीं आज सकाळींच मला सांगितलं तूं आपली स्वतंत्र व्यवस्था कर म्हणून—"

"असं सांगायचं कारण?—"

"कारण तुझ्या लक्षांत यायला हवं होतं वास्तविक. तूं वाचलंस नाहीं का आज सकाळच्या वर्तमानपत्रांत वर्किंग कमिटी आपल्या परवां वर्ध्याला भरणार असलेल्या बैठकींत मंत्रिपदें सोडण्याचा ठराव करणार आहे म्हणून?—"

"पण कॉंग्रेसनं मंत्रिपदं सोडलीं म्हणून तुम्हांला घर सोडायचं कारण काय?—"

"कारण अगदीं उघड आहे. दादांना वाटतं कीं, आपल्या प्रांतांतल्या कॉंग्रेस मंत्रिमंडळानं राजीनामा दिला म्हणजे दडपशाही सुरू होईल एकदम. म्हणून मी त्यांच्यापासून वेगळं रहावं असं सुचवलंय त्यांनीं मला—"

" पण अजून कांहीं राजीनामा दिलेला नाहीं मंत्रिमंडळानं. मग एवढी घाई करायचं काय कारण ? मंत्र्यांना राजीनामा देऊं द्या. मग पहातां येईल— "

" ही आपली विचारसरणी झाली. पण त्यांना वाटत नाहीं तसं. वस्तुस्थिति अशी आहे कीं, आमचे वायदे थकलेले आहेत. कॉंग्रेसचे दिवाण असल्यामुळं आजवर त्रास झाला नाहीं आम्हांला फारसा. पण, ते उद्यां गेल्यावर कोणतीहि सवलत मिळण्याचा संभव नाहीं. तशांतच जर मी चळवळीच्या आघाडीला आहे असं सरकारच्या नजरेला आलं, तर माझ्याविषयींचा राग सरकार आपल्यावर काढील अशी भीति वाटते दादांना— "

" तुमचे वडील इतके भित्रे असतील असं वाटलं नव्हतं मला— "

" त्यांना दोष देणं योग्य होणार नाहीं, चंदन. सामान्य माणसं अशींच असायचीं— "

" तुम्ही सामान्य समजतां आपल्या वडलांना ? "

" सामान्य नाहीं तर काय ? पैसा आणि प्रतिष्ठा यांच्या रूढ कल्पनांपलिकडे ज्यांची पराक्रमाची दृष्टि किंवा पुरुषार्थाची आकांक्षा जात नाहीं, ते लोक कितीहि हुषार किंवा कर्तबगार असले, तरी सामान्यच नव्हेत का ?— "

" पण तुम्ही एकुलते एक चिरंजीव आहांत त्यांचे. तुम्हांला वेगळं काढायची कल्पना मनांत तरी कशी आली त्यांच्या ? "

" ते मला अजिबात वेगळा थोडाच काढताहेत ? मी त्यांच्यापासून वेगळा रहातों, माझा न् त्यांचा कांहीं संबंध नाहीं, एवढा फक्त भास उत्पन्न करायचा आहे त्यांना माझ्यामुळं आपल्यावर कांहीं तोहमत येऊं नये म्हणून— "

" मग तुम्ही जागा पाहिली आहे का कुठं ?— "

" हो, अंबाझरीवर राह्यला जाणार आहे मी. खरं सांगायचं म्हणजे दादा कांहीं बोलण्यापूर्वीच ही कल्पना आली होती माझ्या मनांत; न् नागपुरांत जर संप सुरू झाला, तर आपण वेगळं राह्यचं असं मनाशीं ठरवून टाकलं होतं मी. माझ्या चळवळेपणामुळं त्यांचं आजवर नुकसान झालं तेवढं पुरे. आतां फक्त चंदनवाडीच काय ती शिल्लक उरलीय. ती जायचा प्रसंग यायला नको माझ्यामुळं— "

तो हंसून म्हणाला आणि लगेच त्यानें तो अप्रिय विषय बदलण्यासाठीं तिला विचारलें—

" कालची सभा किती छान झाली आमची कळलं का तुला ?— "

" हो. हिरानं सांगितलं आज कॉलेजांत— "

बोलतां बोलतां तिची चर्या एकदम उतरून गेली, आवाज एकदम घोगरून गेला.

तो फरक त्याच्या लक्षांत आला आणि तिच्या दृष्टीला दृष्टि देऊन त्यानें विचारलें—

" काय झालं चंदन तुला एकदम ?— "

" कांहीं नाहीं, उगाच भास झाला तुम्हांला— "

तिनें बळेंच हसून उत्तर दिलें. पण, आपल्या झांकलेल्या जखमेला दुसऱ्यानें न कळत धक्का दिला असतां त्यामुळें झालेल्या वेदनेची कणव जशी डोळ्यांत दिसावी, तशी तिची मनोव्यथा मुद्रेवर स्पष्ट दिसत होती. म्हणून त्यानें तिच्याकडे रोखून पहात म्हटलें—

" छे, छे ! तू कांहींतरी लपवते आहेस माझ्यापासून. तुझ्या चेहऱ्यांत आणि आवाजांत एकएकीं इतका फरक उगाच नाहीं पडला. खरं सांग मला— "

" खरंच कांहीं नाहीं— "

तिनें हंसून उत्तर दिलें आणि ती लगेच म्हणाली—

" बरं, मी जातें आतां— "

" का ? आज इतक्या लवकर ? अजून पांचसुद्धां वाजले नसतील— "

" हो. पांचाच्या आंत घरीं जायचा विचार आहे माझा आज— "

" का ?— "

" विशेष कांहीं नाहीं. आई कामावरून परत येण्याच्या आधीं घरीं जाणार आहे मी— "

त्यानें एकवार तिच्याकडे पाहिलें आणि तो म्हणाला—

" बरं चल. मी फाटकापर्यंत येतों तुझ्या बरोबर— "

" आज मला पोंचवायची लहर आली आहे वाटतं तुम्हांला ?— "

" हो. कदाचित् या बंगल्यांतली ही शेवटची भेट ठरेल आपली— "

" असं का म्हणतां तुम्ही ? मघांशीं तुम्ही म्हणालांत ना, मी जरी वेगळा रहाणार असलों, तरी तो केवळ तसा भास उत्पन्न करण्यासाठीं म्हणून ?— "

" हो. तें खरं. पण एकदां या घरांतून माझं पाऊल बाहेर पडल्यावर तें पुन्हा

या घरांत पडेल, असं वाटतं कां तुला, चंदन? कांग्रेसनं मंत्रिपदं सोडल्यावर आजची स्थिति कायम राहील अशी का समजूत आहे तुझी ?— ”

ती कांहीं बोलली नाहीं. तो क्षणार्ध थांबून म्हणाला—

“ आज जी पिढी शाळां-कॉलेजांत आहे, तिच्या आयुष्यांतले सुखाचे दिवस आतां संपले असं समज तूं, चंदन— ”

# न उलगडलेलें कोडें १६

दादासाहेबांनीं तिच्याकडे पाहिलें आणि त्यांच्या तोंडून उद्गार निघाला—
"कोण रखमा?—"

त्यांचा आपल्या डोळ्यांवर विश्वास बसेना.

अवधूतनें बगीचाचें फाटक उघडलें आणि ती बाहेर पडतांच तिच्या हातीं सायकल दिली.

सायंसूर्याचा रम्य प्रकाश तिच्या अंगावर पडला होता. त्या प्रकाशांत तिची केळफुलाच्या गाभ्यांतल्या कोंवळ्या पानासारखी आरक्त अंगकांति खुलून दिसत होती आणि तिच्या तोंडावरलें हास्य कन्हानच्या तांबूस वाळूवर खेळणाऱ्या चकचकीत जललहरींसारखें शोभत होतें.

तो तिला हंसत हंसत कांहींतरी बोलला; ती त्याला हंसत हंसत कांहींतरी उत्तर देऊन सायकलवर बसली.

तिचें तें हास्य पाहून त्यांना रखमाच्या हास्याची आठवण झाली. रखमा हंसल्या-बरोबर जो मनाला रोमांचित करणारा गोड आवाज खळाळत कानांवर पडत असे, तोच आवाज आपण आज पुन्हा बारा तेरा वर्षांनीं ऐकत आहोंत असा त्यांना भास झाला. बोलतांना ऐटदारपणानें मान वेळण्याची मोहक तऱ्हाहि अगदीं तीच; लांबट चेहऱ्यावर स्वाभिमानाची प्रभा पाडणारे टपोरे डोळेहि अगदीं थेट तसेंच; व पॅडल्-वर पाय ठेवून सायकलवर झेप घेतांना बांधेसूद शरीराला आलेला मनोहर बांकहि अगदीं तसाच.

क्षणार्धांत त्यांच्या डोळ्यांसमोरून तिची सायकल वेगानें निघून गेली.

पण, ते कितीतरी वेळ खिडकीपाशीं उभे राहून शून्य दृष्टीनें बाहेर पहात होते.

त्यांच्या डोळ्यांपुढून तें दृश्य कांहीं केल्या हलेना.

उलट, पाण्यांत टाकलेल्या जपानी चकतींतून जशीं पानेंफुलें बाहेर पडावींत, त्याप्रमाणें त्या दृश्यांतून गतकालांतलीं अनेक दृश्यें प्रकट होऊन त्यांच्या डोळ्यांपुढें नाचूं लागलीं.

किसनच्या लग्नांत पाहिलेली पोरसवदा रखमा, आपल्या वाड्यांत सणावारीं दृष्टीस पडलेली तरणीजवान रखमा, आपल्या शेतावर एकच दिवस काम करावयाला आलेली स्वाभिमानी रखमा!—तीच रखमा आज पुन्हा बारा तेरा वर्षांनीं आपल्या नजरेस पडली काय?

हुबेहूब तिच्यासारखी दिसणारी ही कोण मुलगी आज अवधूतकडे आली होती?

त्यांना चैन पडेना. रखमाविषयींचा त्यांच्या मनांतला सगळा अतृप्त अभिलाष फुसफुसत उठला आणि त्यांना वाटलें, ज्या रखमानें आपल्याला बारा तेरा वर्षांपूर्वी झिडकारलें, आपल्या वासनेचें खेळणें होऊन बसण्यापेक्षां जिनें आनंदानें वनवास पत्करला, त्याच रखमाची तर ही मुलगी नसेल ना?

होय, तिचीच मुलगी असली पाहिजे ही.

त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला, पण त्यांना त्या मुलीचें नांव कांहीं केल्या आठवेना. त्यांना फक्त इतकेंच आठवलें कीं, किसन देशमुखाला एक मुलगी होती आणि ती आपल्या अवधूतपेक्षां चार पांच वर्षांनीं लहान होती.

ती कल्पना त्यांच्या डोक्यांत येतांच त्यांच्या अतृप्त अभिलाषाचा सगळा दंश, सगळा खुनशी राग चवताळून उठला आणि त्यांच्या मनांत आलें, माझी प्रेमयाचना जिनें उर्मटपणानें ठोकरून लावली, त्या घमेंडखोर रखमाच्या पोरीच्या प्रेमपाशांत तर माझा एकुलता एक मुलगा सांपडलेला नाहीं ना? पण, मग गिरणीकामगाराच्या कॉलेजांत असलेल्या ज्या मुलीवर त्याचें प्रेम असल्याची कागाळी सरोजनें आपल्या पत्नीजवळ केली होती, ती मुलगी कोणती? कीं चंदनवाडी सोडल्यावर रखमानें येथें येऊन गिरणींत नोकरी धरली आणि तिच्याच कॉलेजांत असलेल्या मुलीवर त्याचें प्रेम जडलें आहे?

तो संशय मनांत रुजला मात्र, ते तसेच तडक निघून अवधूतच्या खोलींत आले.

तो टेबलापाशीं उभा राहून निवडलेलीं पत्रें, टिपणें, कात्रणें वगैरे नीट फायलींत लावीत होता.

त्यांना अचानक आंत आलेले पहातांच तो चकित झाला आणि ते काय बोलतात याची वाट पहात नम्रतेनें टेबलापाशीं उभा राहिला.

तेहि उभेच होते. बोलावयाला कशा रीतीनें प्रारंभ करावा, हें त्यांना सुचेना. म्हणून त्यांनीं विचारलें—

" तुझी बाहेर राह्यला जायची तयारी चाललेली दिसते ?— "

" हो— "

" कुठं जागा पाह्यली आहेस ?— "

" अंबाझरीजवळ— "

" इतक्या लांब राह्यला जाणार तूं ?— "

" लांब कशानं ? सायकलनं दहा मिनिटांत येतां येईल इथं— "

त्यावर ते कांहीं बोलले नाहींत. ते खिडकीजवल येऊन उभे राहिले आणि त्यांनीं उजव्या कानशिलावर दोन बोटें घासलीं.

त्यांच्या त्या चमत्कारिक वर्तनाचा कांहींच उलगडा त्याला होईना.

तोंच खिडकींतून बाहेर पहात त्यांनीं त्याला हांक मारली—

" अवधूत— "

" काय दादा ?— "

" मघाशीं ती कोण मुलगी आली होती तुझ्याकडे ?— "

" कोणती मुलगी ?— "

त्यानें चमकून विचारलें.

" जिला तूं फाटकापर्यंत पोंचवायला गेला होतास ती— "

" ती ? ती आमच्या कॉलेजांतली मुलगी आहे एक— "

" तें समजलों मी. पण नांवगांव काय तिचं ?— "

" तिचं नांव चंदन— "

" काय चंदन ?— "

त्याला वाक्य पुरतें करूं न देतां ते एकदम मागें वळून उद्गारले.

" कुणाची मुलगी आहे ही ? नागपूरची आहे कीं दुसरी कुठली ?— "

" सध्यां नागपुरासच असते. तिची आई गिरणींत नोकर आहे— "

" पण बापाचं नांव काय तिच्या ?— "

" कृष्णराव देशमुख— "

" कृष्णराव देशमुख ? खात्रीनं किसनचीच मुलगी असली पाहिजे ही. किसनचा कृष्णराव बनवलेला दिसतो तिनं कॉलेजांत नांव घालतांना. खात्रीनं किसन देशमुखाचीच मुलगी असली पाहिजे ही— "

ते जणुं स्वतःशींच बोलत होते. त्यांच्या त्या स्वतःशीं बडबडण्याचें आणि कानशिलावर वारंवार बोटें घासण्याचें अवधूतला नवल वाटलें. पण तो कांहीं बोलला नाहीं. तोंच त्यांनीं विचारलें—

" तूं जातोस कधीं तिच्या घरीं ? — "

" नाहीं— "

" ती मात्र येते तुझ्याकडे नेहमीं ?— "

" हो. अलिकडे येत असते— "

" हीच मुलगी काम करते का तुझ्याबरोबर ?— "

" हो— "

" मग सरोजनं बरोबर सांगितलं तुझ्या आईला— "

" काय सांगितलं सरोजनं ?— "

" सरोजनं सांगितलं, ही मुलगी तुझ्याबरोबर असते नेहमीं आणि तुझं तिच्यावर प्रेम आहे— "

तो कांहीं बोलला नाहीं. पण त्याचा चेहरा मात्र एकदम लाल होऊन गेला.

ते कांहीं क्षण विचारांत व्यग्र होते. नंतर त्यांनीं हांक मारली—

" अवधूत— "

" काय दादा ?— "

" तूं या मुलीशीं संबंध ठेवतां कामा नयेस-- "

त्यांनीं तें करड्या आवाजांत उच्चारलेलें वाक्य ऐकतांच त्याला आपल्या अंगावर वीज कोसळल्यासारखें वाटलें. पण क्षणभरच. स्वतःच्या मनाचा सगळा क्षोभ आवरून त्यानें उलट विचारलें—

" का ठेवायचा नाहीं मी संबंध तिच्याशीं ?— "

" या बाबतींत तूं कांहींहि विचारतां कामा नयेस मला. मी सांगतों, तूं मुकाट्यानें ऐक-- "

तें वाक्य उच्चारतांना त्यांच्या त्या एका काळच्या प्रखर पण आतां मंद झालेल्या डोळ्यांत त्यांच्या वृत्तींतली सगळी उग्रता, सगळा दर्प एकवटला होता.

अवधूतनें त्यांच्या नजरेला नजर दिली आणि अगदीं संथपणानें म्हटलें—

" ही मुकाट्यानें ऐकण्यासारखी गोष्ट नाहीं, दादा. आपण कारण सांगा म्हणजे मी विचार करीन आपल्या म्हणण्याचा— "

" काय म्हणतोस ? मुकाट्यानें ऐकण्यासारखी नाहीं काय ही गोष्ट ? तूं कोणती गोष्ट मुकाट्यानं ऐकली आहेस आजवर माझी ? वर्धा मिल्सच्या संपाच्या वेळीं तूं भाषण केलंस न् त्याच दिवशीं रात्रीं मी तुला निक्षून सांगितलं कामगारांच्या चळवळींत तूं पडूं नकोस म्हणून. त्या वेळीं तूं कांहीं बोलला नाहींस. पण नागपूरला आल्यावर इथल्या चळवळींत भाग घ्यायला सुरवात केलीस आणि अखेर मला गिरणींतून निघावं लागलं तुझ्यामुळं. तुला वडलांची परवा नाहीं, घराण्याच्या प्रतिष्ठेची परवा नाहीं; फक्त स्वतःच्या मतांची घमेंड आहे ! आजपर्यंत मी तुझे सगळे थेर चालूं दिले. त्या थेरांमुळं मला समाजांतून उठावं लागलं, तरी मी ती मानहानि गिळली. पण, लक्षांत ठेव, या बाबतींत जर तूं माझं मुकाट्यानं ऐकणार नसशील, तर आपले आईबाप मेले, असं समजून चाल तूं !— "

ते संतापानें थरथरा कांपत होते. अवधूतनें त्यांचा राग आजवर पुष्कळदां पाहिला होता. पण आजच्या या त्यांच्या संतापाचें स्वरूप कांहीं विलक्षणच होतें.

त्या संतापाचा कांहींच उलगडा त्याला होईना आणि चंदनशीं संबंध न ठेवण्याचा जो आततायी हट्ट त्यांनीं धरला होता, त्याचेंहि कारण त्याला समजेना. म्हणून त्यानें अत्यंत लीनतेनें विचारलें—

" आपण निष्कारण रागावतां आहांत माझ्यावर, दादा. आपलं ऐकत नाहीं असं म्हटलं नाहीं मी. फक्त मला तिच्याशीं संबंध न ठेवण्याचं कारण सांगा एवढंच म्हणणं आहे माझं— "

" नाहीं. तूं कारण विचारूं नकोस आणि मी सांगणारहि नाहीं. कांहीं गोष्टी वडील माणसांनीं सांगायच्या आणि लहानांनीं मुकाट्यानं करायच्या असतात. तशीच एक ही आहे असं समज—"

" सरोजनं भलतंच काहींतरी भरवून दिलेलं दिसतंय आईच्या मनांत. तिची आई गिरणींत मजुरी करते म्हणून तर आपण सांगत नाहीं ना मला तिच्याशीं संबंध ठेवूं नकोस असं ?— "

" पुन्हा तेंच ! मीं तुला सांगितलं ना एकदां मला पुन्हा कांहीं विचारूं नकोस

या बाबतींत म्हणून ? सरोजनं कांहीं भलतं सलतं सांगितलं नाहीं तुझ्या आईला. तूं जें करीत होतास, तेंच तिनं सांगितलं— ”

“ पण दादा, माझ्याकडे इतर मुली येतात, तशीच तीहि येते. त्या इतर मुलींची कधीं चुकूनहि चौकशी केली नाहीं आपण आजवर आणि या मुलीशीं मात्र एकदम संबंध तोडायला सांगतां याचा अर्थ काय करायचा मी ?— ”

“ तुझ्याकडे दुसरी कोणतीहि मुलगी आलेली चालेल मला. पण ही मुलगी मात्र माझ्या घरांत आलेली मला चालणार नाहीं; माझ्या मुलाशीं तिचा संबंध असलेला मला खपणार नाहीं— ”

“ पण का ? या मुलीवरच आपला राग का इतका ?— ”

“ पुन्हा विचारतोस ? मूर्खा, स्वतःच्या वडलांच्या भावनांची कांहीं किंमत आहे कीं नाहीं तुला ? मीं तुला एकदां स्पष्ट सांगितलं, तिथंच संपलं सगळं. तूं जर माझं या बाबतींत ऐकणार नाहीस तर मी तोंड पहाणार नाहीं तुझं पुन्हा— ”

तेवढें वाक्य त्यांनीं उच्चारलें आणि ते तावातावानें त्याच्या खोलींतून बाहेर पडले.

त्यांच्या त्या विलक्षण वर्तनानें तो अगदीं स्तंभित होऊन गेला. ते तापट असले, तरी इतकें अरेरावीपणाचें वर्तन त्यांनीं पूर्वी कधींहि त्याच्याशीं केलेलें नव्हतें. किंबहुना, त्याच्या राजकीय उद्योगांमुळें आपलें नुकसान होत असल्याची तक्रार जरी ते वारंवार करीत, तरी त्याबद्दलहि त्यांनीं एका मर्यादेपलिकडे जाऊन त्याला कधींहि दोष दिलेला नव्हता.

पण आजच्या त्यांच्या रागाचा प्रकार कांहीं विलक्षणच होता. विशेषतः, “तुझ्याकडे दुसरी कोणतीहि मुलगी आलेली चालेल मला. पण ही मुलगी मात्र माझ्या घरांत आलेली मला चालणार नाहीं; माझ्या मुलाशीं तिचा संबंध असलेला मला खपणार नाहीं, ” हे त्यांचे उद्‌गार त्याला आठवले म्हणजे त्याला वाटे, चंदननें त्यांची अशी कोणती अक्षम्य आगळीक केली आहे कीं, जिच्यामुळें त्यांना तिचें आपल्याकडे येणें आणि आपल्याशीं संबंध ठेवणें इतकें दुःसह होऊन जावें ? तिची आई गिरणींत मजुरी करते हें त्या रागाचें कारण नव्हे किंवा तिची जात आपल्यापेक्षां निराळी आहे, हेंहि त्या रागाचें कारण नव्हे. मग त्यांनीं जो इतका चमत्कारिक दंश तिच्या बाबतींत धरला आहे त्याचें कारण काय असावें ? आपल्या आईला त्या कारणाची कल्पना असेल का ? तिच्याकडूनच तर चंदनच्या आणि

आपल्या स्नेहसंबंधाची माहिती त्यांना मिळाली, हें उघड आहे. तिला जर आपण या रागाचें कारण विचारलें, तर ती सांगेल का? तिला माहीत असलें, तर खात्रीनें सांगेल. पण ते घरांत असतांना आणि त्यांचा संताप अशा रीतीनें पराकोटीला गेलेला असतांना या वेळीं आंत जाऊन तिच्याशीं निवान्तपणानें बोलणें शक्य कसें आहे?

त्यांच्या या विलक्षण संतापाचें कारण आपल्याला केव्हां कळेल तें कळो. पण, चंदनला मात्र आतांच्या आतां हा सारा प्रकार सांगून सावध करणें जरूर आहे. ती आतां पुन्हा या घरीं येऊन आपल्याला भेटण्याचा संभव नाहीं, हें खरें. तरीसुद्धां आतां घडलेला हा चमत्कारिक प्रकार तिच्यापासून लपवून ठेवणें इष्ट होणार नाहीं. यापुढें त्यांची आपल्या वर्तनावर, तिच्या आणि आपल्या स्नेह-संबंधावर नजर राहील, हें उघड आहे. अशा स्थितींत तिला सावध न करून कसं चालेल? तिला आतांच्या आतां सावध केलें पाहिजे, सगळें कांहीं स्पष्ट सांगून टाकलें पाहिजे.

पण तिला कसें आणि कुठें भेटणार? तिनें आपल्याला स्वतःच्या घरीं येण्याची सक्त मनाई केलेली नाहीं का? मग तिची भेट आतां कशी होणार? कुठें होणार?

ती शंका त्याच्या मनांत आली आणि लगेच त्याला वाटलें, चंदननें आपल्याला स्वतःच्या घरीं यायला केलेली मनाई आणि दादांनीं आज तिला आपल्या घरीं यायला केलेली मनाई या दोहोंत कांहीं लागाबांधा, कांहीं कार्यकारणसंबंध असेल का? छे, चंदनला आतांच्या आतां जिथें असेल तिथें भेटून या प्रकाराचा उलगडा करून घेतला पाहिजे—

तो तत्क्षणींच उठला आणि दिवा लावून त्यानें कपडे अंगांत घालावयाला सुरवात केली. तोंच पंडत आंत येऊन अदबीनें हिंदींत म्हणाला—

"साहेब, मोठे महाराज जेवणासाठीं वाट पहाताहेत आपली—"

त्या दिवशीं नवरात्रांतला शुक्रवार होता. पंडतनें जेवणाची आठवण देतांच, आपल्या आईवडलांचा अष्टमीचा उपास देवीची यथासांग पूजा झाल्यावर सुटावयाचा आहे, हें एकदम त्याच्या ध्यानांत आलें, तरी सुद्धां तो सटकन् बोलून गेला—

"मला आज जेवायचं नाहीं म्हणून सांग महाराजांना—"

त्याचें तें तुटक उत्तर ऐकून पंडत क्षणार्ध घुटमळला. पण लगेच म्हणाला—

"पात्रं वाढून तयार आहेत, साहेब. आरतीहि संपत आली आहे. आज

अष्टमीची पूजा आहे. आपण आंत येऊन पात्रावर बसा न् वाढलेला प्रसाद खाऊन उठा— "

त्या पिढीजाद म्हाताऱ्या नोकराच्या बोलण्याचा अर्थ अवधूतच्या लक्षांत आला आणि तो एकदम वरमून म्हणाला—

" बरं, ठीक आहे. मी आलोंच तुझ्या मागोमाग— "

तो हातपाय धुवून आंत गेला, त्या वेळीं मंत्रपुष्प चालू होता. देवघरांत शिसवीच्या सुंदर देव्हाऱ्यापुढें चांदीच्या फुल्या असलेल्या उंच रंगीत पाटावर शाल पांघरलेले दादासाहेब बसले होते; व समोरच्या पाटावर बसलेला ब्राह्मण मंत्रपुष्प मोठ्यानें म्हणत होता. लहान लहान विद्युद्दीपांच्या रंगीबेरंगी प्रकाशांत घटावर लोंबत असलेल्या चमेलीच्या पांढऱ्या शुभ्र माळा, वरल्या मंडपीला लावलेलीं सीताफळ, लिंबू, डाळिंब, पेरू वगैरे हिरवींगार फळें आणि घटाभोंवती वाढलेलें पांढरें पिवळें जंव मजेदार दिसत होते. देव्हाऱ्याच्या उजव्या बाजूला मोठा थोरला पितळेचा नंदादीप तेवत होता; व देवीच्या दोहों बाजूंना चांदीच्या नागाकृति समया लावलेल्या होत्या. फुलें, कापूर आणि धूप यांच्या संमिश्र गंधानें तें लहानसें देवघर कोंदून गेलें होतें.

अवधूत देवघरांत जातांच ब्राह्मणानें फुलें आणि कुंकुमाक्षता असलेलें चांदीचें तबक त्याच्यापुढें धरलें. त्यानें त्यांतलीं फुलें देवीला वाहिलीं आणि साष्टांग नमस्कार घातला. नंतर दादासाहेबांनीं चांदीच्या फुलपात्रांतलें तीर्थ त्याच्या हातावर घातलें आणि तो देवघरांतून बाहेर येऊन पाटावर बसला.

त्यांचें जेवण नेहमींप्रमाणें स्वस्थपणानें झालें. दादासाहेब मधून मधून ब्राह्मणाशीं, दिवाणजीशीं आणि इतर जे तीन चार आश्रित पंक्तीला होते, त्यांच्याशीं बोलत होते. त्यांच्या त्या बोलण्यांत स्वाभाविक रुबाब असला, तरी मघांचच्या त्या रुद्रावताराची मात्र अगदीं पुसटहि छटा नव्हती.

जेवणाचा तो समारंभ पाऊण तास चालला होता. शेवटीं उठतांना दादासाहेब त्याला म्हणाले—

" अरे, उद्यां सामान हलवूं नकोस तूं इथून आपलं. दसरा होईपर्यंत इथंच रहा. त्यानंतर पहातों मी काय करायचं तें— "

" का ? अवधूतराव कुठं जाताहेत ?— "

ब्राह्मणानें आपल्या गरगरीत पोटावरून हात फिरवीत मध्येंच विचारलें.

" छे, जात नाहीं कुठंच. यंदा एकदम दोन परीक्षा द्यायच्या आहेत त्याला, तेव्हां अभ्यासासाठीं कांहीं दिवस वेगळी खोली घेऊन राह्यचा विचार आहे त्याचा—"

दादासाहेब आपोष्णी घेऊन हंसत हंसत म्हणाले.

त्यांचें तें उत्तर ऐकून ब्राह्मणानें दिवाणजीकडे पाहिलें. त्यांची नेत्रपल्लवी झाली आणि दादासाहेबांच्या बरोबर ते दोघे मुकाट्यानें पानावरून उठले.

जेवणाच्या शेवटीं दादासाहेबांनीं दसऱ्यापर्यंत घरीं राहण्याची जी सूचना केली, ती ऐकून अवधूतचें मन अधिकच अस्वस्थ झालें; व हात धुतल्याबरोबर तडक घरांतून बाहेर पडावें, असें त्याला वाटलें. पण, दादासाहेब बाहेर येऊन पानसुपारीचा कार्यक्रम पार पडेपर्यंत आपण निघून जाणें चांगलें दिसणार नाहीं, याची त्याला लगेच जाणीव झाली. म्हणून हात धुवून तो दिवाणखान्यांत आला आणि त्यानें रेडिओ लावला.

रेडियो लावण्यांत त्याचा हेतु एवढाच होता कीं, दादासाहेब आणि त्यांच्या बरोबरची मंडळी बाहेर येईपर्यंत कसा तरी वेळ घालवावा. म्हणून त्यानें प्रथम संगीताच्या अपेक्षेनें दिल्ली केन्द्र लावलें. पण, तें लावल्याबरोबर कोणा खानसाहेबांची जी दणदणीत आवाजी त्याच्या कानांवर आदळली, ती न आवडल्यामुळें त्यानें मुंबई केन्द्र लावलें. त्याबरोबर मिराबाईच्या भजनाचे अत्यंत सुरेल, रसपूर्ण आलाप त्यांतून संथ लयीनें बाहेर पडूं लागले—

जो पिया तोड्डू पिया मै नहि तोड्डू ।
तोरि प्रीत तोड्डू कान्हा कोनसंग जोड्डू ॥
तुम भये सरोवर, मै भइ मछिया ।
तुम भये तरुवर, मै भइ पखिया ॥ जो पिया ॥
तुम भये चंदा, मै भइ तारा
तुम भये मोतीं, मै भइ धागा ॥ जो पिया ॥
तुम भये सोना, मै भइ सुहागा ।
मिरा कहे प्रभू तुम ब्रिजवासी
तुम भये ठाकूर, मै भइ दासी ॥ जो पिया ॥

तो खिडकीजवळ उभा राहून तें भजन तन्मयतेनें ऐकत होता. त्या तंद्रींत दादासाहेब आणि इतर मंडळी दिवाणखान्यांत येऊन केव्हां बसली, तें त्याला कळ-

लेंहि नाहीं. हुजऱ्यानें त्याच्या जवळ येऊन विड्याचें तबक जेव्हां त्याच्यापुढें धरलें, तेव्हां त्याची ती गानसमाधि भंग पावली आणि त्यानें तबकांतून विडा घेऊन तो तोंडांत कोंबला.

तें भजन आतां संपलें होतें. पण त्यांतल्या ध्रुपदाच्या

जो पिया तोड्डू पिया मै नहि तोड्डू ।
तोरि प्रीत तोड्डू कान्हा कोन संग जोड्डू ॥

या आर्तमधुर ओळी कांहीं केल्या त्याच्या मनांतून जाईनात. त्याच्या हृदयांतले प्रीतीचे सगळे कोमल आणि मुग्ध भाव त्या भजनानें हळुवारपणानें चाळविले होते.

दादासाहेब आपल्या भोंवतालच्या मंडळीशीं गप्पा मारण्यांत गर्क आहेत असें पाहून तो दिवाणखान्यांतून निसटला आणि आपल्या खोलींत आला; व लगेच त्यानें कपडे घातले.

तो खोलींतून बाहेर येतांच चपराशानें सायकल दिवा लावून त्याच्यापुढें उभी केली आणि तो फाटकांतून बाहेर पडला.

शारदीय अष्टमीचें सुंदर चांदणें सृष्टीवर पडून अत्यंत प्रसन्न अशी शांतता स्थिर-चरांत भरली होती. स्वस्तिकाचीं आणि सायलीचीं पांढरीं शुभ्र फुलें, चित्रांगाच्या फुलांचे पांढरे तांबडे घोस, उमलण्याच्या बेतांत असलेल्या चमेलीच्या लालसर नाजूक कळ्या व शेवंतीच्या फुलांचे पिवळे पांढरे गेंद हे शरदाच्या सुकोमल आभरणांचा गंध वाऱ्यावर उधळीत होते. वाऱ्याच्या झुळकांनीं झाडाचें एकाद दुसरें पान जेव्हां मध्येंच अंगावर पडे, तेव्हां पतझडीचा मोसम जवळ येत असल्याची जाणीव मनाला धक्का देत असे. शरदाची ती मंदगंधित मुखर शांतता हृदयांतल्या सगळ्या आर्त भावना आपल्या तरल चारुतेनें चाळवीत होती.

त्या छायासंमिश्र चांदण्यांत, त्या गंधमधुर शांततेंत, त्या वाऱ्याच्या किंचित् उष्ण किंचित् शीतळ झुळकांत मघांशी ऐकलेल्या त्या भजनाचे आर्त सूर दरवळलेले आहेत, असें सारखें त्याला वाटत होतें. त्या भजनाचे बोल त्या चांदण्यांत हेलावत होते, त्याच्या क्षुब्ध हृदयांत आंदोलत होते.

सीताबर्डीच्या टेकडीला वळसा घालून रेल्वेच्या पुलापाशीं येतांच बंगाली देवीचें दर्शन घेण्यासाठीं आणि पूजाप्रदर्शन पहाण्यासाठीं चाललेल्या लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्याला भेटल्या. त्या गर्दीतून सायकल पिटाळीत तो नागनदीच्या पुलापाशीं येऊन

पोंचला आणि त्याच्या मनांत क्षणमात्र असा विचार आला कीं, चंदनच्या घरीं सरळ न जातां आपण प्रथम अभिमन्यूकडे जावें आणि तिथें तिला बोलावून घ्यावी.

पण, तसें करणें कोणत्याच दृष्टीनें सोईचें होणार नाहीं, हें दुसऱ्याच क्षणीं त्याच्या लक्षांत आलें; व त्यानें उंटखान्याकडे सायकल वळवली.

चंदनच्या घरासमोर येतांच तो सायकलवरून खालीं उतरला आणि त्यानें हांक मारली—

"चंदन, चंदन—"

त्याबरोबर छपरींत बसलेल्या येसूनें पुढें येऊन त्याला विचारलें—

"कोण पाहिजे तुम्हांला?—"

"मी चंदनला भेटायला आलोंय. ती घरीं आहे का?—"

"नाहीं. ती मिशनमध्यें गेली आहे. नांव काय तुमचं?—"

"अवधूत देशपांडे—"

त्यानें आपलें नांव सांगावयाला आणि रखमा बाहेर यावयाला एकच गांठ पडली. तिनें त्याच्याकडे पाहून विचारलें—

"काय काम आहे तुमचं या वेळीं तिच्याशीं?—"

"कांहीं जरूरीच्या कामासाठीं भेटायचंय तिला. ती मिशनमध्यें आहे ना? मग तिथंच जातों मी—"

आणि रखमा त्याला कांहीं बोलणार, तोंच सायकलवर बसून तो चालूं लागला.

मिशनच्या फाटकांतून आंत शिरतांच व्हरांड्यांत सिस्टर ख्रिश्चियाना जवळ बोलत बसलेली चंदन त्याच्या दृष्टीस पडली. त्याला पहातांच ती आश्चर्यानें उद्‌गारली—

"इकडे कुणीकडे तुम्ही या वेळीं?—"

"तुलाच भेटण्यासाठीं आलोंय—"

आणि त्यानें सिस्टरला अभिवादन करून म्हटलें—

"गुड नाईट, सिस्टर—"

"गुड नाइट, अवधूत. फार दिवसांनीं आलांत—"

सिस्टरनें जपमाळेचे मणि ओढीत हंसून म्हटलें.

पण तिला त्याच्याशीं जास्त बोलूं न देतां चंदननें मध्येच विचारलें—

"तुम्ही घरीं गेलां होतात माझ्या?—"

" हो, म्हणूनच इथं आलोंय मी. तुला आत्तांच्या आत्तां भेटणं जरूरच होतं अगदीं— "

" मायनं सांगितलं तुम्हांला मी इथं असल्याचं ?— "

" नाहीं. तुझ्या आजीनं सांगितलं. पण तुझ्या आईनंहि पाह्यलं मला— "

त्याचें तें उत्तर ऐकल्यावर चंदन क्षणमात्र स्तब्ध होती. तोंच त्यानें विचारलें–

" तूं जरा बाहेर येतेस माझ्याबरोबर ?— "

" बाहेर कुठं ?— "

" मला तुझ्याशीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टी बोलायच्या आहेत. आपण कुठं तरी निवान्त ठिकाणीं जाऊन बसूं या थोडा वेळ— "

" तुम्हांला इथंहि बसतां येईल— "

सिस्टरनें मध्येंच सुचविलें.

" पण इथं नको, मावशी. माय कदाचित् तपास करायला येईल माझा यांच्या मागोमाग—"

आणि लगेच चंदन त्याला म्हणाली—

" मी येतें. पण शक्य तितक्या लवकर परत आलं पाहिजे मला. तुम्हांला माहीतच आहे सगळी परिस्थिति--"

" ठीक आहे--"

तो म्हणाला आणि त्यानें सायकल वळवून सिस्टरला म्हटलें--

" गुड नाईट, सिस्टर. पुन्हा केव्हांतरी येईन सवडीनं भेटायला. आज घाई आहे फार— "

" गुड नाईट—"

सिस्टरनें म्हटलें आणि चंदनच्या कपाळाचें चुंबन घेऊन ती उद्गारली—

" प्रभु तुमचं कल्याण करो— "

फाटकाबाहेर येतांच ती त्याच्या सायकलच्या मागल्या बाजूला बसली आणि त्यानें झपाट्यानें उमरेड रस्ता गांठला.

दोघेंहि स्तब्ध होतीं. चंदनच्या मनांत हा एकच विचार सारखा थैमान घालीत होता,–आपण घरीं गेल्यावर आई आपल्याला काय म्हणेल ? या सगळ्या प्रकाराचें पर्यवसान अखेर कशा रीतीनें होईल ?

सक्करदऱ्यावरून थोडें पुढें गेल्यावर रस्त्याला लागून असलेल्या एका शेतांतला

मारुतीचा ओटा त्यांच्या दृष्टीस पडला. त्याच्या कडेला सायकल उभी करून तीं दोघें तेथें बसलीं.

चंद्र आतां क्षितिजावर उतरला होता. त्याची रुंदावलेली किंचित् आरक्त कोर सक्करदऱ्यांतील लक्ष्मीनारायणाच्या पांढऱ्या शुभ्र मंदिराच्या शिखरावर तेजाचा वर्षाव करीत होती; व तिच्या धवल प्रभेंत तें मंदिर पाषणांऐवजीं कापरानें बांधलें असल्याचा भास होत होता. विशेषतः क्षितिजाच्या सुनील रेषेला समांतर असलेल्या आम्रवृक्षांच्या काळ्याभोर डेरेदार छायाकृतींत त्या उंच शिखराची चांदण्यानें उजळलेली कर्पूरकांति फार खुलून दिसत होती. चंद्रकलेच्या खालच्या बाजूला क्षितिजावर विखुरलेल्या धनुराशीच्या तारका पाहून पेटत्या फुलझडींतून पडणाऱ्या मनोहर स्फुलिंगांचें दृश्य डोळ्यांपुढें उभें रहात होतें. पूर्व क्षितिजाच्या कडेला धुक्याचा निळसर दाट थर पसरला होता. त्यांतून लुकलुकणारे दूरदूरचे दिवे बघून नदीच्या पात्रांत सोडलेल्या तरत्या दिव्यांची आठवण होत होती. विश्वामित्राचा उन्हाळा अद्याप संपला नव्हता. त्यामुळें दिवसभर पडलेल्या कडक उन्हानें होरपळून निघालेली ओली जमीन आतां उरीं फुटून धाप टाकीत होती. पण वाऱ्याच्या झुळका मात्र त्या सतेज गाढ शांततेंत गारवा उत्पन्न करीत होत्या.

ओटयावर बसल्याबरोबर अवधूत चंदनला म्हणाला--

" गेल्या वर्षी तू मनाई केली होतीस मला तुझ्या घरीं यायला आठवतं तुला ?-- "

" हो. मी कशी विसरेन ती गोष्ट ? मग आज कां आलांत तुम्ही ?--"

" आज माझ्या वडलांनीं तुला जातांना पाहिली आणि नंतर माझ्या खोलीत येऊन मला सांगितलं कीं, ही मुलगी पुन्हा येतां कामा नये आपल्या घरीं न् हिच्याशीं तूं कोणत्याहि प्रकारचा संबंधहि ठेवतां कामा नयेस-- "

" असं सांगायचं कारण ?-- "

" तेंच विचारायला आलोंय मी तुला. तूं मला आपल्या घरीं यायला कोणत्या कारणामुळें मनाई केली होतीस, हें जर तूं मोकळ्या मनानं सांगितलंस, तर उलगडा होईल या सगळ्या प्रकाराचा. माझी अशी खात्रीं झाली आहे अगदीं कीं, या दोन्ही गोष्टींचा कांहींतरी विलक्षण संबंध असावा-- "

पण ती कांहीं बोलली नाहीं. तो थोडा वेळ थांबून म्हणाला—

" चंदन, तूं पूर्वी मला केलेल्या त्या मनाईत आणि आज दादांनीं केलेल्या य

मनाईंत आपल्या दोघांच्या जीवनावर विदारक परिणाम करणारं कांहीं तरी रहस्य आहे. तें रहस्य तुला माहीत असलं पाहिजे. तें तूं मोकळ्या मनानं सांग मला. म्हणजे या संकटांतून मार्ग कसा काढायचा तें ठरवूं आपण— ”

तिच्या डोळ्यांतून टपटपां अश्रु पडूं लागले. पण ती कांहीं बोलेना.

त्यानें तिचे हात हळूच आपल्या हातांत घेतले आणि तो म्हणाला—

“ चंदन, आज तरी तूं लपवतां कामा नयेस कांहींहि माझ्यापासून. माझी खात्री आहे कीं, मला जर सगळ्या गोष्टी कळल्या, तर मी मार्ग काढीन या प्रसंगांतून—”

“ नाहीं अवधूत, ती गोष्ट शक्य नाहीं. या भोंवऱ्यांतून आपण बाहेर पडूं असं मला तरी वाटत नाहीं. मी तुम्हांला केलेल्या मनाईचं कारण अगदीं साधं आहे— ”

आणि तिनें थोडक्यांत त्या दोन्ही घराण्यांचा पूर्ववृत्तांत त्याला सांगितला.

“ पण तुझ्या आईला मी कोण आहें हें कळल्यावर तिनं कांहीं मनाई केली नाहीं तुला माझ्याशीं संबंध ठेवायची ? — ”

“ नाहीं पण ती केव्हां मनाई करील याचा कांहीं नेम नाहीं. आणि जेव्हां तिच्या तोंडून तो मनाईचा हुकूम निघेल, तेव्हां मला गत्यंतर उरणार नाहीं. तो निमूटपणें ऐकल्याशिवाय. पण तुमच्या वडलांनीं माझ्याशीं संबंध ठेवण्याची मनाई तुम्हांला का करावी, हें मात्र मला कळत नाहीं. माझ्या आईचा न् आजीचा त्यांच्यावर राग असावा हें अगदीं स्वाभाविक आहे. पण, त्यांचा राग त्या दोन निराधार विधवांवर का असावा आणि त्यांनीं तुम्हांला माझ्याशीं संबंध ठेवायला मनाई का करावी, हें कोडं कांहीं उलगडत नाहीं मला— ”

“ खरं आहे. तूं जी हकीगत आतां सांगितलीस तींत त्यांचा तुमच्यावर दंश असण्यासारखं कांहीं कारण दिसत नाहीं मला. याच्यापेक्षां जास्त कांहींतरी झालेलं असावं; त्यांच्या मनांत कायमचं शल्य उत्पन्न करण्यासारखी कांहींतरी गोष्ट घडलेली असावी. ती तुझ्या आईला आणि आजीला खात्रीनं माहीत असेल— ”

“ माहीत असली, तरी ती आपल्याला कशी कळणार ? मायला कांहींहि विचारणं शक्य नाहीं या बाबतींत— ”

तिच्या त्या उत्तरावर तो कांहीं बोलला नाहीं.

तीहि स्तब्ध होती.

कांहीं वेळानें त्यानें तिला विचारलें--

" चंदन, मग यांतून मार्ग कसा काढायचा ?-- "

" मार्ग ? मार्ग एकच आहे आणि तो म्हणजे या क्षणींच एकमेकांचा शेवटला निरोप घ्यायचा-- "

ती हंसून म्हणाली.

पण दुसऱ्याच क्षणीं तिचे डोळे भरून आले.

त्यानें तिचे दोन्ही हात घट्ट धरले आणि आपली तेजस्वी दृष्टि तिच्या अश्रुपूरित दृष्टींत मिसळून म्हटलें—

" चंदन, अगदीं मनापासून सांग मला. तूं म्हणतेस त्या मार्गानं जाणं शक्य आहे आपल्याला ?-- "

ती कांहीं बोलली नाहीं. तिच्या डोळ्यांना धारा लागल्या होत्या.

" चंदन, नाहीं तरी मला घर कायमचं सोडावंच लागणार आहे आज ना उद्यां चळवळीपायीं. त्यानंतर मी मोकळा आहे माझ्या मनाप्रमाणं वागायला-- "

" तुम्ही मोकळे असाल, अवधूत; पण मी नाहीं. माझ्या आईच्या, माझ्या आजीच्या सगळ्या आशा माझ्यावर आहेत; त्यांचा सगळा जीवभाव माझ्या भवितव्यांत गुंतलेला आहे. मी त्यांना सोडूं शकत नाहीं, अवधूत— "

" मग तूं काय मला सोडणार, चंदन ?— "

त्यानें एकदम तिचे हात सोडून देऊन आवेशानें विचारलें. आणि नंतर तो म्हणाला—

" मीहि माझ्या वडलांचा एकुलता एक मुलगा आहें न् त्यांच्याहि सर्व आशा आतां माझ्यावर आहेत. पण मी असं समजतों कीं, माझं भवितव्य हें त्यांच्यावर सोंपवून माझं निभणार नाहीं. त्यामुळं सर्वनाश होईल माझा. माझं व्यक्तित्व, माझ्या आकांक्षा, माझं जीवन हें सगळं अगदीं निराळं आहे त्यांच्या कल्पनांपेक्षां; न् त्या सगळ्यांच्या सफलतेसाठीं तुझं साहचर्य हवं आहे मला— "

" तुम्ही म्हणतां तें सर्व समजतं मला, अवधूत. पण तुमचा ध्येयवाद, तुमचं सामर्थ्य माझ्यांत नाहीं; आई-आजीच्या मायेचे धागे तोडून टाकायला जो मनाचा निग्रह, जो निष्ठुरपणा हवा तो माझ्या ठिकाणीं नाहीं. त्यांच्या आयुष्याचे थोडे दिवस उरले आहेत आतां. ते दुःखमय करायची इच्छा नाहीं माझी— "

" आणि त्यांच्या आयुष्याच्या त्या थोड्या दिवसांसाठीं तुझ्या सगळ्या आयुष्याचा नाश करणार तूं आपल्या हातांनीं ?— "

" होय अवधूत— "

तिनें आपल्या डोळ्यांत दाटलेल्या अश्रूंचा लोट आवरण्याचा प्रयत्न करीत म्हटलें.

त्यानें एकदम तिचें अश्रूंनीं भिजलेलें तोंड दोन्ही हातांनीं वर उचललें आणि तो अत्यंत आर्तवाणीनें उद्गारला—

" चंदन, चंदन, तूं खरंच मला सोडणार ?— "

" नाहीं, नाहीं. तुम्हांला सोडावं असं कसं वाटेल मला ? पण त्यांनाहि सोडायची इच्छा नाहीं माझी. तुम्ही मला प्रिय आहांत; त्यांच्यापेक्षां, माझ्या स्वतःहिपेक्षां प्रिय आहांत. पण तुम्हांला तुमच्या स्वतःच्या आकांक्षा आहेत, तुमचं स्वतःचं जीवन आहे. मी तुम्हांला सोडलं तरी तुमचं चालूं शकेल. तुमच्या उद्योगांच्या व्यापांत तुम्ही उद्यां विसरून जाल मला. मी तुम्हांला प्रिय असलें, हवीशी वाटत असलें, तरी तुमचं जीवन माझ्यावर अवलंबून नाहीं; तुमच्या आकांक्षांचा मी कांहीं एकमेव आधार नाहीं. पण, मी जर माझ्या आईला न् आजीला तुमच्यासाठीं सोडलं, तर त्यांचं कसं होईल ? त्यांना दुसरें कोण आहे ? त्यांच्या आयुष्यांत दुसरं काय आहे ? नाहीं, नाहीं, मी त्यांना सोडूं शकत नाहीं, अवधूत— "

## वचन नाकारलें

# १७

चंदन परत आली, त्या वेळीं येसू छपरींत बसून तिची वाटच पाहात होती. ती चंदनला म्हणाली—

" कुठं होतीस पोरी, इतका वेळ ? तुझ्या मायनं म्हटलं म्हणून मी मिशनमध्यें बघून सुद्धां आलें. तर सिस्टरनं सांगितलं त्या देशपांड्याबरोबर तूं कुठं बाहेर गेलीस म्हणून. ही काय रीत झाली का ? तुझ्यासारख्या तरण्याताठ्या मुलीनं असं रात्रीच्या वेळीं हिंडणं बरं दिसतं का चंदन ?—— "

आपली आजी जें हें आपल्याला बोलली, त्यांत तिच्या स्वतःच्या रागापेक्षां आईच्या रागाचा भाग जास्त असावा, याची चंदनला जाणीव होती. म्हणून, आंतल्या बाजूला अंथरुणावर पडलेल्या रखमाच्या कानांवर आपलें बोलणें जावें या हेतूनें ती अंमळ मोठ्यानेंच म्हणाली—

" रागावूं नको माय माझ्यावर. तूं म्हणतेस तें खरं आहे अगदीं. पण आज-वर कधीं मी बाहेर गेलें होतें का तुम्हांला विचारल्याशिवाय ? पण आज ते एकाएकीं आले आणि अगदीं निकडीचं काम होतं त्यांचं, त्यामुळें निरुपाय झाला माझा— "

" रात्रीच्या वेळीं कसलीं आलीं आहेत ग कामं ? सारा दिवस बाहेर असतेस तें पुरं नाहीं का होत ? तुझी माय म्हणत होती तेंच खरं. थांब, येत्या मार्गेसरांत लग्न करून टाकतें मी तुझं. तूं सारा दिवस बाहेर असतेस त्याबद्दल नाहीं म्हणत आम्हीं तुला कधीं कांहीं. पण आजचं हें तुझं मायला विचारल्याशिवाय बाहेर जाणं अगदीं गैर होतं पोरी— "

" खरं आहे माय तुझं म्हणणं. मी पुन्हा जाणार नाहीं मायला विचारल्या-शिवाय कुठं. पण रागावूं नकोस गडे तूं अशी माझ्यावर— "

तिनें एकदम येसूला बिलगून म्हटलें. तिच्या डोळ्यांतून अश्रु पडूं लागले होते. पण येसूच्या तें लक्षांत आलें नाहीं. ती चंदनच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवून म्हणाली—

" बरं, बरं ! मोठी लाघवी आहेस तूं, पोरी. जा, तोंडावरून पाण्याचा हात फिरव न् नीज चटकन्— "

चंदन अगदीं गुपचूप आंत गेली आणि तोंडावर थंड पाण्याचा शिडकावा करून खाटेवर येऊन पडली.

पण तिला कांहीं केल्या झोप येईना. पलिकडल्या खाटेवर निजलेली आपली आई सारखी या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत होती, हें तिला दिसत होतें. त्यामुळें, उद्यां सकाळीं आई आपल्याला काय म्हणेल, याबद्दल नाना प्रकारच्या शंका तिच्या मनांत येत होत्या.

अवधूतची आणि आपली ओळख आहे, हें जरी आईला कळलें होतें, तरी त्या-बद्दल तिनें नंतर चकार शब्दहि काडला नव्हता. पण, आज रात्रीच्या वेळीं तो आपल्याकडे आला आणि आपण घरीं कांहीं न कळवितां परस्पर त्याच्याबरोबर बाहेर गेलों, हें पाहून तिला काय वाटलें असेल ? आपली आणि त्याची ओळख असली, तरी त्याच्याशीं आपला तसा विशेष संबंध नाहीं, असें आपण तिला त्या दिवशीं भासविलें होतें. पण, आजचा हा प्रकार बघितल्यावर तिच्या मनांत काय आलें असेल ? आपण तिला सगळ्या गोष्टी सांगितल्या नाहींत किंबहुना तिला फसवण्याचा प्रयत्न केला, अशीच तिची कल्पना झाली नसेल काय ? त्यामुळें, आपल्यावरला तिचा विश्वास अजिबात नष्ट होऊन, तिनें जर अवधूतशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध या पुढें ठेवूं नकोस असें उद्यां आपल्याला सांगितलें, तर त्यांत तिचा काय दोष ? छे, छे, तिला अर्धवट गोष्टी सांगण्यांत, तिची पर्यायानें फसवणूक करण्यांत आपली अक्षम्य चूक झाली. त्या चुकीचें जें काय प्रायश्चित्त ती आपल्याला देईल, तें आतां मुकाट्यानें भोगणें प्राप्त आहे.

पण आईला सगळ्या गोष्टी स्पष्ट सांगणें शक्य होतें का ? आपण मावशीजवळ ज्याप्रमाणें या बाबतीत अगदीं मोकळेपणानें बोललों, तसें तिच्याजवळ बोलणें आप-ल्याला शक्य होतें का ? देशपांड्यांचें नांवहि स्वतःसमोर काढलेलें तिला खपत नाहीं.

आपल्या आजीचा देशपांड्यांवर राग असला, तरी तिच्या आणि आईच्या रागांत पुष्कळच फरक आहे. देशपांड्यांनीं आपलें घरदार लुबाडलें, एवढ्याचबद्दल जर हा राग असेल, तर तो दोघींना सारखाच असावयाला नको होता का ? मग आपल्या आईच्या अबोल रागांतला तीव्र जहरी दंश आजीच्या रागांत का दिसत नाहीं ? आपल्या आईच्या रागाला त्याशिवाय आणखी कांहीं कारण असेल का ? अवधूत मघाशीं म्हणाला त्याप्रमाणें आपल्या आईचा हा राग आणि त्याच्या वडलांनीं आपल्याशीं संबंध ठेवायला त्याला केलेली मनाई या दोहोंत त्याच्या आणि आपल्या प्रणयजीवनावर विदारक परिणाम करणारें कांहीं रहस्य खरोखरीच असेल का ? तें रहस्य आपल्याला कसें कळेल ? तो म्हणाला तसें रहस्य जर खरोखरीच असेल, तर आपली आणि अवधूतची कायमची ताटातूट होणें अपरिहार्य नाहीं का ?

त्या कल्पनेचा घाव तिच्या हृदयावर बसतांच पुन्हा तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले आणि त्या शोकसंतप्त स्थितींतच केव्हांतरी तिचा डोळा लागला.

पण, पहाटे पावणे सहाला गिरणीचा पोंगा होतांच ती नेहमींप्रमाणें अंथरुणावरून उठली आणि अंगणांत आली. पूर्वेकडील क्षितिज सतेज होऊन त्यावर विखुरलेल्या कोरड्या ढगांवर कुठें कुठें लाल तकतकीत रेषा उमटलेल्या होत्या. आकाशांतले तारे बहुतेक आतां मावळण्याच्या बेतांत आले होते. पण, रोहिणीचा पाठलाग करीत नभोमध्यावर येऊन ठेपलेला मृग मात्र अद्याप लखलखत होता; व त्याच्या उत्तरेला पुनर्वसूंच्या मधोमध असलेला गुरु आपल्या रम्य प्रभेनें व्याधाला लाजवीत होता. वर्षाकालाचा अंत सुचविणाऱ्या अगस्तीला मात्र दक्षिण क्षितिजावरील अभ्रांनीं गिळून टाकलें होतें. अंगणांत पहांटच्या गार वाऱ्यावर आपला गंध उधळणारीं चमेलीचीं आणि स्वस्तिकाचीं फुलें खदखदां हंसत होतीं.

तेरा वर्षांपूर्वीं चंदन जेव्हां त्या घरांत रहावयाला आली, तेव्हां अंजिरा मावशी-कडून कलम आणून तिनें तो चमेलीचा वेल लावला होता. त्याच्या मोठ्या थोरल्या मांडवाभोंवतीं आपले ठिपकेदार पंख हलवीत मैना जेव्हां नाना परीचे गोड आवाज काढीत उडत आणि तिनें फेकलेले ज्वारीचे दाणे टिपण्यासाठीं धिटाईनें ठुमकत ठुमकत सगळ्या अंगणभर पिंगा घालीत, तेव्हां चंदनला वाटे, आपल्या बगीचाला वळसा घालून जाणारा वर्धेचा प्रवाहच काय तो इथें आतां कमी आहे.

त्या मांडवाजवळ उभी राहून ती वेणीसाठीं फुलें तोडीत असतां येसूनें तिला हांक मारून म्हटलें—

" का ग, चहा ओतला ना मी. पण तुझी माय तर उठली नाहीं अजून—"

तिचे ते शब्द ऐकतांच चंदनच्या हृदयाला चरका बसला. तिच्या मनांत आलें, पावणे सहाच्या पोंग्याबरोबर रोज नेमानें उठणारी आपली आई आज अजून का उठली नाहीं? तथापि तिनें येसूला म्हटलें—

" काल उशीर झाला निजायला म्हणून उठली नसेल. पण ती वेळेवर उठेल आपल्या— "

त्या दोघींनीं चहा घेतला, चंदनची वेणीफणी उरकली आणि पावणे सातचा पोंगाहि झाला. पण रखमा कांहीं उठली नाहीं. तेव्हां येसूनें तिला जवळ जाऊन विचारलें—

" सूनबाई, आज जिवाला बरं नाहीं का तुझ्या?— "

" हो. रात्री थोडी कसर आली होती असं वाटतं— "

रखमानें तोंडावरलें पांघरूण काढून सासूला म्हटलें.

" मग जाऊं नकोस कामावर. आजच्या दिवस झाला नागा, तरी चालेल. उद्यां सुटीच आहे दसऱ्याची. दोन दिवसांच्या विश्रांतीनं आराम वाटेल तुझ्या जीवाला. मी गवती चहा करून आणतें तुझ्यासाठीं थोडा— "

येसू आंत गेली आणि रखमानें पुन्हा तोंडावर पांघरूण घेतलें.

चंदननें तो संवाद जवळच उभें राहून ऐकला होता. पण आईपाशीं जाऊन तिला कांहीं विचारण्याचा हिय्या मात्र चंदनला होईना. गेल्या बारा तेरा वर्षांत आपली आई कधीं आजारी पडली नाहीं आणि संपाच्या दिवसांशिवाय तिनें कधीं नागाहि केला नाहीं. ती यंत्राप्रमाणें वक्तशीर काम करणारी आपली करारी आई आज एकाएकीं आजारी पडली!—चंदनच्या लक्षांत आला त्या आजाराचा अर्थ.

आज शनिवार असल्यामुळें तिला कॉलेज नव्हतें; व कांहीं वाचण्याकडेहि तिचें मन लागेना. म्हणून ती माजघरांतच कसा तरी वेळ काढीत होती.

तोंच येसूनें तिला हांक मारून म्हटलें—

" गुळणा करायला गरम पाणी दे हें तुझ्या मायला. मी चहा आणतें लगेच—"

गरम पाण्यानें भरलेला तो स्वच्छ गडवा घेऊन चंदन आईच्या खाटेजवळ आली आणि म्हणाली—

" माय, तूं उठून चूळ भरते ना? मोठी माय आतां चहा आणील— "

त्याबरोबर रखमा तोंडावरलें पांघरूण काढून उठून बसली आणि तांबारलेल्या फुगीर डोळ्यांनीं तिच्याकडे पाहून म्हणाली—

" इथं कशाला आणलंस पाणी ? मी आत्तां तोंड धुवून येतें नळावरून— "

तिचे ते त्रासलेले डोळे, जिवणीपाशीं पडलेल्या दाट खोल सुरकुत्या आणि भांगाच्या रेषेपासून कानशिलाकडे पांढरे होत गेलेले केस—चंदनला वाटलें, आज प्रथमच आपल्या आईचें उतारवय आपल्या लक्षांत येत आहे का ?

रखमा उठून आंत जातांच तिनें अंथरूण झटकून पुन्हा घातलें आणि वेणी-फणीची पेटीहि तिथें आणून ठेवली.

रखमा परत आली, ती खाटेवर न निजतां खालीं जमिनीवर बसून वेणी उकला-वयाला लागली. तेव्हां चहा घेऊन आलेल्या येसूनें तिला म्हटलें—

" आतां कशाला घालतेस वेणी ? चहा घेऊन निजून रहा थोडा वेळ. म्हणजे घाम निघेल न् बरं वाटेल— "

" मला तसं कांहीं विशेष होत नाहीं, सासूबाई. रात्रीं झोंप नाहीं लागली चांगली त्यामुळं थकल्यासारखं वाटतंय इतकंच— "

" ही आली तेव्हां जागीच होतीस तूं ?— "

" हो— "

रखमानें तेवढा एक शब्द उच्चारला आणि विषय बदलण्यासाठीं म्हटलें—

" उद्यां दसरा आहे हें लक्षांत आहे ना तुमच्या ? मग काय सामान आणायचं असेल तें आतांच आणलेलं बरं— "

" तुझ्या जिवाला बरं नाहीं. मग कशाला उगाच सामान आणायचं ?— "

येसू उदासपणानें म्हणाली.

" तुम्ही काळजी करूं नका उगाच. मला बरं वाटेल आणखी तासा दोन तासांत. शिवाय उद्यां संध्याकाळीं सोनं द्यायला मंडळी येतील अंजिरा सासूबाई-कडली, त्यांना द्यायला नको कां कांहीं फराळाचं ?— "

" मग मी बाजारांत आतांच जाऊं म्हणतेस ? वास्तविक उद्यां इतवार आहे. उद्यांच जाणं सोईचं नाहीं का ?— "

" उद्यां दसरा. त्यामुळं सगळं कांहीं दुपटी तिपटीनं महाग भेटेल. म्हणून म्हणतें आजच जाऊन या चटकन ऊन तापण्यापूर्वी— "

" आज अंजिराकडे जेवायला जायचंय रात्रीं हें लक्षांत आहे ना तुझ्या?— "

" हो. मला बरं वाटलं संध्याकाळपर्यंत तर येईन मी. नाहीं तर मग तुम्ही दोघी जा-- "

" तें मी पहातें. मी बाजारांत जातांना वाटेंत डोकावून जाईन तिच्या घरीं. आज नवरात्र उठायचं त्यांचं. तेव्हां ती गडबडींतच असेल— "

येसूनें एक त्यांतल्या त्यांत मोठी पिशवी घेतली आणि ती चंदनला चुलीकडे लक्ष ठेवायला सांगून बाहेर पडली.

ती पायऱ्या उतरते न उतरते, तोंच रखमा चंदनला हांक मारून म्हणाली—

" चंदन, माझी वेणी घालून दे बाई-- "

आईची ती आज्ञा ऐकून चंदनला आश्चर्य वाटलें. कारण रखमाला दुसऱ्याकडून कोणतीहि शरीरसेवा करून घेण्याचा अगदीं कंटाळा होता. शिवाय, थोड्याच वेळा-पूर्वी चंदननें आणलेल्या गरम पाण्याकडे ढुंकूनहि न पहातां ती नळावर जाऊन तोंड धुवून आली होती. त्यामुळें तिनें वेणी घालून देण्यासाठीं हांक मारली, तेव्हां चंदनच्या पोटांत धस्स झालें.

पण ती मुकाट्यानें जवळ आली आणि रखमाच्या पाठीमागें बसून तिचे रेशमा-सारखे मऊ लांब सडक केस कंगव्यानें विंचरावयाला प्रारंभ केला. तिनें केसांतून कंगवा एकवार पुरता फिरवला नसेल, तोंच रखमानें विचारलें—

" काल कुठं गेली होतीस तूं चंदन त्याच्याबरोबर ?-- "

तो प्रश्न कानांवर पडतांच चंदनचा हात एकदम थांबला आणि ती घुटमळली. तोंच रखमानें विचारलें—

" मला सांगण्यासारखं नाहीं का तें ?-- "

" नाहीं माय. तुला न सांगण्यासारखं, तुझ्यापासून लपवण्यासारखं कांहींहि घडलेलं नाहीं माझ्या हातून अद्याप— "

" मग सांग ना काल कुठं गेली होतीस तें चटदिशीं— "

" उमरेड रस्त्यावर गेलें होतें— "

" उमरेड रस्त्यावर न् तें कशासाठीं ?— "

" ते माझ्याशीं बोलायला आले होते कांहीं गोष्टी. तेव्हां कुठं तरी निवांतपणीं बसून बोलायचं म्हणून उमरेड रस्त्यावर गेलों आम्ही— "

" कसल्या गोष्टी सांगितल्या त्यानं तुला एवढ्या ?— "

रखमानें सरळ प्रश्न केला.

पण चंदन कांहीं बोलली नाहीं.

" कां ग, बोलत का नाहींस तूं ? समोर बस बरं आधीं माझ्या. वेणी मागाहून घाल माझी— "

चंदन मुकाट्यानें तिच्यापुढें येऊन बसली. पण ती कांहीं बोलली मात्र नाहीं.

रखमानें आपले भेदक डोळे तिच्या कातर मुद्रेवर रोखून म्हटलें—

" आतांच ना ग तूं मला म्हणालीस माझ्यापासून लपवण्यासारखं आपल्या हातून कांहीं घडलं नाहीं म्हणून ? मग आतां उत्तर कां नाहीं देत माझ्या प्रश्नाचं ?—"

तत्क्षणींच चंदननें वर पाहिलें आणि आईच्या नजरेला नजर देऊन ती म्हणाली—

" माय, तुझ्यापासून कांहींहि लपवायची इच्छा नाहीं मला. मी काल दुपारीं त्यांच्याकडे गेलें होतें. त्या वेळीं त्यांच्या वडलांनीं मला पाहिली आणि तेव्हांपासून त्यांनीं मनाई केली त्यांना माझ्याशीं संबंध ठेवायची. ही गोष्ट सांगायला आले होते ते मला काल रात्रीं— "

तिचें तें उत्तर ऐकून रखमा अगदीं सुन्न होऊन गेली. इतकी कीं, तूं त्याच्याकडे कशाला गेली होतीस, वगैरे चौकशी करण्याचेंहि भान तिला उरलें नाहीं. तिच्या चरे पडलेल्या कपाळावरील आंठ्या अधिकच दाट झाल्या आणि तिच्या त्रस्त डोळ्यांत एकदम त्वेषाची चमक उफाळली.

" माय, मी आजवर तुला सांगितली नव्हती एक गोष्ट. त्यांच्या आणि आपल्या घराण्याचा संबंध कशा प्रकारचा आहे हें जेव्हां तुमच्या बोलण्यावरून मला कळलं, तेव्हां मी त्यांना सांगून टाकलं तुम्ही आमच्या घरीं कधीं येऊं नका म्हणून— "

" का सांगितलंस तूं त्याला असं ?— "

" मला वाटलं ते आपल्या घरीं आलेले तुम्हांला आवडणार नाहींत— "

" मग ही गोष्ट लपवली नाहींस तूं माझ्यापासून ?— "

" नाहीं माय, त्यांच्याविषयीं बोलण्याचा प्रसंगच मुळीं आला नव्हता पूर्वी कधीं. ज्या वेळीं आला न् तूं मला विचारलंस, तेव्हां मी अगदीं खरं खरं सांगितलं तुला— "

रखमा कांहीं बोलली नाहीं. पण तिच्या मनाचा क्षोभ तिच्या कपाळावरल्या आंठ्या, डोळ्यांतली चमक आणि श्वासाचा वेग यांवरून स्पष्ट दिसत होता.

" पण माय, एका गोष्टीचा उलगडा मात्र झालेला नाहीं मला. ते इथं आलेले तुम्हांला आवडणार नाहींत म्हणून मी त्यांना आपल्या घरीं यायला मनाई केली यांत कांहीं विशेष नाहीं. पण त्यांच्या वडलांनीं त्यांना माझ्याशीं संबंध ठेवायला मनाई का करावी? देशपांड्यांनीं आपली चंदनवाडी बळकावली न् आपल्याला देशोधडीला लावलं म्हणून त्यांच्यावर आपला राग असावा हें साहजिक आहे अगदीं. पण त्यांचा राग आपल्यावर कां असावा? आपण त्यांची कोणती आगळीक केली आहे?— "

आईशीं इतक्या नाजूक विषयावर इतक्या मोकळेपणानें बोलण्याचा चंदनचा हा पहिलाच प्रसंग होता. पण, आईच्या रागाला तोंड देण्याचा निर्धार केलेला असल्या- मुळें म्हणा किंवा स्वतःच्या वर्तनाच्या चोखपणाची खात्री असल्यामुळें म्हणा, ती एक प्रकारच्या विलक्षण धिटाईनें आज बोलत होती. तिच्या त्या धिटाईचें रखमाला नवल वाटल्याशिवाय राहिलें नाहीं.

पण ती स्तब्ध होती. चंदननें विचारलेल्या प्रश्नाला काय उत्तर द्यावें, हें तिला समजेना. देशपांड्यांच्या शेतावर ती काम करायला गेली असतां दादासाहेबांनीं तिला एकान्तांत गाठून केलेला अतिप्रसंग तिच्या डोळ्यांपुढें उभा राहिला; व आपण त्यांचा जो मनोभंग त्या दिवशीं केला, त्याचा दंश मनांत ठेवूनच त्यांनीं आपल्या मुलीशीं संबंध ठेवण्याची मनाई स्वतःच्या मुलाला केली असावी, हें तिच्या तत्क्षणींच लक्षांत आलें. पण, त्या लाजिरवाण्या प्रसंगाची वाच्यता चंदनजवळ करावी, आपल्या जीवनांतलें तें शल्य आपल्या मुलीला उघडें करून दाखवावें, असें तिला वाटेना.

पण त्याबरोबरच तिच्या प्रश्नाला कांहीं तरी उत्तर देणेंहि जरूर होतें. म्हणून रखमा म्हणाली—

" हो. त्यांनीं जसं आपलं नुकसान केलं, आपलं घरदार लुबाडून आपल्याला देशोधडीला लावलं, तशीच आपणहि त्यांची आगळीक केली आहे. त्यामुळंच त्यांनीं आपल्या मुलाला तुझ्याशीं संबंध ठेवूं नको म्हणून सांगितलं— "

" पण अशी कोणती आगळीक केली आपण त्यांची माय? गरिबाला श्रीमंताचं काय नुकसान करतां येणार?— "

" येतं केव्हां केव्हां. गरिबांनीं आपल्या दुष्ट वासनांचं खेळणं व्हावं अशी हांव जेव्हां श्रीमंतांना सुटते, तेव्हां जिवावर उदार होऊन त्या वासनांना लाथेनं ठोकरणारे

गरीब हे जन्मभर डोळ्यांत सलतात श्रीमंतांच्या. सत्तेच्या न् संपत्तीच्या जोरावर आपण काय वाटेल तें विकत घेऊं शकूं ही जी श्रीमंतांची घमेंड, ती घमेंड जिरवणाऱ्या गरिबांवर ते सापासारखा डूक धरतात— ”

आईच्या त्या बोलण्याचें मर्म चंदनच्या लक्षांत आलें. पण, दादासाहेबांची अशी कोणती आगळीक आपल्या आजीनें किंवा आईनें केली असावी, हें जाणून घेण्याची विलक्षण उत्कंठा तिला लागली होती. म्हणून तिनें विचारलें—

“ पण तुझ्या किंवा मोठ्या मायच्या हातून असं काय घडलं ग, कीं ज्याचा राग आतां तेरा चौदा वर्षांनीं त्यांनीं माझ्यावर काढावा ? सापसुद्धां आपला डूक बारा वर्षांनीं सोडून देतो म्हणतात— ”

पण, आपण बोललों, तेवढ्यावरच चंदननें समाधान मानावें आणि जास्त कांहीं चौकशी करूं नये, अशी रखमाची इच्छा होती. म्हणून ती किंचित् कठोरपणानें म्हणाली—

“ चंदन, आतां तूं विचारूं नकोस मला आणखी कांहीं. तूं त्याला आपल्या घरीं येऊं नको म्हणून सांगितलंस आणि त्याच्या वडिलांनीं तुला आपल्या घरीं यायला मनाई केली, यांतच सगळं कांहीं आलं— ”

आपल्या त्या तुसड्या उत्तरानें चंदन नेहमींप्रमाणें गप्प बसेल, अशी रखमाची अपेक्षा होती. पण ती खोटी ठरली. चंदननें लगेच विचारलें—

“ माय, तूं म्हणतेस तें खरं आहे. पण काल त्यांचं माझ्याशीं या बाबतींत अगदीं मोकळ्या मनानं बोलणं झालं. ते लवकरच घर सोडायच्या विचारांत आहेत; न् मग कांहीं त्यांना वडलांनीं केलेली मनाई पाळायचं कारणं नाहीं— ”

“ घर का सोडणार आहे तो ?— ”

“ तुला माहितीच आहे माय सगळं. वर्धा मिल्सच्या संपापासून बापलेकांचं बिनसत चाललं थोडं थोडं; न् अलिकडे या महागाईच्या चळवळींत ते भाग घ्यायला लागल्यापासून त्यांच्या वडलांनीं त्यांना वेगळं राह्यला सांगितलंय— ”

“ आणि तो बापापासून वेगळा निघाला म्हणजे तुझा न् त्याचा संबंध कायम राहील म्हणतेस ?— ”

“ हो— ”

चंदननें अगदीं प्रांजळ मनानें उत्तर दिलें. रखमा इतक्या संथपणानें तिच्याकडून सगळी परिस्थिति समजावून घेत होती कीं, तिच्याशीं मोकळेपणानें बोलण्यांत कांहीं

धोका आहे, असा यत्किंचित्‌हि संशय चंदनच्या मनाला शिवला नाहीं. शिवाय, आईशीं आज सगळ्या गोष्टी अगदीं स्पष्टपणानें बोलून टाकून एकदां मोकळें व्हावयाचें, असा तिच्या मनाचा निर्धार होऊन चुकला होता.

तिचें तें उत्तर ऐकल्यावर रखमा कांहीं वेळ अगदीं स्तब्ध होती.

आईच्या त्या स्तब्धतेचें चंदनला नवल वाटलें. पण तिनें आईला कांहीं विचारलें नाहीं आणि ती मुकाट्यानें उठून पुन्हा तिचे केस विंचरावयाला लागली.

त्याबरोबर रखमा तिचा हात अडवून म्हणाली—

" समोर बैस माझ्या. मला अजून तुझ्याशीं थोडं बोलायचंय— "

चंदन मुकाट्यानें उठून पुढें बसली आणि तिनें आईकडे पाहिलें.

रखमा अगदीं शांत होती. जणुं मृत्यूची गाढ पण भीषण शांति तिच्या हृदयांत आणि शरीरांत संचरून तिच्या सगळ्या वृत्तीला एक प्रकारचा भीतिप्रद ताठरपणा आला होता. तिच्या वृत्तींतली आणि दृष्टींतली ती शांति पाहून चंदनला गुदमरल्यासारखें झालें.

आणि मृत्युशय्येवर असलेल्या माणसानें जशी खोल आवाजांत आपली अंतिम इच्छा प्रकट करावी, त्याप्रमाणें ती एक एक शब्द सावकाश उच्चारीत म्हणाली—

" चंदन, मी आज एक वचन मागणार आहे तुझ्यापाशीं— "

ती क्षणैक थांबली. आपले करारी डोळे तिनें चंदनवर रोखले आणि ती पुन्हा अगदीं सावकाश म्हणाली—

" तूं आजपासून कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवतां कामा नयेस त्याच्याशीं—"

आईनें मागितलेलें तें वचन चंदनला अपेक्षित होतें. म्हणून तिनें आपल्या मनाचा तोल यत्किंचित्‌हि ढळूं न देतां लगेच विचारलें—

" माय, तूं असं कांहीं तरी मला सांगशील हें जाणून होतें मी; न् तुझं मन मोडण्याची इच्छाहि नाहीं माझी. पण त्यांच्या वडलांनीं दुष्टपणा केला, म्हणून ते कसे वाईट ठरतात हें सांग तूं मला--"

" तो वाईट आहे असं म्हणत नाहीं मी. मीं त्याला पाह्यलाय, त्याचं भाषणहि ऐकलंय. कदाचित् तो आपल्या बापासारखा नसेलहि. पण तो चांगला आहे किंवा वाईट आहे, हा प्रश्न नाहीं माझ्या पुढं. तो चांगला किंवा वाईट कसाहि असो तूं त्याच्याशीं संबंध ठेवतां कामा नयेस एवढंच म्हणणं आहे माझं—"

" पण का ? माय, मीं सगळ्या गोष्टी तुला स्पष्ट सांगितल्या, तसंच तूंहि मला सांग जें काय तुझ्या मनांत असेल तें— "

चंदननें कळवळून म्हटलें. त्याबरोबर इतका वेळ अगदीं संथपणानें बोलत असलेली रखमा एकदम उसळून उद्गारली—

" माझ्या मनांत ? माझ्या मनांत ? माझ्या मनांत ब्रह्मांड आहे, चंदन. पण तें तुला मी सांगण्याची गरज नाहीं. मी न सांगतां समजलं पाहिजे तें तुला— "

" रागावूं नको, माय. तूं त्यांच्याशीं संबंध ठेवायला मला पुढं मागं मनाई करशील असं वाटतच होतं मला; न् मीं तसं सांगूनहि टाकलं काल त्यांना— "

पण तिला पुढें बोलूं न देतां रखमा किंचित् उल्हासून मध्येंच उद्गारली—

" मग तर आतां या गोष्टीसंबंधीं मला बोलायची गरजच नाहीं मुळीं— "

" गरज आहे, म्हणून तर बोलतें आहे मी. तुलाहि असं वाटतंय कीं, ते आपल्या वडलांसारखे वाईट नाहींत; न् तरीहि तूं त्यांच्याशीं संबंध ठेवायला मनाई करतेस मला. या तुझ्या वर्तनाचा अर्थ कळत नाहीं मला— "

" त्याचा अर्थ अगदीं सरळ आहे. तुझा न् त्याचा संबंध कायम राहिला, म्हणजे त्या संबंधाचा शेवट अखेर कोणत्या गोष्टींत होईल हें स्पष्ट दिसतंय मला. म्हणून मी म्हणतें तूं त्याच्याशीं असलेला संबंध तोडून टाक आतांच— "

तिचें तें उत्तर ऐकून चंदन एकदम लाल होऊन गेली. तोंच रखमा पुढें म्हणाली—

" तुमचं दोघांचं एकमेकांवर प्रेम आहे, हें तूं लपवून ठेवूं नकोस माझ्यापासून. तूं त्या दिवशीं ज्या तऱ्हेनें तुझ्या न् त्याच्या ओळखीची हकीकत मला सांगितलीस, तिच्यावरूनच ताडला मीं सगळा प्रकार—"

" माय, तूं म्हणतेस तें खरं आहे अगदीं. आमचं एकमेकांवर प्रेम आहे; न् तूं जर त्या प्रेमाच्या आड आली नाहींस, तर त्याचं पर्यवसान जसं व्हायला हवं तसंच योग्य रीतीनं होईल— "

" त्याची खात्री नाहीं मला. त्याची न् तुझी ओळख आहे हें तूं मला सांगितल्यापासून गेल्या दोन दिवसांत सगळ्या बाजूंनीं विचार केला मीं या प्रश्नाचा. पण तूं जें म्हणतेस तें मुळींच शक्य नाहीं वाटत मला. शिवाय, ज्या माणसानं आमची बेइज्जत करून आम्हांला देशोधडीला लावलं, त्याच्या मुलावर तुझं प्रेम जडावं हें खरोखरीच दुर्दैव आहे आमचं— "

" नको माय, असं नको बोलूं. ते किती चांगले आहेत, किती करारी न् प्रामाणिक आहेत याची कल्पना नाहीं तुला— "

" तूं जग पाहिलेलं नाहींस अजून, चंदन. तो कितीहि चांगला असला, तरी त्याचा चांगुलपणा प्रसंग येईपर्यंतच टिकेल. प्रसंग आल्यावर तो कशा रीतीनें वागेल हें मला या क्षणाला दिसून राह्यलंय— "

" नाहीं माय, ते इतर सामान्य माणसांसारखे नाहींत. तुला कल्पना नाहीं ते किती चांगले आहेत याची-- "

" वेडी आहेस तूं, पोरी. तो आपल्याशीं लग्न करील, असं वाटतंय तुला न् त्या आशेनं भारून जाऊन तूं बोलते आहेस हें सगळं— "

" छे, छे, तुझा हा समज चुकीचा आहे अगदीं. मीं कालच सांगून टाकलं त्यांना तुमच्याशीं संबंध ठेवणं मला शक्य होणार नाहीं म्हणून— "

" मग आतां हुजत कां घालतेस माझ्याशीं ?— "

" हुजत नाहीं घालीत, माय. पण, त्यांच्याविषयीं तूं जें कल्पनेनं बोलते आहेस, तें ऐकवत नाहीं मला— "

" मी कबूल करतें तो अगदीं लाख माणूस आहे. तरी सुद्धां त्याच्याशीं तूं संबंध ठेवणं इष्ट नाहीं कोणत्याच दृष्टीनं. जगांतल्या पुष्कळ चांगल्या गोष्टी जशा आपल्या नशिबीं नाहींत, तशीच ही एक गोष्ट समज तूं— "

तें शेवटलें वाक्य उच्चारतांना रखमाच्या आवाजांत एकदम विलक्षण कठोरपणा आला.

चंदन कांहीं बोलली नाहीं. पण आतां तिच्या डोळ्यांतून अश्रु ठिबकूं लागले.

" मग मला देतेस ना वचन ?— "

रखमानें तिला करडया आवाजांत विचारलें आणि तिच्या आसवांकडे दुर्लक्ष करून ती म्हणाली—

" माझ्या पायांवर हात ठेव न् सांग मला मी त्याच्याशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध यापुढें ठेवणार नाहीं म्हणून— "

तरीहि चंदन कांहीं बोलेना. तिच्या डोळ्यांना धारा लागल्या होत्या.

" चंदन— "

रखमा कडाडली.

" नको, नको माय. मी तुझ्या पायां पडतें. मला वचन द्यायला लावूं नकोस.

माझ्या शब्दावर विश्वास ठेव. काल रात्रीं झाली, तीच आमची शेवटली भेट--"

चंदननें रडत रडत म्हटलें.

" तूं त्याच्याशीं संबंध ठेवणार नाहीं म्हणतेस ना ? मग वचन द्यायला काय हरकत आहे ?— "

चंदन मुकाटयानें खालीं मान घालून अश्रु गाळीत होती.

" तुला त्यानं अगदीं भारून टाकलंय, पोरी. तुला वाटत असेल आपण त्याचा संबंध तोडूं शकूं म्हणून. पण, मला माहित आहे, वचनाचा धाक जर तुला नसला, तर तुझा न् त्याचा संबंध तुटायचा नाहीं कधीं. म्हणून तूं वचन दे मला माझ्या पायांवर हात ठेवून— "

रखमानें रागानें म्हटलें. पण चंदननें मान वर केली नाहीं किंवा ती कांहीं बोल• लीहि नाहीं. तेव्हां रखमा कडाडली—

" बस झालं रडणं तुझं ! घरांत कांहीं कुणी मेलेलं नाहीं असं ओक्साबोक्शीं रडत सुटायला. ठेव माझ्या पायांवर हात न् दे वचन. सासूबाई येतील आतां इत-क्यांत. त्यांना कांहीं कळतां कामा नये यांतलं. हं, चल आटप लवकर— "

तिचे ते निर्वाणीचे शब्द ऐकतांच चंदननें डोळे पुसले आणि ती आईच्या नज-रेला नजर देऊन म्हणाली—

" माय, मी असलं वचन देणार नाहीं. तूं दुसरं काय वाटेल तें दिव्य करायला सांग मला— "

" अग, हें साधं वचन द्यायला तयार नाहींस तूं न् दुसरं काय दिव्य होणार तुझ्या हातून ? मला समजतो या तुझ्या सगळ्या वागण्याचा अर्थ. गेलीं तेरा चौदा वर्षं तुझ्यासाठीं कष्ट उपसले आम्हीं; तुझं कॉलेजवेरी शिक्षण केलं; तूं म्हणशील ते लाड पुरवले तुझे. आणि आज तूं आमच्या त्या जन्मवैऱ्याच्या पोराच्या गळ्यांत पडायला पहातेस का ? छान, छान, छान पांग फेडते आहेस आमचे ! चल, दे मुकाटयानें वचन माझ्या पायांवर हात ठेवून— "

रखमा चवताळून म्हणाली आणि तिनें गुडघ्यांवर ठेवलेले चंदनचे हात खसदिशीं ओढले.

त्याबरोबर चंदन वर पाहून आवेशानें तिला म्हणाली—

" नाहीं, नाहीं, माय. मी वचन देणार नाहीं. तूं दुसरं काय वाटेल तें करायला सांग मला, पण हें वचन मजजवळ मागूं नकोस. तुला माझा विश्वास वाटत नसेल

तर जीव घे माझा. तूंच जगांत आणलं आहेस मला. तेव्हां तुला पूर्ण हक्क आहे माझं काय वाटेल तें करायचा. पण, मी पायां पडतें, मजजवळ वचन मागूं नकोस— ”

चंदनचे ते निर्धाराचे उद्गार ऐकतांच रखमानें त्वेषानें तिचे हात सोडून दिले आणि ती एकदम उभी राहून कडाडली—

“ चांडाळणी, त्याच्या बापाच्या पापवासनेला बळी पडायचं मीं नाकारल्यामुळें घरादाराला मुकावं लागलं आम्हांला; न् तूं त्याच्याशीं बाशिंग बांधायला धादावली आहेस का ? त्याचा तो दुष्ट बाप जिवंत असतांना तो तुझ्याशीं लग्न करूं शकेल, असं वाटतं तरी कसं तुला ? त्याच्या बापाची रखेली व्हायचं मीं नाकारलं आणि तूं त्याची रखेली होणार का त्याच्याशीं संबंध ठेवून ? यापेक्षां मेलीस का नाहीं तूं उपजल्याबरोबर !— ”

रखमाचे ते क्रूर शब्द चाबकाच्या फटक्यांसारखे तडातड बसले तिच्या काळजावर; व काळीज फुटून रक्ताची धार लागावी, तशा अश्रूंच्या धारा लागल्या तिच्या डोळ्यांना. पण ती धडपडत उठली आणि रखमाचे पाय धरून तिनें रडत रडत म्हटलें—

“ नको, नको माय ! तूं काय भयंकर बोलतेस हें ? त्यांचे वडील दुष्ट असतील; त्यांनीं तुझ्याशीं नीचपणाचें वर्तन केलें असेल. पण ते तसे नाहींत. ते अगदीं निराळे आहेत. ते कधींहि वाईट वागायचे नाहींत माझ्याशीं; कधींहि फसवायचे नाहींत मला. असलं वेडं वांकडं बोलण्यापेक्षां तूं विहिरींत ढकलून दे मला आत्तांच्या आत्तां आपल्या हातांनीं— ”

पण तिच्या त्या आक्रोशानें रखमाचें हृदय द्रवलें नाहीं. उलट ती संतापानें बेभान होऊन उद्गारली—

“ चल, हो दूर ! तुला माझं ऐकायचं नाहीं ना ? मग हात लावूं नकोस माझ्या अंगाला. म्हणे आपल्या हातांनीं विहिरींत ढकलून दे मला ! विहिरींत ढकलण्यासाठींच आम्हीं तुला वाढवली नाहीं स्वतःच्या रक्ताचं पाणी करून ? विहिरींत कशाला ढकलायला हवी ? विहिरींत ढकलल्याशिवायहि मरण येऊं शकतं. त्याच्याकडे तूं गेलीस म्हणजे मेल्यासारखीच आहेस मला— ”

आणि तिनें त्वेषानें आपल्या पायांना बिलगलेल्या चंदनला लाथेनें बाजूला झिडकारली.

तिच्या पायाच्या झटक्यानें चंदन बाजूला पडावयाला आणि येसू आंत यावयाला एकच गांठ पडली.

पाठीवर केस सोडलेली रखमा संतापानें थरथरा कांपत होती आणि तिच्यासमोर भुईवर पडलेली चंदन ढसढसा रडत होती.

तें दृश्य पहातांच हातांतली पिशवी टाकून देऊन येसू धांवतच पुढें आली आणि चंदनला दोन्ही हातांनीं उचलून आपल्या मांडीवर घेत म्हणाली—

" काय केलंस ग पोरीला ? आपल्या पोटच्या गोळ्याला लाथेनं झिडकारायला पाय वाह्यले कसे तुझे, सूनबाई ? काय केलंन तिनं एवढं ? बरं झालं, मी उन्ह फार झाल्यामुळें बाजारांत न जातां अंजिराकडून तशीच परत आलें— "

चंदननें येसूच्या कमरेला घट्ट मिठी मारली आणि तिच्या कुशींत तोंड लपवून मोठमोठ्यानें हुंदके द्यावयाला सुरवात केली.

" काय ग, काय झालं ? काय केलंस तूं सूनबाई हिला ?— "

" काय केलं ? मीं काय केलं ? तुम्ही विचारा ना तिला. तीच सांगेल तुम्हांला मीं काय केलं तें ?— "

सुनेचा तो कडकडाट पाहून म्हातारी अगदीं गांगरून गेली. चंदनच्या पाठीवरून हात फिरवीत तिनें म्हटलें—

" ऊठ बेटा, सांग मला काय झालं तें. का माय रागावली तुझ्यावर एवढी आज ?— "

पण चंदन धाय मोकलून रडत होती. ती उठेना आणि बोलेना. तिचें तें रडणें येसूच्यानें ऐकवेना. ती रागारागानें रखमाला म्हणाली—

" झाली असेल चूक पोरीच्या हातून ! पण तिच्यावर एवढं संतापायला काय झालं तुला ? ती लहान आहे अजून. तिला काय कळतंय ? पण ज्यांना कळतं त्यांनींच जर ताळ सोडला न् वाटेल तसं तोंड टाकायला सुरवात केली, तर कसं करावं या पोरीनं ? बापाच्या मागं इतके कष्ट करून जी तिला वाढवली, ती काय अशा रीतीनं तिच्याशीं वागायला ?— "

बोलतां बोलतां येसूनें डोळ्यांना पदर लावला.

" तुम्ही बोलूं नका सासूबाई या बाबतींत उगाच ! काल रात्रीं ती त्याच्या बरोबर एकटी बाहेर गेली न् मध्यरात्रीं परत आली, यावरूनच कळायला हव्या होत्या

तुम्हांला सगळ्या गोष्टी. मी तिला बोललें, तें पुढला मागला विचार करूनच बोललें— ”

“ एवढंच ना ? काल रात्रीं ती आल्याबरोबर मीं बजावलं तिला असा प्रकार पुन्हा घडतां कामा नये म्हणून; न् तिनंहि लगेच पदरांत घेतली आपली चूक. कालच्या प्रकाराबद्दल तिला आज कांहीं बोलण्याची गरज नव्हती पुन्हा— ”

“ गरज वाटल्याशिवाय नाहीं बोललें मी — ”

“ अग, पण त्या बोलण्याला आणि करण्याला कांहीं सुमार ? मी डोळ्यांनीं पाह्यला सगळा प्रकार मघांशीं. जन्म देणारी आई जर अशा रीतीनें लाथाडायला लागली, तर त्या बिचाऱ्या पोरीनं जावं कुठं ? आपल्या सगळ्या आशा आतां तिच्यावर आहेत, हें विसरूं नकोस तूं— ”

“ तुमच्या असतील, माझ्या नाहींत ! ज्या दिवशीं माझं कपाळ फुटलं, त्या दिवशींच सगळ्या आशांची राखरांगोळी झाली माझ्या. ही पोर काय पांग फेडणार आपले तें दिसूनच राह्यलंय आतां ! आपल्या बापाचा खून आणि आईची बेइज्जत करणाऱ्या इसमाच्या पोराच्या गळ्यांत पडायला निघालेली ही अवदसा जगली काय न् मेली काय मला सारखीच आहे— ”

“ अग काय बोलतेस तूं हें, सूनबाई ? इतका त्रागा करायला काय झालं तुला आज ? तूं नको म्हटल्यावर का ती जाणार आहे पुन्हा त्याच्याकडे ? आणि गेली तरी बिघडलं काय त्यांत एवढं ? तिची तिला कळते आतां आपली जबाबदारी—”

“ पुरे, पुरे ! तुम्ही बोलूं नका पुन्हा या बाबतींत. तुमच्या या असल्या फूस देण्यानंच ही पोर इतकी वाहवली. तुम्हांला कदाचित् हांव सुटली असेल आतां म्हातारपणीं नातीला देशपांड्यांच्या घरांत घालून चंदनवाडी परत मिळवायची ! पण, लक्षांत ठेवा, असलं कांहीं होण्यापेक्षां ही पोर मेलेली पुरवेल मला— ”

# अबोला



काँग्रेस मंत्रिमंडळ राजीनामा देईपर्यंत दादासाहेब आपल्याला वेगळा राहूं देणार नाहींत अशी जी अवधूतची कल्पना होती, ती खरी ठरली.

दसऱ्याच्या दिवशीं सायंकाळीं त्यांच्या बंगल्यावर एक प्रकारचा छोटेखानी दरबारच भरत असे. चंदनवाडीचें वैभव जरी आतां नागपूरला शिल्लक राहिलें नव्हतें, तरी दसऱ्याच्या थाटांत मात्र दादासाहेबांनीं कोणत्याहि प्रकारची कमतरता येऊं दिली नव्हती. मधल्या दिवाणखान्यांत देशपांडयांचीं जुनीं पिढीजात शस्त्रें घासून पुसून माळा घालून भिंतीला टांगून ठेवलेलीं असत; व त्यांच्या दोहो बाजूंना दादासाहेबांनीं स्वतः शिकारींत मारलेल्या शेलक्या जनावरांचीं डोळस मस्तकें लावलेलीं असत. दिवाणखान्यांतल्या प्रशस्त लांकडी बैठकीवरील पांढऱ्या शुभ्र गादीवर काळेपिवळे पट्टे असलेलें सुंदर व्याघ्रचर्म घातलेलें असे. त्या वाघाचें जीभ बाहेर लोंबत असलेलें तोंड, तीं जनावरांचीं डोळस मस्तकें, तो उजळा दिलेला जुनाट शस्त्रसंभार आणि तीं पानसुपारीनें भरून ठेवलेलीं चांदीचीं नक्षीदार तबकें विजेच्या झुंबराच्या प्रकाशांत लखलखतांना बघितलीं, म्हणजे दादासाहेबांना सोनें द्यावयाला येणाऱ्या लोकांना असें वाटे कीं, देशपांडयांच्या घराण्यांतील लक्ष्मीनें चंदनवाडीहून नागपूरला येतांना फक्त स्थलांतर केलें एवढेंच. तिचा रुबाब आणि दिमाख अद्याप कायमच आहे.

दादासाहेब जुना भोसलेशाही पोषाख करून सूर्यास्ताच्या सुमारास राजावक्षाच्या मारुतीचें दर्शन घेऊन येत. त्यानंतर रात्रीं दहा वाजेपर्यंत दिवाणखान्यांतील त्या व्याघ्रासनावर बसून ते आपल्याकडे येणाऱ्या निरनिराळ्या मंडळीला सोनें देत असत. त्यांच्या उजव्या बाजूला सोन्यानें भरलेला चांदीचा थाळा ठेवलेला असे.

त्यांतलें सोनें तें येणारा-जाणाराचा नमस्कार किंवा मुजरा स्वीकारून त्याला देत असत. नंतर येणारे लोक आपआपल्या दर्जाप्रमाणें समोर खुर्चीवर किंवा खालीं गालिचावर बसून चांदीच्या तबकांतली पानसुपारी घेत आणि थोडा वेळ गप्पा गोष्टी करून निघून जात.

रात्रीं दहाच्या सुमारास अवधूतनें सोनें दिल्यावर दादासाहेबांचा हा दसऱ्याचा दरबार विसर्जन पावत असे.

अवधूतला तो सारा समारंभ एरवीं अगदीं पोकळ आणि कंटाळवाणा वाटे. पण, त्या निमित्तानें देशपांड्यांचे सगळे ऋणानुबंधी लोक, आप्तेष्ट, स्नेही, कुळें वगैरे घरीं येत आणि जुन्या बुजत चाललेल्या संबंधांना उजाळा मिळत असे, याबद्दल मात्र त्याला समाधान वाटे. शिवाय, ता. १ जानेवारी रोजीं ख्रिस्ती शकाचा पाडवा वडे हुद्देदार, अधिकारी, सुधारक, दरबारी वगैरे लोक कोणत्या खानपानाच्या प्रकारांत साजरा करतात हें त्यानें अनेकदां दादासाहेबांच्या बरोबर जाऊन प्रत्यक्ष पाहिलेलें असल्यामुळें, त्या मानानें दसऱ्याचा हा दिखाऊ दरबार त्याला सात्विक आणि निरुपद्रवी वाटत असे.

दसऱ्याच्या दिवशीं रात्रीं सोनें देण्याचा समारंभ झाल्यावर बापलेक जेव्हां फराळाला बसले, तेव्हां अवधूतनें त्यांना हळूच विचारलें—

" मग दादा मी आतां माझं सामान हलवूं ना इथून ?— "

" का ? इथून जाण्याची घाई का तुला एवढी ?— "

दादासाहेबांनीं एकदम हात आखडता घेऊन विचारलें—

" माझी घाई नाहीं मुळींच. आपण दसऱ्यानंतर सांगतों असं म्हणाला होतात, म्हणून विचारलं— "

" पण दसरा कांहीं संपलेला नाहीं अजून. तेव्हां आज मी कांहींच सांगत नाहीं तुला. तूं आपल्या नांवावर खोली घेऊन ठेवली आहेस ना ती ? तूर्त तेवढ्यानं काम भागेल आपलं. तूं वेगळा रहातोस एवढं दाखवतां आलं म्हणजे पुरे आहे— "

आपल्याला स्वतंत्र राहूं देण्याची त्यांना इच्छा नाहीं, हें लगेच अवधूतच्या लक्षांत आलें; व त्यानंतर त्यानें पुन्हा तो प्रश्न त्यांच्याजवळ काढला नाहीं.

फराळ आटोपल्याबरोबर तो कपडे घालून अभिमन्यूकडे यावयाला निघाला.

दुर्गापूजा प्रदर्शनाचा आज शेवटला दिवस असल्यामुळें लॉऱ्या, टांगे, मोटारी, सायकली आणि पायदळ लोक यांचा नुसता लोंढा धंतोलीच्या रस्त्यानें वहात होता.

त्या लोंढ्यांतून मोठ्या मुष्किलीनें वाट काढीत त्यानें आपली सायकल मॉडेल मिल्सकडे जाणाऱ्या शांत डामरी रस्त्याकडे वळविली.

वास्तविक चंदनला भेटण्याची अत्यंत प्रबळ इच्छा या वेळीं त्याला झाली होती. पण, काल रात्रीं नागनदीच्या पुलाजवळ त्याचा निरोप घेतांना तिनें त्याला पुनः पुन्हा निक्षून आणि विनवून सांगितलें होतें कीं, तुम्ही फिरून कधीं माझ्या घरीं येऊं नका आणि रात्रीच्या वेळीं तर मुळींच येऊं नका. त्या प्रसंगानंतर गेल्या चोवीस तासांत तिची आणि त्याची भेट झाली नव्हती. त्यामुळें त्याचें मन अतिशय बेचैन झालें होतें. काल मध्यरात्रीं ती घरीं परत गेल्यावर तिची आई तिला काय म्हणाली असेल ? आपल्याला तिची भेट घेतां येऊं नये म्हणून दादा-साहेबांनीं जसा बंदोबस्त चालविला आहे, तसाच प्रकार तिच्या आईनेंहि केला असेल काय ? किंवा काल ती म्हणाली त्याप्रमाणें तिनें आपल्या आईला सगळ्या गोष्टी स्पष्टपणानें सांगून तिचें समाधान केलें असेल ?

त्याहिपेक्षां त्याच्या मनांत जो एक प्रश्न सारखा डांचत होता, तो हा कीं, आपल्या वडलांचा जो इतका राग तिच्यावर आहे, त्याचा उलगडा तिनें आपल्या आईशीं बोलून करून घेतला असेल काय ? आणि जर घेतला असेल, तर ती गोष्ट आपल्याला कशी कळेल ?

या विवंचनेंत तो नागनदीच्या पुलापाशीं येतो न येतो, तोंच काशीबाईच्या देवळाच्या बाजूनें दोन काठ्यांच्या आधारानें खुरडत विव्हळत येत असलेला दशरथ त्याच्या दृष्टीस पडला.

त्याबरोबर तो सायकलवरून खालीं उतरला आणि दशरथच्या गळ्यांत लोंबत असलेल्या भांड्यांत त्यानें एक आणेली टाकली.

त्या नाण्याचा आवाज होतांच दशरथ थांबला आणि आनंदानें उद्गारला—

“ देव तुमचं भलं करो, दादा— ”

तोंच अवधूतनें त्याला विचारलें—

“ दशरथ, तूं ओळखलंस का मला !— ”

“ होय, साहेब. आपण छोटया अम्माकडे येतां केव्हां केव्हां— ”

त्याच्या आवाजावरून त्याला ओळखून दशरथनें म्हटलें.

“ आज एवढ्या रात्रीं कशाला गेला होतास शहरांत ? चंदनबाईनं पुरणपोळी नाहीं का वाढली तुला ?— ”

" चंदनबाई काल पासून आजारी आहे, साहेब. मग आज पुरणपोळी कोण वाढणार या आंधळ्याला ? गेल्या दहा वर्षांत असा एकहि दसरा गेला नसेल कीं, ज्या दसऱ्याला या आंधळ्याला चंदनबाईनं पोटभर जेवण वाढलं नाहीं. पण ती आज आजारी आहे न् त्यामुळें चक्कर मारावी लागली मला शहरांत— "

" कशानं आजारी आहे रे ?— "

" कांहीं मालुम नाहीं, साहेब. दुपारीं मी त्यांच्याकडे गेलों, किती तरी वेळ थांबलों. तेव्हां आजीबाईनीं सांगितलं चंदनच्या जिवाला बरं नसल्यामुळें आम्हीं आज कांही केलं नाहीं म्हणून. संध्याकाळीं पुन्हा गेलों, तेव्हांहि चंदनबाई बाहेर आली नाहीं. मघांशी छोटी अम्मा सांगत होती बड्या अम्माला तिच्या अंगांत थोडी कसर आहे म्हणून. त्यामुळं या आंधळ्याला आज पुरणपोळीसाठीं शहरांत यावं लागलं, साहेब—"

दशरथनें सांगितलेली ती हकीगत ऐकून अवधूतच्या मनांत एकदम असा विचार आला कीं, आतांच्या आतां चंदनच्या घरीं जाऊन ती कशानें आजारी आहे तें पहावें. पण, लगेच त्याला वाटलें, ती विशेष आजारी नाहीं हें दशरथच्या बोलण्यावरून उघड आहे. तेव्हां कदाचित् आई कांहीं कमीजास्त बोलल्यामुळें मनस्ताप होऊन ती अस्वस्थ नसेल कशावरून ? आणि अशा स्थितींत आपण पुन्हा तिला अपरात्रीं भेटावयाला गेलों, तर आगींत तेल ओतण्यासारखाच तो प्रकार होणार नाहीं का ?

म्हणून तो दशरथला म्हणाला—

" दशरथ, मीं एक चिठ्ठी दिली, तर तूं देशील का ती चंदनबाईला ?— "

" हो. जरूर देईन, साहेब. एवढेंहि काम होणार नाहीं का या आंधळ्या-कडून ?— "

" पण हें बघ, चंदनबाई एकटी असतांना चिठी दिली पाहिजे तिला. कोणालाहि कळतां कामा नये चिठी दिल्याचं— "

" हो. त्या मिशनमध्यें येतीलच उद्यां सकाळीं बहुतेक, तेव्हां देईन. नाहींच आल्या, तर मग त्यांच्या घरीं जाऊन युक्तीनं देईन त्यांना— "

अवधूतनें सायकलच्या दिव्याच्या प्रकाशांत आपल्या नोटबुकांतून कागदाचा एक कपटा काढून त्यावर घाईघाईनें कांहीं ओळी खरडल्या आणि तो कपटा दशरथपुढें धरून म्हटलें—

" हा कुठं ठेवशील तूं ?— "

" थांबा जरा, सांगतों— "

असें म्हणून त्यानें आपल्या हातांतल्या दोन्ही काठ्या खालीं ठेवल्या आणि आपले निराकार आखूड पाय मुडपून तो जमिनीवर बसला. नंतर त्यानें मनगटाचीं हाडें नसल्यासारखा दिसणारा आपला उजवा केसाळ पंजा त्याच्यापुढें करून म्हटलें—

" द्या साहेब, कागद आपला— "

अवधूतनें मुकाट्यानें त्या कपड्याची घडी त्याच्या हातावर ठेवली. दशरथनें दोन्ही पंजांनीं ती चांचपली आणि डोक्यावरली मळकी टोपी काढून तिला असलेल्या अनेक कप्प्यांपैकीं एकांत ती चिठी सरकवून दिली. नंतर आपल्या दोहों बाजूंना ठेवलेल्या काठ्यांच्या आधारानें तो हळूहळू उठून उभा राहिला आणि त्याला म्हणाला—

" साहेब, आपण फिकीर करूं नका. आपली चिठी नक्की मिळेल चंदनबाईला —"

" आणि तिचं उत्तर कोण आणून देईल मला ?— "

" मीच आणून देईन, साहेब. मी असा खुरडत खुरडत चालत असलों, तरी उंटखान्यापासून मेहंदीबागपर्यंत आणि वगडगंजापासून सिव्हिल लाईन्सपर्यंत सगळीकडे हिंडतों मी. माझ्या पांगळ्या पायांत हत्तीचं बळ आहे, साहेब. सारं नागपूर पायांखालीं घातलंय मीं— "

" पण तुला देशपांडयांचा बंगला माहीत आहे का जिल्ह्याजवळचा ?— "

" हो, हो. जिल्ह्याजवळ आमच्या मिशनशेजारीं आहे तोच ना ? मग तो सहज सांपडेल मला. पण या सिव्हिल लाइन्समधल्या बंगल्यांत भिकाऱ्यांना जाऊं देत नाहींत तिथले चौकीदार, साहेब— "

दशरथनें विव्हळत विव्हळत तक्रारीच्या सुरांत म्हटलें.

त्याची ती तक्रार ऐकून त्या मनःस्थितींत सुद्धां अवधूतला हंसूं आल्याशिवाय राहिलें नाहीं. आणि तो म्हणाला—

" तूं मागच्या फाटकानें ये त्या बंगल्यांत. बंगल्याच्या मालकीणबाई स्वतः अन्न वाढतात आंधळ्या पांगळ्यांना. कोणालाही विन्मुख जाऊं देत नाहींत. तुझा आवाज ऐकला म्हणजे मी येईन तुझी चौकशी करायला— "

" पण सूर्य मावळल्यावरच मी बहुधा बाहेर पडतों, साहेब— "

" हरकत नाहीं. तूं रात्रीं आलास तरी चालेल. त्या बाई तुला कांहीं तरी वाढल्याशिवाय परत नाहीं लावणार— "

" देव कल्याण करो त्या माऊलीचं. मग मी जाऊं आतां ?— "

" जा— "

तो लगेच खुरडावयाला लागला आणि अवधूतनें सायकल उमरेड रस्त्याकडे वळविली.

रस्त्यानें अद्याप राजेबहादुरांची दसऱ्याची मिरवणूक पहावयाला आणि राजाबक्षाच्या मारुतीच्या दर्शनाला गेलेल्या लोकांची तुरळक वाहतूक चालू होती; व पोवाड्यांच्या ललकाऱ्याहि मधून मधून कानांवर पडत होत्या.

तो अभिमन्यूच्या घरापाशीं येतांच सायकलीवरून खालीं उतरला. त्याला पाहतांच अभिमन्यु माडीवरून खालीं आला आणि त्याची सायकल आंत घेत म्हणाला—

" फार उशीर केलास तूं आज, अवधूत. मला वाटलं, आज कांहीं भेटत नाहीं तुझ्या हातचं दसऱ्याचं सोनं— "

" नाहीं रे ! विशेष उशीर नाहीं झाला. तुला माहितच आहे दादा दहा वाजल्याशिवाय उठत नाहींत दिवाणखान्यांतून. त्यानंतर आमचा फराळ झाल्यावर लगेच निघालों मी— "

ते दोघे आंत गेले. तोंच अभिमन्यूच्या वडलांनीं पुढें येऊन त्याला सोनें दिलें. त्याबरोबर अवधूतनें त्यांना वांकून नमस्कार केला आणि तेंच सोनें परत दिलें.

ते जिना चढून माडीवर जातांच हिरा पुढें आली आणि तिनें अवधूतला नमस्कार करून सोनें दिलें.

पण अवधूतनें शिष्टाचाराप्रमाणें तिला कांहीं सोनें परत दिलें नाहीं. तो म्हणाला—

" आज तुला सोनं द्यायची इच्छा नाहीं मला, हिरा— "

" मला कधींच कांहीं द्यायची इच्छा नसते तुम्हांला नाहीं तरी— "

तिच्या तोंडून सट्दिशीं उद्गार निघून गेला.

पण अवधूत आपल्या मनोव्यथेंतच व्यग्र होता. तिच्या त्या उद्गारांतली खोंच आणि मातांनीं डागळलेल्या तिच्या चेहऱ्यावर उमटलेली विषादाची झांक त्याच्या लक्षांत आली नाहीं. त्यानें विचारलें—

" आज चंदन भेटली होती का तुला ? गेल्या वर्षी तुम्ही दोघींनीं सोनं दिलं

होतंत मला इथं. पण आज तूं एकटीनंच दिलंस. तुझी मैत्रीण का नाहीं आली आज ?— ”

“ तिला बरं नाहीं आहे कालपासून— ”

“ काय होतंय ?— ”

“ तसं विशेष कांहीं नाहीं. काल संध्याकाळीं मी गेलें होतें तिच्याकडे. मला पहिल्यांदा वाटलं, तिच्या आईला बरं नसावं. ती खाटेवर पडलेली होती मी गेलें तेव्हां. पण मी चंदनच्या खोलींत गेलें, तेव्हां तीहि निजलेली दिसली मला. मायलेकी दोघीहि आजारी आहेत; न् त्यामुळं दसऱ्याचं कांहीं केलं नाहीं तिच्या आजीनं— ”

दशरथनें मघांशीं अर्धवट सांगितलेल्या हकिगतीला हिरानें दिलेल्या या माहितीनें पूर्णता आली; व चंदन आणि तिची आई या दोघींच्याहि आजाराचा अर्थ अवधूतच्या लक्षांत आला. त्यामुळें त्याचें मन अधिकच अस्वस्थ झालें.

“ मग ती उद्यां कॉलेजांत येईल कीं नाहीं ?— ”

“ तें कसं सांगणार ? आज सकाळीं मी गेलें होतें, त्याहि वेळीं निजूनच होती ती— ”

हिरानें दिलेल्या त्या उत्तरानंतर जास्त चौकशी करणें अवधूतला बरें वाटलें नाहीं.

त्यानंतर थोड्याच वेळानें ते दोघे बाहेर पडले.

रस्त्यावर येतांच अभिमन्यु त्याच्या खांद्यावर हात टाकून म्हणाला--

“ तूं आज आनंदांत दिसत नाहींस, अवधूत— ”

“ हो. खरं आहे तूं म्हणतोस तें. काल परवांपासून माझ्या मनाला अस्वस्थ करणाऱ्या गोष्टी घडताहेत एक सारख्या, अभि. आज दुपारीं सिराजचं पत्र आलं, तेव्हांपासून चैन नाहीं माझ्या जिवाला-- ”

“ काय पत्र आलंय त्याचं ?— ”

“ हें घे. तूं स्वतःच वाचून पहा मग. आपल्याला दोघांनाहि लिहिलंय तें त्यानं. तो विलायतेहून सुरक्षित परत येऊन पुन्हा आपल्या दृष्टीस पडेल तेव्हां खरं— ”

अवधूतनें खिशांतून सिराजचें पत्र काढून तें अभिमन्यूच्या हातीं देत म्हटलें. अभिमन्यूनें मुकाट्यानें तें आपल्या खिशांत ठेवलें आणि विचारलें—

" हें झालं आजचं कारण. पण तुझ्या मनाला अस्वस्थ वाटण्यासारखं काल परवां काय घडलं ?-- "

" गेल्या दोन दिवसांत चंदन दिसली नाहीं अजिबात. आतांच हिरानं सांगितलं तिला बरं नाहीं म्हणून. पण यावेळीं तिच्या घरीं जाऊन तिला भेटणंही शक्य नाहीं— "

त्यानें अगदीं आर्त आवाजांत म्हटलें.

पण अभिमन्यु कांहीं बोलला नाहीं.

कांहीं वेळानें अवधूत त्याला म्हणाला—

" अभि, तुला मी आज एक गोष्ट सांगणार आहे-- "

" कोणती ?-- "

" मी दादांपासून वेगळा निघाल्याबरोबर चंदनशीं लग्न करायचं ठरवलंय-- "

अभिमन्यु कांहीं क्षण स्तब्ध होता. नंतर त्यानें आवंढा गिळून विचारलें—

" पण ते तुला वेगळा निघूं देतील असं वाटतं का तुला खरोखरी ?— "

" तेंच तर समजत नाहीं. आतांच मीं त्यांना विचारलं. पण त्यांनीं कांहींच नक्की सांगितलं नाहीं. कॉंग्रेस मंत्रिमंडळ राजीनामा देईपर्यंत तरी मला वेगळा होऊं देणार नाहींत ते— "

अभिमन्यु पुन्हा कांहीं क्षण थांबला आणि त्यानें विचारलें—

" तूं चंदनशीं लग्न केलेलं आवडेल त्यांना ?— "

"त्यांच्यापासून वेगळा निघाल्यानंतर त्यांना आवडायचा काय प्रश्न आहे ?—"

" तूं आतां जो वेगळा निघणार आहेस, तो त्यांच्या सोईसाठीं, त्यांच्या संमतीनं. पण चंदनशीं लग्न करणं ही अगदीं निराळी गोष्ट आहे नव्हे का !— "

" हो— "

तो म्हणाला. त्याच्या मनांत क्षणैक अशी कल्पना आली कीं, अभिमन्यूला विश्वासांत घेऊन गेल्या दोन दिवसांत घडलेले सगळे प्रकार त्याला सांगावेत. पण त्याच्या मानी मनाला ती कल्पना रुचली नाहीं आणि त्यानें म्हटलें—

" तूं म्हणतोस तें बरोबर आहे. ते कधींहि संमति देणार नाहींत आमच्या लग्नाला. पण माझ्या मनाचा निश्चय होऊन चुकला आहे त्या बाबतींत. मी फक्त ते मला वेगळा राह्यची परवानगी केव्हां देतात याची वाट पहातोंय आतां अभि— "

अभिमन्यु कांहीं बोलला नाहीं. नागनदीच्या पुलाजवळ येतांच तो अवधूतचा निरोप घेऊन मुकाट्यानें परतला.

सोमवारीं दुपारीं ज्या वेळीं चंदन कॉलेजांत अवधूतच्या दृष्टीस पडली, त्या वेळीं एकाद्या मोठ्या आजारांतून उठलेल्या माणसाची कळा तिच्या चेहऱ्यावर आली आहे असें त्याला वाटलें; व तिच्या नजरेला नजर भिडवून त्यानें विचारलें—

" तूं दोन दिवसांत भेटली नाहींस अजिबात, चंदन ?— "

" कॉलेज नव्हतं ना ? मग कशी भेटणार ?— "

तिनें त्याची नजर टाळून उत्तर दिलें.

तो क्षणैक स्तब्ध होता. नंतर त्यानें विचारलें—

" माझी चिठ्ठी पोंचली होती तुला ? तूं जर आज कॉलेजांत आली नसतीस, तर मी संध्याकाळीं घरीं आलों असतों तुझ्या— "

" मला वाटलीच ती भीति तुमची चिठ्ठी वाचल्यावर; न् म्हणून मीं ठरवलं कॉलेजांत यायचं— "

" कशानं आजारी होतीस तूं ?— "

ती कांहीं बोलली नाहीं. तेव्हां तो थोड्या वेळानें म्हणाला—

" माझ्या बरोबर जरा बाहेर येतेस का ?— "

" हो. पण लगेच परत यायला हवं. मला पुढल्या तासाला हजर झालं पाहिजे वर्गांत— "

आणि लगेच ती आपली सायकल घेऊन त्याच्याबरोबर कॉलेजच्या आवारांतून बाहेर पडली.

ऊन विलक्षण कडक पडलें होतें. पण, महाराज बागेला वळसा घालून अंबाझरी रस्त्याला लागल्यावर, त्यांना उन्हाचा ताप फारसा जाणवला नाहीं. रस्त्याच्या दोहों बाजूंना हिरवीं पिवळीं शेतें दूरवर पसरलीं होतीं. त्यामुळें, डोक्यावरलें आकाश जरी निळ्या पोलादी तव्यासारखें तापून गेलें होतें, तरी त्या शेतांवरून वहात येणारी वाऱ्याची झुळूक मात्र सुखकर वाटत होती; व बुचाच्या आणि चिंचव्याच्या झाडांवर बहरलेल्या पांढऱ्या पिवळ्या झुबक्यांचा परिमळ हवेंत दरवळला होता. शेतकी कॉलेजची हद्द संपतांच रस्त्याच्या उजव्या बाजूला असलेल्या लांबच लांब माळावर जी नवी वस्ती त्या वेळीं होत होती, त्या वस्तीजवळ येऊन

पोंचतांच अवधूतनें आपली सायकल एका छोटया रस्त्याकडे वळविली आणि नुकत्याच बांधून तयार होत असलेल्या एका बंगलीपाशीं तो आला.

ती बंगली रस्त्याच्या अगदीं एका टोंकाला होती. पश्चिमेला अंबाझरीचा उंच उंच होत गेलेला माळ पसरला होता; व आजूबाजूला तुरळक बंगले बांधून तयार होत होते. सभोंवतीं मनुष्यवस्ती नव्हती किंवा झाडीहि नव्हती. शिंदीचें जें एकाद दुसरें झाड त्या रखरखीत भकास माळावर उभें होतें, त्याच्या काळसर पात्यां-भोंवतीं मृगजळाच्या लहरी उठल्याचा भास मधून मधून होत होता. आसपास चालू असलेल्या बांधकामाचे निरनिराळे आवाज आणि दगड किंवा मयाली चढविणाऱ्या मजुरांचीं गाणीं याशिवाय दुसरा कसलाहि शब्द त्या निर्जन वस्तींत कानांवर पडत नव्हता.

सायकलवरून खालीं उतरतांच अवधूत चंदनला हंसत हंसत म्हणाला—

" हें माझं नवं निवासस्थान कसं काय आवडलं तुला ?— "

तिनें उन्हाच्या झळीनें त्रासलेल्या डोळ्यांनीं चोहोंकडे पहात म्हटलें—

" किती भयाण न् एकलकोंडी जागा आहे ही— "

" हो. पण निवान्त नाहीं का तितकीच ? बरं, पण आंत तर ये तूं— "

त्यानें खोलीचें कुलूप काढलें आणि तीं दोघें आंत गेलीं.

खोली मोठी, हवाशीर आणि स्वच्छ होती. एका कोंपऱ्यांत खिडकीजवळ टेबल आणि त्याच्या भोंवतीं तीन खुर्च्या ठेवलेल्या होत्या; व टेबलाशेजारीं एक रिकामी लाकडी अल्मारी उभी केलेली होती.

त्यानें आंत जातांच सुरईतल्या थंडगार पाण्यानें कांचपात्र भरून तें चंदनला दिलें. तिनें बाहेर येऊन तोंडावर पाण्याचा शिडकावा केला आणि त्याला विचारलें—

" तुम्ही राह्यला आलां नाहींत ना अद्याप ? मग हें सामान कसं काय इथं आलं ?— "

" पहिल्या दिवशीं जें सामान आणून टाकलं, तेवढंच आहे हें. अद्याप दादांनीं कांहीं इथं येऊन राह्यला परवानगी नाहीं दिलेली— "

त्याचें तें उत्तर ऐकून ती एकदम गंभीर झाली.

तो तिच्याकडे पहात होता, ती खिडकींतून बाहेर पहात होती.

तिच्या हृदयांत कालवाकालव करीत असलेली मनोव्यथा तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट उमटली होती.

त्यानें आवंढा गिळून तिला हांक मारली—

" चंदन— "

" काय अवधूत ?— "

" त्या दिवशीं रात्रीं माझ्याबरोबर बाहेर आल्याबद्दल आई तुला कांहीं बोलली का ?— "

" हो. दुसऱ्या दिवशीं सकाळी पुष्कळच बोलणं झालं आमचं— "

" काय म्हटलं तिनं तुला ?— "

" तिनं मजजवळ वचन मागितलं तुमच्याशीं संबंध न ठेवण्याबद्दल—"

" मग तूं कबूल केलंस ?— "

" नाहीं—"

" आणि ती गोष्ट विचारलीस तूं आईला— "

" कोणती गोष्ट ?—"

" ती गोष्ट—माझ्या वडलांचा तुझ्यावरला राग. त्याचा झाला का उलगडा तुला कांहीं ?—"

" हो—"

" कशामुळं राग आहे त्यांचा तुझ्यावर इतका ?— "

" तुमच्या वडलांची पापवासना तृप्त करायचं माझ्या आईनं नाकारलं त्याबद्दलचा राग आहे तो—"

" काय ? माझ्या वडलांची पापवासना ? माझे धर्मशील, निग्रही दादा—त्यांची पापवासना ?—"

त्यानें ताड्दिशीं खुर्चीवरून उठून विचारलें. त्याचा चेहरा पांढरा पडला होता.

" होय, अवधूत. माझ्या विधवा आईवर त्यांची वाईट नजर होती; न् ती त्यांची वासना तृप्त करायचं तिनं नाकारलं म्हणून त्यांनीं जप्ती आणली आमच्या घरादारावर—"

तिनें अगदीं शांतपणानें उत्तर दिलें आणि नंतर आवंढा गिळून ती म्हणाली—

" म्हणून माझ्या आईला असं वाटतं कीं, ज्याच्या वडलांनीं आपल्याशीं

इतकं अधमपणाचं वर्तन केलं, त्याच्याशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवूं नये आपल्या मुलीनं—"

तो अगदीं सुन्न उभा होता. त्याच्या कानशिलाच्या दोहों बाजूंनीं घामाच्या धारा लागल्या होत्या; व खालच्या ओठाची डावी कडा त्यानें दांताखालीं रगडली होती. अखेर धोतराच्या सोग्यानें आपलें तोंड पुसून त्यानें विचारलें—

"तुला आईनें अगदीं स्पष्ट सांगितलं का हें ?—"

"तिनं सांगितलं नाहीं आणि तिला इच्छाहि नव्हती सांगायची. पण मीं जेव्हां वचन द्यायचं नाकारलं, तेव्हां संतापाच्या भरांत तिच्या तोंडून बाहेर पडलं हें किळसवाणं सत्य—"

"आणि तरी सुद्धां तूं माझ्याशीं संबंध न ठेवायचं वचन द्यायचं नाकारलंस ?—"

"हो— "

"चंदन, चंदन !— "

त्याच्यानें पुढें बोलवेना. त्यानें तिचे दोन्ही हात धरून आपल्या डोळ्यांवर दाबले.

क्षणार्धांत त्याच्या आसवांनीं भिजून गेले तिचे हात.

"अवधूत, अवधूत, हें काय हें ?— "

तिनें त्याचें मस्तक कुरवाळीत म्हटलें.

त्याबरोबर तो एकदम वर पाहून उद्गारला—

"तुझ्या आईनं तुला माझं तोंड पाहूं नकोस म्हणून सांगितलं याचं मला नवल वाटत नाहीं; न् त्याबद्दल दोषहि देत नाहीं मी तिला. स्त्रीला जन्मभर ज्याची चीड वाटावी, तिच्या हृदयांतून ज्याचें शल्य कधींहि निघून जाऊं नये, असं लाजिरवाणं दुष्कृत्य आहे तें. त्याचा राग तिनं माझ्यावर काढावा हें स्वाभाविक आहे अगदीं. पण हा प्रकार कळल्यावरसुद्धां तूं तिला वचन द्यायचं नाकारलंस, हें तुझं धैर्य विलक्षण आहे, चंदन— "

"पण आई जर माझ्याशीं निर्दयपणानं वागली नसती, तर हें धैर्य आलं नसतं माझ्या अंगांत, अवधूत. तिनं जर मला विश्वासांत घेऊन तुमच्याशी संबंध न ठेवण्याचं खरं कारण स्पष्ट सांगितलं असतं, तर बहुतेक मी कबूल झालें असतें तिच्या म्हणण्याला. मी कितीतरी परीनीं समजावून आणि विनवून पाहिलं तिला. पण तिनं मला खरं कारण न सांगतां नुसती जबरदस्ती आरंभली; न् नाहीं नाहीं

ते दुःशब्द बोलली ती मला. त्यामुळं माझं मन विटून गेलं अगदीं. आईनं मुलीला जे शब्द कधीं बोलूं नयेत, ते बोलली ती मला— "

बोलतां बोलतां तिच्या डोळ्यांत अश्रु आले. पण ते आवरून ती उठली आणि सुरईतील पाण्याचा एक घोट घेऊन म्हणाली—

" मी येतें आतां. मला तासाला हजर राह्यलं पाहिजे— "

" मीहि निघतों तुझ्याबरोबर. पण या परिस्थितींतून मार्ग कसा काढायचा, चंदन ?— "

" तुम्ही पुरुष आहांत. तुमचा मार्ग मोकळा आहे अवधूत. तुम्ही वडलांपासून वेगळे निघालांच आहांत नाहीं तरी. पण, मोठी माय जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत तें घर सोडणं शक्य नाहीं मला. तिचा सगळा जीव माझ्यावर आहे. तिला मी कशी सोडूं ?— "

तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तो कांहीं वेळ बोलला नाहीं. नंतर तिचा हात आपल्या हातांत घेऊन त्यानें म्हटलें—

" चंदन, मी आजपर्यंत एक गोष्ट बोललों नाहीं तुझ्याजवळ. पण ज्या दिवशीं तूं म्हणशील त्या दिवशीं तयार आहे मी— "

पण त्याला वाक्य पुरे करूं न देतां ती मध्येंच म्हणाली—

" हो. तें खरं. पण या सगळ्या दूरच्या गोष्टी आहेत. कदाचित् माझ्या कपाळीं नसेलहि तें भाग्य— "

" असं का म्हणतेस तूं ? माझी खात्री आहे, तूं जर आपल्या मनाचा निर्धार केलास, तर अशक्य नाहीं ती गोष्ट. तुझी आजी खात्रीनं आड येणार नाहीं आपल्या— "

" प्रश्न माझ्या आजीचा नाहीं. तुम्ही ओळखीत नाहीं अवधूत माझ्या आईला ! पण पुरे. मला कंटाळा आला आहे आतां याविषयीं बोलण्याचा. जों जों बोलावं, तों तों जास्तच ताप होतो जिवाला. निघूं या आपण आतां— "

आणि तीं दोघें परत कॉलेजांत आलीं.

शनिवारपासून रखमानें चंदनशीं बोलणें अजिबात सोडून दिलें होतें. त्या दोघी रोज रात्रीं नेहमींप्रमाणें एकत्र जेवत. पण एकमेकींशीं एक शब्दहि बोलत नसत. त्यांच्या या अबोल्यामुळें बिचाऱ्या येसूची मात्र अगदीं केविलवाणी स्थिति होऊन गेली. रखमा तिच्याशीं सुद्धां फक्त कामापुरतेंच बोलत असे. त्यामुळें ती घरांत

असतांना आजी आणि नात या दोघींना एकमेकींशीं बोलण्याची चोरी होऊन गेली; व त्या घरांतला सगळा वत्सल आनंद मावळून गेला.

आईच्या त्या अबोल्याकडे चंदननें पूर्ण दुर्लक्ष केलें. उलट, पूर्वी ती जी कधीं सभांना जात नसे, ती आतां सभांना जाऊं लागली आणि त्यांत थोड थोडा भागहि घेऊं लागली. कॉंग्रेस मंत्रिमंडळानें राजीनामा दिल्यावर कामगारांच्या चळवळीला जोर चढला; व सार्वत्रिक संपाची तयारी धडाक्यानें सुरू झाली. त्यामुळें चंदनचा वेळ दिवसेंदिवस जास्तच बाहेर जाऊं लागला. आणि मायलेकींची रात्रीची एकत्र पंगत वारंवार तुटूं लागली.

पण, आईविषयीं जरी चंदनचें मन अगदीं विटून गेलें होतें, तरी तिचा घराकडला ओढा मात्र कमी झाला नव्हता. तिच्या दृष्टीनें दिवसेंदिवस झपाट्यानें थकत चाल-लेली तिची म्हातारी आजी हेंच तिचें घर होतें; व तिला दूर सोडून जाण्याची किंवा तिच्या मनाला दुःखद वाटेल असें कांहीं करण्याची चंदनला यत्किंचितहि इच्छा नव्हती. त्यामुळें, कॉंग्रेस मंत्रिमंडळानें राजीनामा दिल्यानंतर दादासाहेबांच्या सांगण्यावरून ऐन दिवाळींत वेगळा रहावयाला लागलेल्या अवधूतनें जेव्हां लग्नाचा प्रश्न एक दोनदां अप्रत्यक्ष रीतीनें काढला, तेव्हां तिनें त्याला कांहींच उत्तर दिलें नाहीं. आपण त्याच्याशीं लग्न करणें म्हणजे एका परीनें घराबाहेर पडणें आहे. तें येसूला कितपत रुचेल याबद्दल तिला जबर शंका होती; व म्हणून त्या बाबतींत तिच्या मनाचा ठाव घेतल्याशिवाय त्याला निश्चित उत्तर द्यावयाचें नाहीं, असें तिनें ठरवून टाकलें होतें.

तथापि, तो अंबाझरीवर वेगळा राहूं लागतांच तिचें त्याच्याशीं असलेलें साहचर्य झपाट्यानें वाढत गेलें. दिवसाचा बहुतेक वेळ तीं दोघें एकत्र घालवीत. तथापि, सूर्यास्ताच्या आंत घरीं परत यावयाचें अशी जी मर्यादा तिनें आपल्या वर्तनाला घालून ठेवली होती, ती मात्र तिनें सहसा कधीं सोडली नाहीं.

परंतु, ती चळवळींत प्रत्यक्ष भाग घेत असल्याचें जेव्हां येसूला एक दिवस शेजा-रच्या बायकांच्या बोलण्यावरून कळलें, तेव्हां तिला ती गोष्ट मुळींच आवडली नाहीं; व आपण या बाबतींत तिला बोलून कदाचित् कांहीं उपयोग होणार नाहीं अशा समजुतीनें तिनें सिस्टर खिश्चियानाजवळ चंदनच्या या वर्तनाविरुद्ध तक्रार करून सिस्टरला तिची कानउघाडणी करावयाला सांगितलें.

त्या दिवशीं रात्रीं चंदन जेव्हां जेवल्यावर सिस्टरकडे गेली, तेव्हां सिस्टरनें तिला म्हटलें—

" मला तुझं भाषण ऐकायची इच्छा आहे बेटा एकदां— "

" माझं भाषण ? मी सभांतून बोलतें हें कोणीं सांगितलं, मावशी तुला ?— "

" अग दशरथनं ! माझा तो आंधळा न् पांगळा बातमीदार शहरांतल्या सगळ्या हालचालींची अचूक बातमी देतो मला रोज. शिवाय गिरणींत कामाला जाणाऱ्या वस्तींतल्या बायकाहि तारीफ करीत होत्या तुझ्या हिंमतीची. गिरणींत प्रत्यक्ष काम करणारी तुझी आई सहसा कधीं सभांना जात नाहीं आणि तूं मात्र सभांतून भाषण करून कामगारांना संपाला प्रवृत्त करिते आहेस याचं नवल वाटतं त्यांना— "

" दशरथ बराच उपद्व्यापी आहे म्हणायचा !— "

" त्याला का उपद्व्यापी म्हणतेस ? उपद्व्याप करतेस तूं. तो बिचारा काय जें जें त्याच्या कानांवर येतं, तें सांगतो येऊन आम्हांला— "

" मी हा उपद्व्याप करतें असंच तुलाहि वाटतं का, मावशी ? मग तुझ्यांत न् मोठ्या मायमध्यें फरक काय राह्यला ग ?— "

" कामगारांना संपाची चिथावणी देणं मुळींच पसंत नाहीं मला. संप सुरू झाला म्हणजे आपल्या या वस्तींत लेकरं कशीं पटापट मरतात न् नवराबायकोची कशी कचकच चालते दिवसभर हें पाह्यलं आहेस ना तूं ?— "

" हो. पण लढाईंत फार माणसं मरतात न् सर्व प्रकारची नासाडी होते म्हणून शत्रूशीं मुकाट्यानें तह करावा न् तो म्हणेल तसं रहावं असं म्हणशील का तूं ? संप हीसुद्धां एक लढाईच आहे, मावशी— "

" खरं आहे तुझं म्हणणं. पण या लढाईंत तुझ्यासारख्या शिकणाऱ्या मुलीनं भाग घ्यावा हें पसंत नाहीं मला मुळींच. तूं सभांतून भाषणं करतेस. पण त्याचा परिणाम काय होईल याचा विचार केला आहेस का पुरता ?— "

" काय परिणाम होईल असं वाटतं तुला ?— "

चंदननें मिस्किलपणानें हंसून विचारलें. पण सिस्टरच्या लक्षांत ती गोष्ट आली नाहीं. तिनें आपल्या गळ्यांतला चांदीचा क्रूस आपल्या हातांत घेऊन म्हटलें—

" काय परिणाम होईल ? परिणाम अगदीं उघड आहे. वस्तींतले सगळे लोक म्हणताहेत तुझा स्नेही तो अवधूत देशपांडे लवकरच पकडला जाईल म्हणून. हिरा परवांच सांगत होती मला कीं, तो महागाईची चळवळ म्हणजे वर्गयुद्धाची आघाडी

आहे असं सभांतून बोलत असतो म्हणून! कोणतं सरकार गय करील अशा विध्वंसक मतप्रचाराची? छे, छे, तूं अगदीं वेड्यासारखी वागते आहेस, पोरी. तुझी माय कांहीं बोलली नाहीं तुला?— ”

“ मोठी माय तर रोजच बोलते— ”

“ आणि तूं तिच्या बडबडीकडे दुर्लक्ष करतेस असंच ना?— ”

चंदन कांहीं बोलली नाहीं; फक्त हंसली.

तेव्हां सिस्टर एकदम रागावून उद्‌गारली—

“ पोरी, तुला थट्टा वाटते का ही सारी? आम्ही सगळ्या म्हाताऱ्या, भित्र्या न् मूर्ख आहोंत असं वाटतं नाहीं का तुला? पण तुझा हा वेडेपणा कांहीं चालूं देणार नाहीं आम्ही. तुझी माय तुला बोलली नाहीं का याबद्दल कांहीं?— ”

“ तिनं आतांशा अबोला धरलाय माझ्याशीं, मावशी— ”

चंदनच्या तोंडून चटदिशीं उत्तर निघून गेलें. आईशीं उडालेल्या आपल्या खटक्याची हकीकत तिनें अद्याप मावशीला सांगितली नव्हती. त्यामुळें तिचें उत्तर ऐकतांच सिस्टरनें आश्चर्यानें विचारलें—

“ का ग, काय झालं अबोला धरायला?— ”

“ त्या दिवशीं रात्रीं मी अवधूतांबरोबर बाहेर नाहीं का गेलें इथूनच परस्पर? त्यावरून ती दुसऱ्या दिवशीं रागावली फार माझ्यावर; न् तेव्हांपासून बोलणं नाहीं आमचं— ”

“ मीं तुला सांगितलं होतं तूं आईशीं भांडूं नकोस या बाबतींत म्हणून— ”

“ हो. मीं तिची समजूत घालायचा पुष्कळ प्रयत्न केला. पण ती अगदीं हट्टाला पेटली— ”

सिस्टर स्तब्ध होती. कांहीं वेळानें ती म्हणाली—

“ पण चंदन, मायनं अबोला धरला असला, तरी तूं तिच्याशीं बोलायचा प्रयत्न केला पाहिजेस. तिला कोण आहे तुझ्याशिवाय दुसरं? तुझ्यापुढं उज्ज्वल भविष्य-काळ आहे; तूं आज मनोराज्यांत रमूं शकतेस. पण तिच्या कपाळीं आतां गतायुष्या-विषयींच्या दुःखद आठवणींची उजळणी करण्याशिवाय दुसरं कांहींहि नाहीं. ती अलिकडे किती खंगली आहे हें पहातेस ना तूं? तिच्या चालण्यांतला सगळा ताठपणा, बोलण्यांतली सारी तडफ पार निघून गेली आहे. तिचं उतारवय तूं दुःखमय करणार का आपल्या वर्तनानं?— ”

तिचे ते कळकळीचे शब्द चंदनच्या हृदयाला भेदून गेले आणि ती एकदम उद्गारली—

" नाहीं, नाहीं मावशी. तिनं दुःखांत पिचत आयुष्य काढावं असं मला कसं वाटेल ? पण ती माझ्याशीं एक शब्द बोलायला, माझ्याकडे पहायला सुद्धां तयार नाहीं. मग मी काय करूं ग अशा स्थितींत ?— "

" तूं बोलायचा प्रयत्न केला आहेस का तिच्याशीं कधीं ?—"

तिच्या त्या प्रश्नाला काय उत्तर द्यावें हें चंदनला सुचेना. कारण, तिनें त्या दिवसानंतर गेल्या महिना दोन महिन्यांत एकदांहि तिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला नव्हता. किंबहुना तिला टाळणें हेंच चंदनचे अलिकडे धोरण होऊन बसलें होतें. म्हणून कांहीं वेळानें ती म्हणाली—

" नाहीं—"

" मग तूं जरूर प्रयत्न करून पहा. गाय कितीहि नाठाळ न् रागीट असली, तरी आपल्या वासरापासून फार वेळ पान्हा चोरून ठेवूं शकत नाहीं. प्रथम एक दोन वेळां लाथा झाडील फार तर. पण वासराचं तोंड कांसेला लागतांच आपोआप पान्हा फुटतो तिला. नाहीं तर आईच नव्हे ती. तसंच याहि बाबतींत आहे. तूं प्रयत्न करून पहा. तिनं पहिल्यांदा जरी कदाचित् झिडकारलं, तरी पुढं ती बोलेल तुझ्याशीं— "

" बरं मी पहातें प्रयत्न करून. पण मला स्वतःला मात्र आशा नाहीं फारशी— "

" तूं चुकतेस, चंदन. आईचा राग हा पावसाळ्यांतल्या उन्हासारखा असतो. तें उन्ह कितीहि कडक भासलं, तरी त्याच्या पाठोपाठ पाऊस हा ठेवलेला असतो. तशी आई कितीहि रागावली जाजावली, तरी त्या रागाच्या पोटीं प्रेमाचा उमाळा असतो, पोरी— "

# अपरात्रीं आलेली चिठी

# १९

सिस्टरनें आपल्या आईविषयीं दिलेल्या या निर्वाळियाचा प्रत्यय चंदनला अखेर एक दिवस अगदीं चमत्कारिक रीतीनें आला.

आपल्या रोजच्या नियमित जीवनाची घडी विस्कटून टाकणाऱ्या संपासारख्या उत्पाती चळवळीविषयीं रखमाची वृत्ति जरी नेहमीं प्रतिकूल असे, तरी या वेळीं मात्र इतर साऱ्या कामगारांइतकीच तिलाहि संपांविषयीं आस्था वाटत होती. कारण, दर रविवारीं येसू बाजारांतून परत आल्यावर प्रत्येक आठवड्याला वाढत चाललेली महागाई आणि जाणवत चाललेली पैशाची टंचाई यांचा जो पाढा वाची, तो ऐकून दिवसेंदिवस बिकट होत चाललेल्या या परिस्थितीतून बाहेर पडावयाला संपाशिवाय दुसरा मार्ग नाहीं, अशी तिची खात्री होऊन चुकली होती. मीठ, तेल, ज्वारी, गहूं, साखर, आगपेट्या वगैरे रोज लागणाऱ्या प्रत्येक वस्तूच्या किंमतींत पन्नास टक्के वाढ झाली होती आणि कांहीं पदार्थ तर दुर्मिळहि होत चालले होते. त्यामुळें दर महिन्याला चंदनच्या लग्नासाठीं म्हणून शिलकी टाकलेल्या रकमेला हात लावण्याची पाळी येते कीं काय अशी धास्ती त्या सास्वासुनांना वाटे; व खर्चाची तोंडमिळवणी करतांना त्यांचा जीव मेटाकुटीला येई. येसू घड्यांच्या खात्यांत कामाला जाण्याचा प्रश्न अलीकडे वारंवार काढूं लागली होती. पण, तिनें इतक्या उतारवयांत कामावर जावें, अशी रखमाची मुळींच इच्छा नव्हती. म्हणून येसू एकादे वेळीं निकरावर आली, म्हणजे रखमा तिला म्हणे—

"यंदां दोन पातळं कमी घेऊं, सासूबाई—"

"तेवढ्यानं काय होणार आहे? शिवाय तूं स्वतःला घेशील कमी. पण चंदनला तर भरपूर कपडे हवेत ना? म्हणून तर मी म्हणतें कीं, यंदां वैशाखांत

तिचं लग्न करून टाकूं या. म्हणजे आपल्या दोघींच्या डोक्यावरलं ओझं उतरेल एक— ”

“ पण तें माझ्यापेक्षां तुमच्याच हातीं जास्त नाहीं का, सासूबाई ? ती आहे का लग्नाला तयार ? तुम्हीं विचारलंय का तिला कधीं ?— ”

“ विचारायचंय काय त्यांत ? आपण ठरवल्यावर ती नाहीं थोडंच म्हणणार आहे ?— ”

तिच्या या प्रश्नाला रखमानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. ती एक उसासा टाकून म्हणाली—

“ तुम्ही आतां या वयांत कामावर जावं अशी इच्छा नाहीं माझी. मी जोंपर्यंत उभी आहें, तोंपर्यंत तरी कामावर जाऊं देणार नाहीं तुम्हांला. वाटल्यास मी स्वतःच थोडं आणखी काम करीन त्याच्या ऐवजीं— ”

“ अग, पण तुला तरी जास्त काम झेपलं पाहिजे ना ? गेले दोन महिने मी पहातें आहे तूं आपली खंगत चालली आहेस दिवसेंदिवस. आणि अशा स्थितींत जास्त काम झेपणार कसं ? मला कामावर जाऊं न देण्याचा हा कांहीं तरीच हट्ट आहे तुझा. बसल्या बसल्या घड्या करण्यांत कांहीं कष्ट नाहींत मला— ”

पण रखमानें तिचें तें बोलणें तिथें तोडून तिला निग्रहानें म्हटलें—

“ सध्यां तरी तुम्ही कामावर जायची गोष्ट बोलूं नका मुळींच. त्यापेक्षां आपण होईल तितकी काटकसर करून दिवस काढूं हे. लढाई काय जन्मभर थोडीच चालणार आहे ?— ”

पण, त्यांच्या गरिबीच्या संसारांत काटकसर करावयाला इतकी थोडी जागा होती आणि आपल्या रहाणीचें प्रमाण एका मर्यादेपलीकडे खालावतां कामा नये याबद्दल रखमाचा कटाक्षहि इतका होता कीं, दर महिन्याला वाढत असलेला महागाईचा ताण त्यांना कांहीं केल्या कमी करतां येईना. चंदननें शिकवणी धरण्याची गोष्ट रात्रीं जेवणाच्या वेळीं एकदोनदां काढून पाहिली. पण रखमानें त्याहि कल्पनेला मोडता घातला. तिच्या मानी मनाला वाटे, ज्या आपल्या मुलीचें शिक्षण बव्हंशीं तिच्या स्वतःच्या हुषारीनें मिळालेल्या शिष्यवृत्त्यांवर चाललें आहे, तिचें शिकणें पुरें होण्यापूर्वीच तिच्यावर आपण संसाराचा भार घालणें आपल्याला कमीपणाचें नाहीं का ?

त्यामुळें रखमाची या खेपेस पक्की खात्री होऊन गेली होती कीं, कामगारांची चाळीस टक्के महागाई भत्त्याची मागणी अगदीं रास्त असून ती पदरांत पडण्यासाठीं कितीहि दिवस संप करावा लागला तरी तो करणें प्राप्त आहे.

तथापि, संपांत प्रत्यक्ष भाग न घेण्याचें तिचें धोरण मात्र कायम होतें. फक्त नागपूर मिल्सच्या समोरल्या पटांगणांत जेव्हां सभा भरत, तेव्हां त्या सभांना मात्र ती हजर रहात असे. अर्थात् अवधूतचें आठवड्यांतून एकादें तरी भाषण ऐकण्याचा योग तिला हटकून येई.

त्याला सभेंत पाहिला म्हणजे रखमाचें मन विलक्षण बेचैन होऊन जात असे. त्याच्या खड्या जोरकस वक्तृत्वावर आणि उमद्या दिलखुलास वागण्यावर कामगार किती लुब्ध होते, हें ती प्रत्यक्ष बघतच होती; व इतर कामगार पुढाऱ्यांपेक्षां महागाईच्या लढ्याच्या बाबतींतील त्याची भूमिका अधिक व्यापक आणि क्रांतिकारक असल्यामुळें तो लवकरच पकडला जाईल, हेंहि उघड दिसत होतें. तरी सुद्धां तो सभेंत बोलावयाला उभा राहिला, म्हणजे त्याच्याविषयीं एक प्रकारचा विलक्षण अविश्वास, विलक्षण दंश तिच्या मनांत उत्पन्न होत असे. ' ते आपल्या वडलांसारखे नाहींत......ते किती चांगले आहेत, किती करारी न् प्रामाणिक आहेत याची कल्पना नाहीं तुला......''...हे चंदनचे त्या दिवशींचे केविलवाणे उद्गार तिला वारंवार आठवत आणि आपल्या एकुलत्या एका मुलीचें त्याच्याविषयींचें तें वेडें प्रेम पाहून तिच्या जिवाचा अगदीं संताप होऊन जाई.

आणि मग तिच्या मनांत केव्हां केव्हां हळूच अशी कल्पना चोरपावलांनीं डोकावून जाई कीं, लोक म्हणतात त्याप्रमाणें जर अवधूतला अटक झाली आणि चांगला दीड दोन वर्षांच्या मुदतीनें तो तुरुंगांत डांबला गेला, तर त्याचा आणि चंदनचा संबंध आपोआपच तुटणार नाहीं का ? आणि तेवढ्या अवधींत आपण तिचें लग्न करून देऊन तिला निराळ्या मार्गाला लावूं शकणार नाहीं का ?

ती कल्पना मनांत आली म्हणजे तिची तिलाच अतिशय शरम वाटे. पण मनांत सतत डोकावणाऱ्या त्या चोरट्या कल्पनेमुळेंच आपल्याला या वेळीं संपाविषयीं फाजील उत्साह वाटत आहे, हें तिचें तिलाहि समजून चुकलें होतें.

त्या उत्साहाच्या भरांत, सार्वत्रिक संपाची घोषणा झाल्यापासून चंदन केव्हां केव्हां रात्रीं बारा वाजेपर्यंत सुद्धां अलिकडे बाहेर राहूं लागली होती, याबद्दल येसू-

जवळ तक्रार करण्याचाहि विचार रखमाच्या मनांत आला नाहीं. ती ता. १ मार्चची वाट उत्सुकतेनें पहात होती.

परंतु, येसूच्या चंदनविषयींच्या तक्रारी मात्र रोज सारख्या वाढत होत्या आणि त्यांना कारणेंहि पण तशींच सबळ होतीं.

चंदन जोंपर्यंत सूर्यास्ताच्या सुमाराला घरीं येत होती आणि नंतर पुन्हा बाहेर पडत नव्हती, तोंपर्यंत येसू तिला फारसें कधीं बोलली नाहीं. तिनें संपाच्या जंजाळांत पडूं नये, एवढेंच फक्त ती वारंवार म्हणे. पण, सार्वत्रिक संप ता. १ मार्च रोजीं करण्याची घोषणा झाल्यापासून चंदनच्या बाहेर जाण्याला किंवा रहाण्याला धरबंद म्हणून उरला नाहीं. त्यामुळें येसू अगदीं वैतागून गेली. पण त्या बाबतींत तिला रखमाजवळ कांहीं बोलतां येईना किंवा सिस्टरकडे गाऱ्हाणें नेऊनहि कांहीं उपयोग होईना. तिच्या मनांत असाहि विचार मधून मधून येई कीं, आपणच एकदां निकरावर आल्यासारखें दाखवून चंदनला रात्रीं बाहेर जाण्याची मनाई करावी. पण, तिच्या लोभस, लडिवाळ वागण्यामुळें तिला एकदम तोडून बोलण्याचा हिय्या कांहीं केल्या येसूला होईना.

परंतु, एके दिवशीं सकाळीं ती बुधवार बाजारांत गेली असतां हिराच्या आजीशीं तिचें जें बोलणें झालें, त्यामुळें चंदनशीं आतां निकरावर आल्याशिवाय निभणार नाहीं, अशी तिची खात्री होऊन चुकली.

हिराची आजी येसूला वाटेंत भेटली; व त्या दोघी म्हाताऱ्यांनीं आपआपल्या चंच्या सोडून लग्न करावयाला नाराज असलेल्या आपल्या नातींच्या कागाळ्या एकमेकींना मनसोक्त सांगितल्या. शेवटीं उठतां उठतां हिराची आजी येसूला म्हणाली—

" आमच्या हिराचं लग्न कांहीं मी जातीबाहेर होऊं देणार नाहीं कांहीं झालं तरी. पण तुम्ही मात्र पहा. तुमची नात त्या देशपांडयाशीं लग्न करणार असं सारा गांव बोलून राह्यलाय सध्यां— "

म्हातारीचें तें खवचट विधान येसूच्या अगदीं मर्मी झोंबलें आणि ती रागानें म्हणाली—

" तुमच्या नातीबद्दलहि लोक तेंच बोलतात. तुम्हांला खबर नाहीं त्याची एवढंच. शिकल्यासवरलेल्या मुलींच्या बाबतींत कुणी उगीच अभिमानानं भरवसा देत बसूं नये— "

" पण माझी नात माझ्या ताब्यांत आहे. ती कांहीं सभेंत बोलत बिलत नाहीं

तुमच्या नातीप्रमाणं किंवा त्या देशपांड्याच्या बंगल्यावरहि जाऊन रहात नाहीं वेळींअवेळीं— ”

म्हातारीनें तोंडांतल्या तंबाकूची पिंक थुंकून मिस्किलपणानें म्हटलें.

“ काय म्हणतां बाई ? त्याच्या बंगल्यावर जाऊन रहाते माझी नात ? कोणी खबर दिली ही तुम्हांला ? तुमच्या नातीनंच तर नव्हे ?— ”

येसूनें संतापानें विचारलें. पण ती म्हातारी अगदीं खमंग होती. ती आपली चंची गुंडाळीत संथपणानें म्हणाली—

“ माझी नात तर सख्खी आहे तुमच्या नातीची ! ती कशाला सांगेल तिच्याबद्दल असल्या गोष्टी ? पण त्याच्या बंगल्यावर सल्लामसलत करायला जाणारे कामगार मात्र सांगतात तुमची नात तिथं नेहमीं दिसते म्हणून— ”

त्या दोघी म्हाताऱ्यांचें बोलणें तेवढ्यावरच संपलें. पण हिराच्या आजीनें आपल्या नातीविषयीं काढलेले ते उद्गार येसूच्या मनांत सारखे डांचत होते; व त्या दिवशीं रात्रीं चंदन दहा वाजून गेल्यावर घरीं परत आल्यामुळें तर तिच्या संतापाला पारावार उरला नाहीं. परंतु रखमा घरांत असल्यामुळें तिच्यासमक्ष कांहीं तो प्रश्न येसूनें काढला नाहीं. पण गुरुवारीं सकाळीं रखमा कामावर जातांच तिनें चंदनला हांक मारून खडसावलें—

“ चंदन, आजपासून रात्रीं जेवल्यावर कुठं जायचं नाहीं बाहेर— ”

आपल्या आजीचा तो हुकूम ऐकून चंदनला एकदम हंसूं आलें आणि तिनें उलट विचारलें—

“ कां ग माय, आज एकदम रागावलीस का तूं माझ्यावर इतकी ?— ”

तिच्या त्या हंसण्यानें येसू अधिकच चिडली आणि म्हणाली—

“ तुला असं वाटतं का पोरी, तूं वाटेल तेव्हां रात्रीं घरीं आलीस तरी आम्ही तुला कांहीं बोलूं नये ? तुझ्या मायनं तुझं नांव सोडून दिलं एवढ्यानं शुद्धीवर यायला हवी होतीस तूं खरोखरी. पण तुला मुळीं कांहीं पर्वाच नाहीं आमच्या रागालोभाची. पण उघड्या डोळ्यांनीं पहावत नाहीं तुझं हें वाटेल तसं वागणं म्हणून बोलावं लागतं— ”

“ वाटेल तसं काय वागतें ग मी ?— ”

“ तूं वागत नसशील असंच मलाहि वाटतं. पण, लोक काय वाटेल तें बोलताहेत

तुझ्याविषयीं; न् तें ऐकवेनासं झाल्यामुळंच मीं आज निरुपायानं म्हटलं हें तुला–"

"लोक काय बोलतात माय !— "

"लोक म्हणतात, तूं दिवसभर त्या देशपांडयाच्या बंगल्यावर असतेस न् त्याच्याशीं लग्न करणार आहेस— "

आपल्या आजीची ती स्पष्टोक्ति ऐकून चंदन अगदीं सुन्न होऊन गेली. तोंच येसू पुढें म्हणाली—

"हें जें माझ्या कानांवर आलंय, तें तुझ्या मायलाहि खात्रीनं कळलं असलं पाहिजे. पण, तिनं नांवच·टाकलंय तुझं म्हणून ती बोलत नाहीं तुला. पण, मायचं न् तुझं त्याच्यावरनं इतकं भांडण झाल्यावरसुद्धां तूं अशा रीतीनं वागावंस, हें बरं दिसतं का तुला ?— "

पण चंदन कांहीं बोलली नाहीं. तेव्हां येसू थोडा वेळ थांबून पुन्हा म्हणाली—

"पण तिनं तुझं नांव टाकलं असलं, तरी मी गप्प बसणार नाहीं. आम्हीं तुला इतक्या खस्ता खाऊन वाढवली, ती कांहीं मोकाट सोडून देण्यासाठीं नव्हे. मला वाटलं, तूं शिकलीसवरलेली, जाणती, जबाबदार मुलगी. मायनं इतकं जीव तोडून निक्षून सांगितल्यावर तरी तूं त्याचा नाद सोडून देशील असं समजून चाललें होतें मी. पण तसं कांहीं न होतां उलट भलभलत्या गोष्टी कानावर यायला लागल्या आहेत रोज. म्हणून ठरवून टाकलं कीं, आज तुझ्याशीं स्पष्टपणानं बोलून एकदां सोक्षमोक्ष करून घ्यायचा या प्रकाराचा—"

तरीहि चंदन स्तब्धच होती. येसूला जें बोलावयाचें होतें, तें सर्व आतां बोलून झालें होतें. म्हणून तिनें पुन्हा शेवटीं म्हटलें—

"मग ऐकलंस ना मीं काय सांगितलं तें ? यापुढं रात्रीं कुठं जायचं नाहीं बाहेर—"

तिचा तो उद्गार ऐकतांच चंदन तिच्या जवळ गेली आणि तिच्या गळ्यांत हात घालून म्हणाली—

"माय मी आज एक गोष्ट सरळ सरळ सांगणार आहे तुला न् तिचं तूं सरळ सरळ उत्तर दिलं पाहिजेस मला—"

"तूं मोठी लबाड आहेस, पोरी ! मी तुझं कांहीं सुद्धां ऐकून घ्यायला तयार नाहीं. पहिल्यांदा मीं सांगितलेली गोष्ट कबूल कर तूं. मग तुझ्या हजार गोष्टी ऐकून घेईन मी—"

" नाहीं. पहिल्यांदा तूं माझं ऐकलं पाहिजेस. आजवर तूं सगळे लाड पुरवले आहेस माझे, माय. आजच्या दिवस तूं माझं ऐकून घे. मग मी तूं काय सांगशील तें ऐकेन—"

" बरं, बरं ! सांग काय सांगायचंय तें चटकन्— "

येसूनें तिचें तोंड कुरवाळून म्हटलें.

त्याबरोबर चंदनच्या डोळ्यांतून एकदम आंसवें ओघळलीं. तेव्हां येसू कळवळून उद्गारली—

" डोळ्यांतून पाणी काढूं नकोस, पोरी. तुझ्याशिवाय दुसरं कोण आहे आम्हांला ? तुझ्या मनांत काय आहे तें सांग मला अगदीं खुल्या दिलानं— "

चंदननें डोळे पुसले आणि म्हातारीच्या प्रेमळ दृष्टींत आपली दृष्टि मिसळून म्हटलें—

" माय, तूं त्यांना पाह्यलं आहेस पुष्कळदां— "

" त्यांना कुणाला ?— "

" त्या देशपांड्यांना. तुला वाटतं का ते आपल्या वडलांसारखे आहेत असं ?— "

" तें कसं सांगणार, पोरी ? लोक म्हणतात, तो फार उमदा आहे म्हणून; न् या महागाईसाठीं जेलखान्यांत जायलाहि तयार झाला आहे. तेव्हां कसं म्हणायचं तो बापासारखा आहे म्हणून ?— "

" मग तुलाहि मायसारखंच वाटतं का मी त्यांच्याशीं संबंध ठेवूं नये असं ?— "

" तसं नाहीं म्हणत मी. पण दिवसा रात्रीं वाटेल तेव्हां त्याच्याकडे जाऊन बसणं हें शोभतं का पोरीच्या जातीला ? त्यामुळंच तर लोक म्हणतात तूं त्याच्याशीं लग्न करणार आहेस म्हणून— "

येसूनें तें शेवटलें वाक्य उच्चारतांच चंदन चट्दिशीं म्हणाली—

" खरं आहे तें, माय— "

" काय खरं आहे ?— "

" मी त्यांच्याशीं लग्न करणार आहे हें— "

" चंदन !— "

येसू एकदम कडाडत उद्गारली—

" तुला काय वेड लागलंय का, पोरी ? कांहीं जात पात पहाशील का नाहीं ? आणि तुम्ही दोघं तयार झाला असलांत, तरी त्याचा तो बाप लग्न होऊं देईल का तुझं त्याच्याशीं ?— "

" पण त्यांच्या वडलांच्या संमतीचा प्रश्न आतां उद्भवतच नाहीं मुळीं, माय· ते दिवाळीपासून वेगळे निघाले आहेत— "

" पण त्याच्या बापाचा सवाल जरी सोडला, तरी तुझी माय तोंड पहाणार नाहीं तुझं तूं त्याच्याशीं लग्न केल्यावर हें विसरूं नकोस चंदन— "

म्हातारीच्या तोंडचें तें वाक्य ऐकतांच चंदन एकदम तिच्याजवळ गेली आणि तिच्या कमरेला मिठी मारून म्हणाली—

" पण माय, तूं नाहीं ना रागावणार माझ्यावर ? तूं नाहीं ना ग सोडून जाणार मला ?— "

" तुला सोडून कुठं जाऊं पोरी मीं ? मला कोण आहे या जगांत दुसरं ?— "

बोलतां बोलतां म्हातारीच्या डोळ्यांना पाणी आलें. तें आपल्या पदरानें टिपून चंदन म्हणाली—

" माय, माझ्या मनची गोष्ट मी सांगितली तुला आज. या उप्पर तूं जर नको म्हणालीस, तर लग्न करणार नाहीं मी त्यांच्याशीं. पण मग तूं दुसऱ्या कोणाशींहि लग्न करायचा आग्रह करतां कामा नयेस मला. मी राहीन जन्मभर गुलाबताईसारखी तुमच्या जवळ— "

" नको ग पोरी, असं भलतं सलतं बोलूंस ! लग्न नाहीं, घरसंसार नाहीं, मुलंबाळं नाहींत, मग सार्थक काय त्या स्त्रीजन्माचं ? आम्ही म्हाताऱ्या काय आतां आज आहोंत न् उद्यां नाहीं. आमच्या समजुतीसाठीं तूं का करून घेतेस आपल्या साऱ्या जन्माचा सत्यानास ? माझी हरकत नाहीं तुला त्याच्याशीं लग्न करायचं असेल तर त्या गोष्टीला. पण तूं आपल्या मायला सांभाळ बाई. मला फार भीति वाटते तिची— "

येसूच्या त्या बोलण्यामुळें चंदनला आपल्या मनावरला मोठा थोरला भार उतरल्यासारखा वाटला. त्या दिवशी दुपारीं जेव्हां ती कॉलेजांतून अवधूतच्या खोलीवर गेली, तेव्हां तिनें त्याला ती सगळी हकीगत सांगून म्हटलें—

" मोठी माय जर माझ्या पाठीशीं राहील, तर मी मायच्या रागाची परवा कर-

णार नाहीं फारशी. ती पहिल्यांदा कदाचित् आततायीपणा करील. पण दिवसगतीनं राग निवळेल तिचा आपोआप. आतां खरी अडचण तुमच्या वडलांचीच आहे—"

"त्यांची अडचण कधींच नव्हती, चंदन. या बाबतींत त्यांचं कांहीं ऐकायचं नाहीं न् त्यांना काय वाटेल याचीहि परवा करायची नाहीं असं ठरवून टाकलंय मी प्रथमपासूनच— "

"पण त्यांना कळल्यावर ते अडथळा करणार नाहींत का लग्नाला ?— "

"अडथळा काय करणार ? नव्या वैदिक पद्धतीनं जर आपण लग्न केलं, तर त्यांना कांहीं सुगावा न लागतां दोन तीन तासांत उरकेल सगळं; न् नोंदणीनं करायचं ठरवलं, तरीहि ते कांहीं अडथळा करूं शकणार नाहींत. इथं राह्यला आल्यापासून गेल्या दीड महिन्यांत त्यांची न् माझी भेट नाहीं अजीबात. पहिल्या पहिल्यांदा मला वेळ मिळे, तेव्हां मी एक दोन दिवसा आड घरून जाऊन येत असे. पण सार्वत्रिक संपाचं निश्चित झाल्यापासून गेल्या दीड महिन्यांत मी जाऊं शकलों नाहीं घरीं; न् त्यांच्या मानी स्वभावामुळं त्यांना कांहीं इथं येऊन मला भेटणं जमायचं नाहीं मुळींच. शिवाय वायदा पटवायचे हे दिवस असल्यामुळें सध्यां ते अतिशय विवंचनेंत आहेत. कदाचित् चंदनवाडीवर जप्तीमुद्धां येण्याचा संभव आहे. त्यामुळं त्यांचं सध्यां मुळींच लक्ष नाहीं माझ्याकडे— "

नंतर क्षणैक थांबून त्यानें विचारलें—

"तूं मावशीला सांगितलंस आपल्या ?— "

"नाहीं अजून. पण आज रात्रीं सांगेन— "

"रात्रीं केव्हां सांगणार ? आज संध्याकाळीं सभा आहे; न् तिला तूं हजर राहिलं पाहिजेस. ती आटोपल्यावर आपण दोघं इथं येऊं न् एकत्रच जेवूं. त्याच वेळीं ठरवूं लग्न केव्हां करायचं न् कशा रीतीनं करायचं तें— "

"मला वाटतं संपाच्या आधीं झालेलं बरं. पुष्कळ लोकांना असं वाटतंय कीं, संप सुरू झाल्याबरोबर पकडतील तुम्हांला— "

"कदाचित् आधींहि पकडतील. त्याचा काय नेम ? मी एकटाच गिरणीमालकांकडून सुचविण्यांत आलेल्या चौकशीकमिटीच्या विरुद्ध आहे, हें माहीत आहे ना तुला ? पण संप सुरू व्हायच्या आधीं लग्न करायचं म्हणजे मग नोंदणीनं करतां येणार नाहीं. कारण, नोटीस द्यायला पुरेसा वेळ नाहीं आतां. मग वैदिक पद्धतीनंच करावं लागेल— "

" कांहीं हरकत नाहीं. पण संपाच्या आदल्या दिवशीं सकाळीं करायचं—"

" ठीक आहे. या सगळ्या गोष्टी रात्रीं जेवतांना निवांतपणानं ठरवूं आपण—"

" यापुढं मी रात्रीं येणार नाहीं तुमच्याकडे न् सभांनाहि हजर रहाणार नाहीं आतां लग्न उरकेपर्यंत. मी आजीला आज सकाळीं कबूल केलंय तसं—"

" छान ! पण आतां येण्या न येण्याचा प्रश्न उद्भवतो कुठं ? संपाच्या आदल्या दिवशीं जर लग्न करायचं ठरवलं आपण, तर आतां मध्यें फक्त दोनच दिवस उरतात. ते दोन दिवस तूं नाहीं आलीस माझ्याकडे तरी चालेल. पण आज रात्रीं यायला मात्र चुकूं नकोस हं !— "

त्यानें हंसत हंसत तिचे दोन्ही हात धरून म्हटलें.

चंदनचा तो सबंध दिवस फार सुखांत गेला. ती कॉलेजांतून चारच्या सुमारास घरीं परत आली; व हिरालाहि तिनें आपल्याबरोबर आग्रहानें घरीं आणलें. येसूला ती कितीतरी दिवसांनीं वेळेवर घरीं आल्याबद्दल अतिशय आनंद झाला. पण तो आनंद फार वेळ टिकला नाहीं. तिनें त्यांच्यासाठीं मुद्दाम तयार केलेली ताजी गरम गरम उपडपेंडी खातांना चंदननें तिला म्हटलें—

" माय, आजच्या दिवस तूं रागावूं नकोस माझ्यावर मला रात्रीं यायला उशीर झाला तर— "

" काय काम आहे रात्रीं तुझं बाहेर ?— "

" आतां संध्याकाळीं सभा आहे. सभा आटोपल्यावर आणखी थोडंसं काम आहे. तें उरकून मी दहाच्या सुमाराला परत येईन घरीं— "

" आणि मग आल्यावर अपरात्रीं जेवणार का ?— "

येसूनें एकदम रागानें विचारलें. त्याबरोबर चंदन किंचित् वरमून म्हणाली—

" नाहीं ग. मी सांगायला विसरलें बघ तुला. सभेनंतर जेवायला जायचंय मला आज एका ठिकाणीं— "

चंदननें तें वाक्य उच्चारतांच हिरानें हळूच तिच्या हाताला चिमटा घेऊन विचारलें—

" कुठलं ग हें ठिकाण ? अंबाझरीजवळचं का ?— "

" अंबाझरीवर ? इतक्या लांब रात्रीं कुणाकडे जेवायला जाणार आहेस तूं ? सकाळीं मी इतकं जीव तोडून बोललें, पण पुन्हा आपलं मूळ पदावर आलं तुझं गाडं— "

येसूच्या रागाचा पारा झपाट्यानें चढत होता. म्हणून चंदन अगदीं काकुळत वाणीनें म्हणाली—

" नाहीं ग, माय. ही थट्टा करिते आहे उगाच. तूं रागावूं नकोस, गडे. आजच्या दिवस होईल उशीर थोडासा. पण उद्यांपासून कांहीं मी दिवस बुडल्यावर पाऊल टाकणार नाहीं घराबाहेर— "

" माझा तुझ्यावर मुळींच विश्वास नाहीं राह्यला आतां, पोरी ! सकाळीं मी इतकं बोललें तुला रात्रीं बाहेर जाण्याबद्दल न् तरी आतां तूं गोष्ट काढलीस पुन्हा रात्रीं बाहेर जायची. तसंच उद्यां संध्याकाळीं काढशील आणखी एकादं काम— "

" नाहीं ग. तुझ्या पायावर हात ठेवून सांगतें माय, मी जायची नाहीं उद्यांपासून रात्रीची पुन्हा बाहेर— "

तिनें चटकन् हातांतली चमचावशी खालीं ठेवून येसूच्या पायांवर हात ठेवले.

त्याबरोबर म्हातारी गहिंवरली आणि तिच्या पाठीवर हात फिरवून म्हणाली—

" बरं, जा बाई आजच्या दिवस. तुझा भरंवसा आहे मला. पण तुझ्या माय-मुळंच मी नको म्हणतें नेहमीं. तिला सांभाळ बाई तूं— "

संध्याकाळीं सहाच्या सुमारास त्या दोघी मैत्रिणी बरोबरच घरांतून बाहेर पडल्या. रस्त्याला लागल्यावर चंदननें हिराला सभेला येण्याचा पुष्कळच आग्रह केला. तेव्हां ती खवचटपणानें चंदनला म्हणाली—

" मी सभेला येतें. पण, नंतर तूं जिथं जेवायला जाणार आहेस, तिथं नेशील का मला आपल्याबरोबर ? नेणार असलीस, तर येतें सभेला— "

चंदन कांहीं बोलली नाहीं. तिचा चेहरा लाल होऊन गेला. तेव्हां हिरानें एकदम तिचा हात धरून म्हटलें—

" चंदन, तूं रागावणार नाहींस ना मी एक गोष्ट स्पष्ट बोललें तर ?— "

" कां ग ? तूं जर स्पष्ट बोलायचं नाहींस हिरा, तर बोलायचं तरी कुणी मग ?— "

" तुझं हें एक सारखं अंबाझरीवर जाणं न् वाटेल त्या वेळीं तिथं रहाणं आतां डोळ्यांवर आलंय बघ सगळ्यांच्या. लोक काय वाटेल तें बोलतात तुमच्याविषयीं; न् त्यामुळं अवधूतांविषयींचा आदरहि कमी होत चाललाय कामगारांचा. अशा रीतीनं निष्कारण लोकांच्या कुचाळीचा विषय होण्यापेक्षां तुमचं जर एकमेकांवर प्रेम आहे तर लग्न का नाहीं करीत तुम्ही ?— "

हिराचा तो प्रश्न ऐकतांच आपला लग्न करण्याचा निश्चय तिला सांगून टाकावा, असें एकदम चंदनच्या मनांत आलें. पण, आज रात्रीं सगळ्या गोष्टी नक्की ठरेपर्यंत तिला कांहीं सांगणें योग्य होणार नाहीं, असा विचार दुसऱ्याच क्षणीं तिच्या मनांत आला आणि तिनें म्हटलें—

" आमच्या सुद्धां मनांत येतं हें, हिरा. पण त्याला कांहीं अडचणी आहेत—"

" जातीचा प्रश्न नडतो का ?— "

" छे, मुळींच नाहीं. अवधूत कोणत्याहि जातीच्या मुलीशीं बेलाशक लग्न करतील— "

" मग अडचण कसली ?— "

" मी सांगेन तुला उद्यां. मग तूं येतेस का सभेला माझ्याबरोबर ?— "

" बरं येतें. पण आपण पहिले माझ्या घरीं जाऊं या. मी मायला सांगतें न् येतें तुझ्याबरोबर. आज सकाळपासून घरीं गेलेली नाहीं मी अजून, त्यामुळं काळजी वाटेल नाहीं तर तिला उगाच. सभा संपल्यावर मी परत येईन बाबांच्या किंवा अभिमन्यूच्या बरोबर— "

हिरानें आपण होऊनच खुलासा करून टाकला. चंदन कांहीं बोलली नाहीं. पण तिनें कृतज्ञतामिश्र प्रेमानें आपला हात हिराच्या अंगाभोंवतीं लपेटला.

त्या दिवशीं रात्रीं चंदन जेव्हां अंबाझरीवरून परत आली, तेव्हां दोन वाजण्याचा सुमार होता. अवधूत तिला घरापर्यंत पोंचवून परत फिरला. तो गेल्यावर तिनें दाराशीं उभे राहून हळूच हांक मारली—

" मोठी माय, कवाड उघड— "

त्याबरोबर येसूनें दार उघडलें आणि रागानें म्हटलें—

" आतां दहा वाजले का तुझे ? माणसाच्या जिवाला कांहीं लाज ? आणि एकटी आलीस तूं एवढ्या रात्रीं ? लाज न् भीति दोन्हीहि कोळून प्यालीस कां तूं, पोरी ?— "

" नाहीं ग माय—"

चंदन येसूच्या अंगाला बिलगून उद्गारली आणि हलकेच तिच्या कानाजवळ तोंड नेऊन म्हणाली—

" ते पोंचवायला आले होते मला इथवर—"

" आणि त्याच्या बंगल्यावर होतीस तूं इतका वेळ, पोरी ?—"

" हो—"

चंदननें तिच्या कुशींत तोंड लपवून हळूच म्हटलें.

"काय चालवलं आहेस हें पोरी तूं ?—"

आणि, ती पुढें आणखी कांहीं बोलणार, तोंच आंतून रखमा खोकल्याचा आवाज आला. तत्क्षणींच चंदननें येसूच्या तोंडावर हात ठेवून तिला गप्प केलें.

त्या वेळीं ती जी हळूच येसूच्या खाटेवर जाऊन निजली, ती नंतर आपल्या अंथरुणावर गेलीच नाहीं. लहानपणीं जरी ती येसूजवळ निजत असे, तरी अलीकडे कितीतरी वर्षांत ती आजीपाशीं निजली नव्हती. त्यामुळें चंदन कुशींत येऊन शिरतांच म्हातारीला गहिंवर आला आणि ती उद्गारली—

" पोरी, तुझ्या रूपगुणांना मोल नाहीं. पण अलीकडे अगदीं ताळ सोडलास तूं—"

बोलतां बोलतां तिनें चंदनच्या अंगावरून हात फिरवला आणि एकदम चमकून म्हटलें—

" किती गरम लागतंय ग अंग तुझं आज न् श्वास तरी किती जोरानं चाललाय ! ज्वर बिर तर नाहीं ना आला तुला ?—"

" तुझी आपली कांहीं तरीच शंका माय ! ज्वर यायला काय झालंय मला ? म्हातारपणामुळं तुझ्या अंगांतलं रक्त कमी झालंय न् त्यामुळं माझं अंग गरम लागतंय तुला·— "

चंदननें हंसून उत्तर दिलें आणि ती म्हातारीला अधिकच बिलगून म्हणाली—

" आतां बोलूं नकोस तूं मुळींच. मी थकून आलें आहे फार. मला निजूं दे स्वस्थ— "

दुसऱ्या दिवशीं पहांटे ती भीत भीतच अंथरुणावरून उठली. आपली आई आपल्याला कांहीं बोलते कीं काय, अशी धास्ती तिला सारखी वाटत होती. पण रखमानें चंदनला कांहीं विचारलें तर नाहींच, पण तिच्याकडे पाहिलेंहि नाहीं. तिनें पुढें आणून ठेवलेला चहा रखमानें मुकाट्यानें घेतला; व आपली वेणीफणी संथपणानें उरकली. सिस्टरनें सांगितल्यापासून चंदननें कितीतरी वेळां तिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला होता. पण विचारलेल्या प्रश्नाला उत्तर देण्यापलिकडे रखमा स्वतः होऊन कधीं एक शब्दहि तिच्याशीं बोलत नसे. पण, आज आपली आई आपल्याला उठल्याबरोबर बोलेल, दसऱ्याच्या आदल्या दिवशीं जशी कडाडून बोलली होती, तशीच आजहि पुन्हा बोलेल, असें चंदनला राहून राहून सारखें वाटत

होतें. पण, आपला नित्यक्रम आटोपून साताचा पोंगा झाल्यावरोबर रखमा नेहमीं-प्रमाणें सासूला सांगून घराबाहेर पडली.

तिच्या त्या वर्तनाचें चंदनला आश्चर्य तर वाटलेंच, पण भीति त्याहिपेक्षां वाटली. तथापि ती गेल्यावर लगेच येसूची परवानगी घेऊन चंदन मावशीला भेटावयाला निघाली.

मिशनच्या फाटकाजवळ ती येतांच आंतून खुरडत खुरडत बाहेर पडत असलेला दशरथ तिला म्हणाला—

" जय रामजीकी चंदनबाई— "

" कुठं निघालास एवढ्या लवकर आज, दशरथ ?— "

" शहरांत चक्कर मारून येतों एक. तुम्ही पुष्कळ दिवसांत दिसलां नाहींत अलिकडे. तुमचं भाषण ऐकायची फार इच्छा आहे मला, चंदनबाई. पण, सभेच्या गर्दीत मी सांपडलों, म्हणजे चिरडून मरायची पाळी येईल एकाद दिवशीं. म्हणून धीर होत नाहीं सभेला यायचा— "

" मी घेऊन जाईन तुला एकाद दिवशीं माझ्याबरोबर. माझ्या मावशीचा हा आंधळा न् पांगळा बातमीदार किती पराक्रमी आहे, हें कळायला नको लोकांना !— "

" तुम्ही उगाच कांहींतरी गैरसमज करून घेतलाय माझ्याविषयीं, चंदनबाई. मीं कांहींच मुद्दाम सांगितलं नाहीं तुमच्याबद्दल अम्माजींना. त्या विचारतात, त्यामुळं सांगावं लागतं. त्यांना माहीत आहे हा आंधळा सारा गांव पालथा घालतो. म्हणून विचारतात त्या मला. तुम्हांला आवडत नसेल, तर सांगणार नाहीं यापुढं— "

दशरथनें विव्हळत विव्हळत म्हटलें आणि लगेच तो विषय बदलून म्हणाला—

" पुष्कळ दिवसांत तुमच्या हातचं गोड भेटलं नाहीं, चंदनबाई. संक्रांतीच्या दिवशीं तुम्ही खिचडी न् कोसल्या वाढल्या होत्या मला, त्याला आतां महिना होऊन गेला. आतां शिवरात्रीला आठवण ठेवा या आंधळ्याची— "

" दशरथ, तूं म्हणजे चालतं बोलतं पंचांग आहेस जसं कांहीं— "

" मग कसं करूं, चंदनबाई ? मीं जर सणवार लक्षांत ठेवले नाहींत, तर गोडधोड कसं भेटेल मला ? इथला ज्वारीचा घाटा लागलाच आहे कपाळीं जन्माचा— "

त्यानें आणखीहि रड गाइली असती आपल्या नशिबाबद्दल. पण चंदनला मिशन-मध्यें जाण्याची घाई होती. म्हणून तिनें मध्येंच त्याला विचारलें—

" छोटी अम्मा आहे का रे आंत ?—

" हो. आतांच प्रार्थना संपून अम्मा देवळांतून बाहेर पडली असेल— "

त्याचें तें उत्तर ऐकतांच ती तडक आंत गेली. देवळांतून बाहेर पडलेल्या बायकांशीं बोलत बोलत सिस्टर ख्रिश्चियाना हळुहळू बंगलीकडे येत होती. चंदनला पहातांच ती म्हणाली—

" कां ग, एवढ्या सकाळीं आलीस आज, चंदन ?— "

" तुझ्याशीं थोडं बोलायचंय, मावशी— "

" बरं, मग देवळांत जाऊं या. आतांच प्रार्थना आटोपली. लोक बहुतेक गेलेच असतील सारे— "

आणि आपल्या भोंवतालच्या बायांना गोड शब्दांनीं बोळवून सिस्टर पुन्हा चंदनसह देवळाकडे जावयाला निघाली. तोंच त्या बाजूनें येणारा एक तगडा जवान तिला सलाम करून म्हणाला—

" येशूकी बढाई, अम्माजी !— "

त्याबरोबर सिस्टर थांबली आणि तिनें त्याला विचारलें—

" काय परवांपासून संप सुरू होणार ना ?— "

" हो. माझ्यापेक्षां या चंदनबाईच जास्त माहिती देतील तुम्हांला संपाविषयीं— "

त्या जवानानें चंदनकडे पहात हंसून म्हटलें. पण त्याच्या त्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून सिस्टरनें विचारलें—

" तुम्हां लोकांचा निश्चय पक्का आहे ना अगदीं ?— "

" हो, अम्माजी. चाळीस टक्के महागाई मिळाल्याशिवाय जगणंच मुळीं शक्य नाहीं आतां आम्हां लोकांना— "

" खरं आहे तुझं म्हणणं, जोसेफ. रुपयाला पांच पायल्यासुद्धां चांगली ज्वारी मिळत नाहीं आतांशा. इथल्या या गरिबांना पोटभर घाटा कसा दोन वेळां वाढतां येईल हाच प्रश्न आहे सध्यां आमच्याहि पुढें. छे, छे, सरकारनें मध्यस्थी करून हा संप टाळलाच पाहिजे. गिरण्यांना लढाईचे ठेके मिळताहेत; न् गिरणीवाल्यांनीं दोन दोन तीन तीन पाळ्या सुरू केल्या आहेत. त्यांच्या नफ्याच्या प्रमाणांत तरी महागाई भत्ता मिळायला नको का कामगारांना ? मला खात्री आहे, सरकार मध्यस्थी केल्याशिवाय रहाणार नाहीं या वेळीं— "

तिच्या त्या कळकळीच्या बोलण्याला जोसेफनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. तो फक्त हांसला आणि म्हणाला—

" परवां प्रार्थना आहे ना दिवसभर आपल्या इथं ?— "

" हो. बव्या अम्मानं सांगितलंय ना तुम्हांला सगळ्यांना ? वस्तींतल्या प्रत्येक इसाई माणसानं भाग घेतला पाहिजे या प्रार्थनेंत. ही राष्ट्रीय प्रार्थना आहे. इथल्या हिंदु माणसांना सुद्धां बोलावणार आहोंत आम्ही— "

सिस्टर हें बोलत असतांनाच जोसेफ पुढें सटकला. पण चंदननें तिला विचारलें—

" ही काय भानगड आहे राष्ट्रीय प्रार्थनेची, मावशी ?— "

तिचा तो प्रश्न ऐकतांच हळुहळू पावलें टाकीत असलेली सिस्टर एकदम थांबली आणि आपल्या हातांतला चांदीचा क्रूस कपाळाला लावून तिनें चंदनला रागानें विचारलें—

" भानगड म्हणतेस तूं प्रार्थनेला, चंदन ? हेंच शिकवलं का तुझ्या त्या कम्युनिस्ट मित्रानं तुला ! मी रोज ऐकतें तुझ्याबद्दल तें खरं आहे म्हणायचं मग सगळं— "

तिचा तो राग पाहून चंदन अगदीं ओशाळून गेली आणि अत्यंत लीनतेनें म्हणाली—

" माफ कर मावशी मला. माझ्या तोंडून चुकून भलताच शब्द निघून गेला— "

" शब्द कधीं चुकून निघत नसतो तोंडून. मनांत कांहीं तरी भावना असते, म्हणूनच शब्द निघतात असले. मी पहातें, अलिकडे तूं प्रार्थनेला यायचं टाळतेस कांहीं ना कांहीं तरी सबब सांगून. तुझी आजी म्हणते तेंच खरं. तुला त्या कम्युनिस्ट मित्राची संगत कांहीं चांगली नाहीं लाभली— "

" तुझी कांहींतरीच समजूत झाली आहे त्यांच्याविषयीं, मावशी. ते कम्युनिस्ट आहेत असं सांगितलं कुणी तुला ? पण ही राष्ट्रीय प्रार्थना म्हणजे काय आहे, तें तर सांग मला आधीं— "

" लढाई लवकर संपावी, मित्रराष्ट्रांचा विजय व्हावा आणि हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळावं म्हणून परवा दिवसभर प्रार्थना चालायची आहे देवळांत— "

" हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळावं म्हणून प्रार्थना करणार तुम्ही ?— "

" हो. का बरं ? तुला नवल का वाटलं एवढं ?— "

" या सगळ्या गोऱ्या सिस्टर सुद्धां सामील होणार आहेत त्या प्रार्थनेंत ?—"

" हो. तूं ये म्हणजे दिसेलच तुला प्रत्यक्ष. हिंदुस्थानाचं स्वातंत्र्य तुमच्या-इतकंच आम्हांलाहि प्रिय आहे. तुमच्या कोणत्याहि देवळांत प्रार्थना होत नसेल कधीं आपला देश स्वतंत्र व्हावा म्हणून. पण, आम्ही जगांत शांतता स्थापन व्हावी म्हणून जशी प्रार्थना करतों, तशीच हिंदुस्थान स्वतंत्र व्हावा म्हणूनहि करितों— "

चंदन कांहीं बोलली नाहीं. त्या दोघी आतां देवळाजवळ आल्या होत्या. आंत शिरल्याबरोबर सिस्टरनें एक गुडघा टेकला, क्रूसाचें चिन्ह केलें आणि नंतर उठून ती चंदनला म्हणाली—

" काय सांगणार आहेस बेटा तूं आज मला ?— "

" मावशी उद्यां सकाळीं लग्न करायचं ठरवलंय आम्ही— "

त्याबरोबर सिस्टरनें एकदम भुवया चढवून आश्चर्यानें विचारलें—

" उद्यां ?— "

" हो, मावशी— "

" आईला सांगितलंस तूं आपल्या ?— "

" नाहीं. फक्त आजीशीं बोलून तिचं मन तयार केलंय. पण तिलाहि सांगितलं नाहीं अद्याप याबद्दल कांहीं—"

" मग ही फसवणूक नाहीं कां होणार तुझ्या आईची ?—"

" हो. पण त्याला इलाज काय ? मीं सांगितलं न् तिनं नाहीं म्हटलं म्हणजे मग ?—"

" खरं आहे तुझं म्हणणं—"

" मीं आपल्या आईला सांगितलेलं नाहीं, त्यांनीं आपल्या वडलांना सांगितलेलं नाहीं. लग्न एकदां होऊन गेल्यावर मग पाहूं काय होतं तें—"

" म्हणजे तुम्हां दोघांच्या आईवडलांचा आशीर्वाद लाभणार नाहीं म्हणतेस या लग्नाला ?—"

चंदननें कांहीं उत्तर दिलें नाहीं. सिस्टरच्या कपाळावरील आठयांचें जाळें आक्रसलें होतें; व आपले मोठे थोरले डोळे संकोचून ती जणुं कसला तरी बारकाईनें शोध घेत होती. कांहीं वेळानें आपल्या गळ्यांतला क्रूस हातांत घेऊन तिनें विचारलें—

" तुम्ही थांबूं शकत नाहीं का आणखी थोडे दिवस, चंदन ? तसं कांहीं तुझं अजून लग्नाचं वय झालेलं नाहीं; न् शिक्षणहि सगळं व्हायचंय. मला वाटतं तुम्हांला थांबायला कांहीं हरकत नाहीं. मी तुझ्या आईशीं बोलून पहातें एकदां सगळ्या गोष्टी— "

" नाहीं मावशी, आतां थांबणं शक्य नाहीं मुळींच. उद्यां सकाळीं लग्न झालंच पाहिजे ठरल्याप्रमाणं— "

चंदन एकदम आवेशानें उद्गारली.

तिचा तो आवेश पाहून सिस्टरला नवल वाटलें आणि आपले भेदक डोळे चंदनवर रोखून तिनें विचारलें—

" कां ग, थांबणं शक्य का नाहीं ? इतकी घाई का करतां आहांत तुम्ही ?— "

तिचा तो प्रश्न ऐकत्तांच चंदन प्रथम गोंधळून गेली. पण लगेच तिनें भानावर येऊन म्हटलें—

" ते आतां केव्हां पकडले जातील याचा कांहीं नेम नाहीं. म्हणून उरकून घ्यायचं ठरवलंय आम्ही उद्यां— "

" केव्हां ठरवलंत तुम्हीं ?— "

" काल रात्रीं— "

चंदननें तिच्या नजरेला नजर न देतां खालीं मान घालून उत्तर दिलें. पण ते शब्द उच्चारतांच तिच्या चेहऱ्यावर आलेली लाली सिस्टरच्या तीक्ष्ण दृष्टींतून सुटली नाहीं.

" आई-बापांना फसवून लग्न करण्याची तुमची ही घाई बरी नाहीं वाटत माझ्या मनाला. पण, ज्या अर्थी तुम्हीं आतां ठरवून टाकलंय, त्या अर्थी मी जास्त कांहीं बोलत नाहीं तुला. तुझ्या आईसारखीच तूंहि मोठी हट्टी न् आंतल्या गांठीची आहेस, चंदन— "

" पण मावशी तूं नाहीं का येऊं शकणार उद्यां लग्नाला ?— "

" मला कसं शक्य आहे, बेटा ? मदरची परवानगी घेतल्याशिवाय मला कुठंहि जातां येत नाहीं इथून. पण तूं नक्की वेळ सांगून ठेव मला. मी प्रार्थना करीन त्या वेळीं इथं येऊन-- "

" बरोबर नवाला लग्न होईल. त्यानंतर तीन तासांनीं आम्ही दोघं इथं येऊं तुझा न् मोठ्या मायचा आशीर्वाद घ्यायला— "

" जरूर ये. मला तुमची ही घाई बरी वाटत नसली, तरी इथं प्रेमानं स्वागत होईल तुमचं— "

बोलतां बोलतां तिनें चंदनला जवळ घेऊन तिच्या कपाळाचें चुंबन घेतलें. त्याबरोबर तिच्या डोळ्यांतले अश्रु चंदनच्या मस्तकावर पडले. पण ती गोष्ट चंदनच्या लक्षांत आली नाहीं.

दुपारीं कॉलेजांत जेव्हां तिची आणि अवधूतची भेट झाली, तेव्हां तो तिला घेऊन खोलीवर गेला; व लग्नाचा सगळा कार्यक्रम त्यानें तिला समजावून सांगितला. लग्नाचें असें निमंत्रण कुणालाच द्यावयाचें नाहीं, असें त्यानें ठरवलें होतें. फक्त आपल्या निवडक दहा बारा मित्रांना त्यानें चहाला बोलाविलें होतें; व ते आल्यावर त्यांच्या समक्ष वैदिक विधीनें लग्न उरकण्याची त्याची कल्पना होती. त्याचें तें सगळें बोलणें ऐकून घेऊन नंतर चंदननें त्याला विचारलें—

" हिरा न् अभिमन्यु यांना सुद्धां सांगायचं नाहीं का आधीं ?— "

" नाहीं. मी अभिमन्यूला मुद्दाम एक तास आधीं बोलावणार आहे; न् तूंहि हिराला घेऊन ये आपल्या बरोबर. तीं दोघं इथं आल्यावर मग सांगूं त्यांना. मला आधीं कोणत्याहि प्रकारची वाच्यता व्हावी अशी इच्छा नाहीं या बाबतींत— "

लग्नाची बातमी आधीं न फुटावी म्हणून तो घेत असलेली ती दक्षता चंदनला अगदीं स्वाभाविक वाटली.

सायंकाळीं कॉलेजांतून परत येतांना हिरानें तिला विचारलें—

" कशाबद्दल चहा आहे ग उद्यां अवधूतांकडे ?— "

" मलाहि कल्पना नाहीं. पण ते लवकरच पकडले जाणार असल्याची दाट वदंता आहे. तेव्हां आपल्या निवडक मित्रांशीं बोलायचं असेल त्यांना कदाचित् कांहीं— "

तिच्या त्या उत्तरानें हिराचें समाधान झालेलें दिसलें. कारण त्यानंतर पुन्हा तिनें चंदनला त्या बाबतींत कांहीं विचारलें नाहीं.

कॉलेजांतून परत घरीं आल्यावर मग पुन्हा कांहीं चंदन त्या दिवशीं बाहेर पडली नाहीं. फक्त सूर्यास्ताच्या सुमारास तिनें आपल्या मावशीला भेटून तिला लग्नाचा कार्यक्रम सांगितला.

रात्रीं आजीच्या कुशींत शिरून तिच्याशीं मनसोक्त गप्पा मारावयाच्या, असें

तिनें योजून ठेवलें होतें. पण, आदल्या रात्रीचें जागरण डोळ्यांवर असल्यामुळें, बोलतां बोलतां केव्हां झोंप लागली, हें तिला समजलेंहि नाहीं.

पण ती झोंप गाढ मात्र नव्हती. उद्यां घडणार असलेल्या प्रसंगासंबंधाचीं नाना प्रकारचीं स्वप्नें तिच्या मिटलेल्या डोळ्यांपुढून सारखीं झराझर जात होतीं.

त्या स्वप्नांतच तिला भास झाला, आपल्याला अवधूत हांक मारीत आहे, अगदीं आर्त वाणीनें कुठून तरी हांक मारीत आहे आणि त्या हांकेनें दचकून ती जागी झाली.

तोंच तिच्या कानांवर हांक आली—

" चंदनबाई, चंदनबाई, आंधळ्याला पाणी पाजा—— "

तिनें तो आवाज ओळखला आणि हलकेच अंथरूणावरून उठून ती छपरींत आली.

छपरींत बारीक करून ठेवलेला कंदील मिणमिण जळत होता. तो तिनें थोडा मोठा केला आणि दाराची कडी काढून ती हळूच बाहेर आली.

तों पायरीला ओठंगून बसलेला दशरथ तिच्या दृष्टीस पडला.

त्याला पहातांच तिच्या पोटांत धस्स झालें.

ती झटकन् दोन पायऱ्या उतरून त्याच्या जवळ गेली आणि त्याला म्हणाली—

" दशरथ, का हांक मारलीस तूं मला अशा अपरात्रीं ?—— "

" व्हरायटीजवळ भिक्षा मागायला जात होतों मी, चंदनबाई. इतक्यांत अवधूत तिथं आले आणि त्यांनीं ही चिठी दिली तुम्हांला देण्यासाठीं. मला म्हणाले, आतांच्या आतां नेऊन दे. सिनेमा सुटायची वेळ झाली होती अगदीं. पण तसाच धडपडत निघालों बघा— "

बोलतां बोलतां त्याला धाप लागली. तो थोडा थांबला आणि त्यानें आपल्या मुठींत घट्ट धरलेली कागदाची घडी तिच्या हातीं दिली. ती घेऊन चंदननें विचारलें—

" मग खरंच पाणी हवंय का तुला ?—"

" हो तर——"

" थोडा थांब. प्रथम मी ही चिठी वाचतें आणि मग पाणी देतें तुला——"

ती लगबगीनें आंत आली, कंदिलाची ज्योत तिनें आणखी थोडी वाढवली आणि ती घडी उलगडून डोळ्यांपुढें धरली.

त्या कागदाच्या कपट्यावर पांच सहा वाक्यें घाईघाईनें लिहिलेलीं होतीं.

*प्रिय चंदन,*

*मला आतांच पकडलें. अटक बेमुदत आहे. सीताबर्डीच्या पोलीस ठाण्याजवळ दशरथ भेटला. म्हणून ही चिठी तरी पाठवतां आली. तुझी फार निराशा होईल. पण धीर सोडूं नकोस.*

*सदैव तुझा*

*अवधूत*

तीं वाक्यें तिनें वाचलीं आणि तिच्या तोंडून एकदम उद्गार निघाला--

" देवा रे, आतां काय करूं मी ?--"

आणि ती तशीच मागल्या मागें पडली.

तिचा तो आर्त उद्गार आणि पडण्याचा आवाज कानांवर आदळतांच रखमा दचकून जागी झाली आणि अंथरुणावरून उठून तांतडीनें बाहेर आली.

दिवा भडकून पेटण्याच्या बेतांत होता आणि हातांत तो कागदाचा कपटा असलेली चंदन जमिनीवर पडली होती.

रखमानें दिवा चटकन् बारीक केला आणि चंदनला आपल्या मांडीवर घेऊन ती ओरडली—

" सासूबाई, सासूबाई, उठा, पाणी आणा आधीं— "

तिच्या त्या हांकेबरोबर येसू जागी झाली आणि तशीच उठून छपरींत आली.

रखमाच्या मांडीवर निपचित पडलेल्या चंदनला पहातांच ती मटकन् खालीं बसली आणि उद्गारली—

" काय झालं ग पोरीला, सूनबाई ? केव्हां इथं येऊन पडली ही अशी ?— "

" तुम्ही पाणी न् कांदा आणा ठेचून आधीं— "

रखमानें पदरानें चंदनला वारा घालीत म्हटलें.

तोंच बाहेरून पायरीवर डोकें ठेवून विव्हळत असलेला दशरथ ओरडला—

" पाणी, चंदनबाई, पाणी पाजा या आंधळ्याला— "

त्याचा तो चमत्कारिक गेंगाणा आवाज ऐकतांच येसूची दृष्टि त्याच्याकडे गेली आणि ती चरकून म्हणाली—

"या मेल्या आंधळ्यानं तर नाहीं ना कांहीं चेटूक केलं हिला? नेहमीं हिच्या मागं मागं असतो भुतासारखा— "

पण रखमाचें सगळें लक्ष आपल्या मांडीवर पडलेल्या चंदनकडे होतें. ती पुन्हा म्हणाली—

"मरूं दे त्या आंधळ्याला! तुम्ही पाणी न् कांदा आणा सासूबाई लवकर—"

येसूनें आंत जाऊन ठेचलेला कांदा आणि पाण्याचा गडवा आणला; व चंदनच्या नाकाशीं कांदा धरून तिच्या तोंडावर हलक्या हातानें पाणी शिंपडलें.

त्याबरोबर ती डोळे उघडून उद्गारली—

"देवा रे, आतां काय करूं मी?— "

"घाबरूं नकोस बेटा, काय झालं तुला?— "

येसूनें तिच्या तोंडावरलें पाणी पदरानें टिपीत कळवळून म्हटलें.

पण चंदन अद्याप पुरती शुद्धीवर आली नव्हती. तिनें डोळे गरगरा फिरवले आणि पुन्हा मिटले.

येसूनें पुन्हा तिच्या तोंडावर पाण्याचा शिडकावा केला.

त्याबरोबर चंदननें डोळे उघडले आणि आपल्या हातांतल्या त्या कागदाकडे पाहिलें.

तत्क्षणींच तिच्या डोळ्यांना धारा लागल्या.

रखमानें हळूच तिच्या हातांतून तो कपटा घेतला आणि दिवा थोडा मोठा करून वाचला.

त्याबरोबर तिच्याहि डोळ्यांत अश्रु आले.

पण, ते दुःखाचे आहेत की आनंदाचे आहेत, हें तिला समजेना.

# नकार

## २०

अवधूतची अटक जरी चंदनला अनपेक्षित वाटली, तरी त्याला स्वतःला मात्र ती अनपेक्षित नव्हती.

कारण, सार्वत्रिक संपाची घोषणा झाल्यावरोबर गिरणमालकांनीं गिरणधंदा आणि कामगारांचें वेतन यांची चौकशी करण्यासाठीं लवाद नेमण्याची जी योजना सुचविली, तिला फक्त त्यानें एकट्यानेंच खणखणीत विरोध केला होता. गिरणमालकांनीं सुचविलेली ही योजना अशी होती कीं, त्यांच्या गिरणकारभाराचा एकंदर खर्च आणि त्यांना मिळणारा नफा या दोन्ही गोष्टींची चौकशी करून मग कामगारांना महागाई भत्ता द्यावा कीं नाहीं व देण्यासारखी स्थिति असल्याचें सिद्ध झालेंच तर तो किती द्यावा, हें त्रयस्थ लवादानें उभय पक्षांचा पुरावा तपासून ठरवावें. या योजनेमुळें महागाई भत्त्याचा प्रश्न तर लांबणीवर पडणारच होता; पण शिवाय गिरणमालक दाखवतील त्या खर्चवेचाच्या पुराव्यावर भत्त्याचें भवितव्य अवलंबून रहाणार होतें.

म्हणून अवधूतचें म्हणणें असें होतें कीं, रोज लागणाऱ्या आवश्यक वस्तूंच्या किंमतींत जर चाळीस पट वाढ झालेली उघड उघड दिसते आहे, तर गिरणधंद्याची स्थिति कशीहि असली, तरी कामगारांना महागाईच्या प्रमाणांत भत्ता हा मिळालाच पाहिजे. कामगारांचें वेतन आणि भत्ता हीं गिरणमालकांच्या नफ्यावर अवलंबून रहातां कामा नयेत, तर केवळ महागाईच्या प्रमाणावर अवलंबून असलीं पाहिजेत. विशेषतः गिरण्या ज्या अर्थी आज युद्धसाहित्याची पैदास फार मोठ्या प्रमाणावर करित आहेत, त्या अर्थी त्या पैदाशीला हातभार लावणाऱ्या कामगारांना पोटभर पगार मिळेल, अशी काळजी घेणें हें सरकारचें कर्तव्य आहे, हा त्याच्या प्रतिपादनांतील मुख्य मुद्दा होता; व या मुद्यावरच चौकशीच्या योजनेविरुद्ध त्यानें सडेतोड भाषणें करून लोकमत उठविलें होतें. कामगारांना त्याचा हा मुद्दा साहजि-

कच पटला. पण इतर कामगार पुढारी मात्र चौकशीच्या योजनेला मान्यता देऊन सध्यांच्या बिकट परिस्थितींत संप टाळावा, अशा मताचे होते. त्यामुळें, अवधूत कम्युनिस्ट आहे आणि केवळ वर्गकलहाच्या दृष्टीनें तो तडजोडीच्या आड येत आहे, अशी ओरड गिरणमालक आणि त्यांचे हस्तक यांनीं सुरू केली.

या त्यांच्या मतलबी हांकाटीचा अर्थ अवधूतच्या तेव्हांच ध्यानांत आला. पण, त्याची अशी समजूत होती कीं, कामगारसंघाच्या कार्यकारी मंडळाची बैठक ता. २९ फेब्रुवारी रोजीं भरून चौकशीच्या योजनेचा स्वीकार करावा कीं नाहीं या प्रश्नाचा निकाल तींत लागेपर्यंत कांहीं आपल्याला अटक होणार नाहीं.

हा त्याचा अंदाज चुकला. संघाच्या कार्यकारिणीची बैठक ता. २९ रोजीं सायंकाळीं भरावयाची होती; व स्वतः लेबर कमिश्नर हा त्या बैठकीला हजर राहून तडजोड घडवून आणण्यासाठीं प्रयत्न करणार होता. कार्यकारी मंडळाच्या या सभेला जरी फक्त कामगारांचे प्रतिनिधीच हजर रहावयाचे होते, तरी कामगारांचा प्रचंड समुदाय संघाच्या कचेरीपाशीं निर्णय ऐकावयाला नेहमींप्रमाणें जमणार, हें उघड होतें. बाहेरल्या या जमावाच्या प्रक्षोभाचें दडपण आंतल्या बैठकींत चालणाऱ्या चर्चेवर पडल्याशिवाय रहाणार नाहीं, अशी सर्वांचीच खात्री होती. त्यामुळें, चौकशीच्या योजनेला अनुकूल असा निर्णय देऊन कार्यकारी मंडळ जर तडजोडीला तयार व्हावयाला हवें असेल, तर समेटाच्या मार्गांतला अवधूतच्या कणखर विरोधाचा कांटा आधीं काढल्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

ता. २८ रोजीं सायंकाळीं कामगारांची जी प्रचंड सभा नीडहॅम पार्कमध्यें झाली, तींत अवधूतनें त्यांना असा स्पष्ट इशारा दिला कीं, " चौकशीची ही तडजोड जर तुम्ही मान्य कराल, तर महागाई भत्त्याचा प्रश्न कांहीं दिवस मागें पडेल इतकेंच नव्हे, तर तुम्हांला पुरती दहा टक्केसुद्धां महागाई मिळणार नाहीं. महागाईचा लढा हा केवळ आपल्या प्रांतापुरता किंवा केवळ गिरणधंद्यापुरताच मर्यादित नाहीं. सर्व हिंदुस्थानांतील श्रमजीवी वर्गाचा हा लढा आहे; व गिरणी कामगार हा लढा ज्या पद्धतीनें आणि ज्या प्रमाणांत यशस्वी करून दाखवतील, त्यावर इतर साऱ्या क्षेत्रांतील श्रमजीविकांचें भवितव्य अवलंबून आहे. " नागपूरच्या पाठोपाठ मुंबईलाहि ता. ४ मार्च रोजीं गिरणी कामगारांचा सार्वत्रिक संप सुरू होत असल्यामुळें नागपूरच्या कामगारांनीं ऐन वेळीं कच खाऊन त्यांचा अवसानघात करूं नये, अशीहि विनंती त्यानें आपल्या भाषणाच्या शेवटीं कामगारांना केली.

तें त्याचें भाषण इतकें निर्णायक आणि ओजस्वी होतें कीं, संघाच्या कार्यकारिणीच्या बैठकींत जर चौकशीच्या योजनेला मंजुरी मिळवयाला हवी असेल, तर प्रथम त्याला तुरुंगांत डांबणें प्राप्त आहे, अशी गिरणमालकांची खात्री होऊन चुकली.

त्या दिवशीं रात्रीं सभा आटोपल्यावर तो आपल्या खोलीवर जाऊन जेवणांतून मोकळा होतो न होतो, तोंच पोलिस लॉरी दारांत येऊन उभी राहिली; व भारत-संरक्षण कायद्यानुसार त्याच्यावर काढलेलें बेमुदत अटकेचें वॉरंट दरोग्यानें त्याला दाखविलें.

तें वॉरंट बघितल्यावर त्याच्या मनांत जर प्रथम कोणता विचार आला असेल, तर तो हा कीं, या प्रसंगाचा चंदनच्या मनावर काय परिणाम होईल ? तिला ही बातमी आतांच्या आतां कळवून कशा रीतीनें दिलासा द्यावा ?

म्हणून त्यानें दरोग्याला विचारलें—

" आपण मला थोडा वेळ द्याल का ?— "

" मी आपल्याला फक्त पंधरा मिनिटें देऊं शकतों— "

दरोग्यानें आपल्या तोंडांतली सिगारेट काढून तिची राख झटकीत कुर्यानें म्हटलें.

" तुम्ही पहातांच आहांत मी इथं अगदीं एकटा आहे. मला आपल्या घरच्या माणसांना निरोप पाठवण्याइतका वेळ आपण देऊं शकाल का ?— "

" नाहीं. आपल्याला फक्त मी इथली आवराआवर करण्यासाठीं पंधरा मिनिटें देऊं शकतों. बाहेर निरोप वगैरे कांहीं पाठवतां येणार नाहीं— "

" ठीक आहे— "

अवधूतनें म्हटलें आणि टेबलावरले कागदपत्र खणांत ठेवून तो लगेच लॉरींत बसला.

पण, लॉरी चालू झाल्यावरहि त्याच्या मनांत एकच विचार वेगानें थैमान घालीत होता आणि तो विचार हा कीं, आपल्याला अटक झाल्याची बातमी चंदनला आतांच्या आतां कळवून तिला कशा रीतीनें धीर देतां येईल ?

तोंच लॉरी व्हरायटी थिएटरावरून सीताबर्डीच्या पोलीस ठाण्याकडे येत असतां त्याच्या कानांवर आवाज आला—

" साहेब, आंधळ्याला एक पैसा— "

तत्क्षणींच त्यानें लॉरीच्या जाळींतून बाहेर पाहिलें.

दशरथ समोरल्या बाजूनें खुरडत विव्हळत हलुहळू व्हरायटी थिएटरकडे येत होता.

त्याला पहातांच अवधूतनें आपल्या नोटबुकांतून कागदाचा कपटा काढला आणि त्यावर घाईघाईनें पांच सहा ओळी खरडल्या.

तोंच लॉरी ठाण्याच्या आवारांत येऊन थांबली आणि तो खालीं उतरला.

दशरथ आवाराच्या समोरून खुरडत खुरडत पुढें चालला होता.

अवधूत चटकन् फाटकाजवळ गेला आणि त्यानें ती चिठी एका आठण्णीला गुंडाळून दशरथच्या गळ्यांतल्या भांड्यांत टाकली.

त्याबरोबर तो आनंदानें उद्गारला—

" साहेब, भगवान तुमचं कल्याण करो— "

तेव्हां अवधूतनें त्याला हळूच म्हटलें—

" दशरथ, तुझ्या भांड्यांत मी टाकलेली चिठी आतांच्या आतां चंदनबाईला नेऊन दे. जास्त कांहीं बोलूं नकोस या वेळीं. मी चाललों— "

हे शब्द उच्चारून तो परत फिरतो न फिरतो, तोंच त्याच्या पाठोपाठ हातांतली छडी नाचवीत आलेल्या दरोग्यानें त्याला हंसत हंसत विचारलें—

" आमच्या हातावर तुरी द्यायचा तर विचार नाहीं ना तुमचा, अवधूत ? आम्ही तुम्हांला संभावित समजून हातकड्या घातल्या नाहींत. बाकी तुम्हां कम्युनिस्टांना इतर सत्याग्रहींप्रमाणें संभावित समजून चालणं ही चूकच आहे एकंदरींत— "

" छे, छे, तुम्ही ती शंकासुद्धां आणूं नका मनांत. लॉरींतून उतरल्याबरोबर समोर एक आंधळा विव्हळतांना दृष्टीस पडला, म्हणून थोडं पुढं जाऊन एक पैसा टाकला त्याच्या भांड्यांत—"

दरोग्यानें मिशीला पीळ भरीत मागें वळून त्या आंधळ्याकडे नजर टाकली आणि म्हटलें--

" नुसता आंधळाच नाहीं, लंगडाहि आहे बिचारा. तुम्ही पैसा दिल्यामुळं विश्रांति घेण्यासाठीं थांबलेला दिसतो तो—"

" हं— "

अवधूतनें मागें न पाहतां आणि न थांबतां पुढें जात म्हटलें.

पण, आपल्या चिठीनें चंदनच्या मनाला धीर वाटेल, अशी जी त्याची अपेक्षा होती, ती मात्र सफल झाली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं तीनच्या सुमारास अभिमन्यु जेव्हां त्याचे कपडे घेऊन तुरुंगांत त्याच्या मुलाखतीला आला, तेव्हां अवधूतनें त्याला विचारलें—

" चंदननं कांहीं विशेष मनाला लावून घेतलं नाहीं ना ?— "

" छे, तिच्या मनाची मुळींच तयारी नव्हती झालेली असं दिसतं. आज सकाळीं तुला पकडल्याचं कळल्याबरोबर मी न् हिरा तिला भेटायला गेलों, तेव्हां आम्हांला पहातांच रडायला लागली ती. तिची आजी सांगत होती काल रात्रीं तुला अटक झाल्याचं समजतांच ती बेशुद्ध पडली होती म्हणून; न् तेव्हांपासून पाणी खळलेलं नाहीं तिच्या डोळ्यांचं. तिची मायसुद्धां आज कामावर गेलेली नाहीं तिच्या काळजीनं— "

त्यानें सांगितलेली ती हकिगत ऐकून अवधूतची मुद्रा एकदम गंभीर झाली आणि तो म्हणाला—

" अभि, तुला मीं एक गोष्ट सांगितलेली नाहीं आतांपर्यंत— "

" कोणती रे ?— "

" आज सकाळीं वैदिक विधीनं लग्न करायचं ठरवलं होतं आम्ही. तुम्हांला जें मीं आज घरीं चहाला म्हणून बोलावलं होतं, तें खरोखरी लग्नाचं निमंत्रण होतं आमच्या— "

त्याच्या तोंडचे ते उद्गार ऐकतांच अभिमन्यूच्या चेहऱ्यावर एकदम विषादाची झांक उमटली. पण क्षणभरच. तो आवंढा गिळून म्हणाला—

" मग चंदनवर तुझ्या अटकेचा इतका विलक्षण परिणाम व्हावा यांत नवल नाहीं कांहीं— "

" हो. त्यामुळंच मी रातोरात तिला निरोप पाठवायची व्यवस्था केली. काल रात्रीं इथं आल्यापासून मला फक्त दोनच माणसांबद्दल सारखी काळजी वाटतेय अभि,—चंदन न् माझी आई. आईला तर बिचारीला कांहींच कल्पना नाहीं. तिची स्थिति विलक्षण झाली असेल अगदीं. तिला तुरुंग म्हणजे कांहींतरी भयंकर वाटतं. तिची आठवण झाली म्हणजे सुचेनासं होतं मला अगदीं— "

बोलतां बोलतां त्याचा आवाज घोगरून गेला आणि तो एकदम थांबला.

तेव्हां अभिमन्यूनें त्याला बरें वाटावें म्हणून म्हटलें—

" पण, त्यांनीं जर एकदां इथें येऊन तुला पाहिलं, तर त्यांची भीति पुष्कळच कमी होईल— "

" हो. पण दादांनीं आणली पाहिजे ना तिला. आज ते येतीलच बहुतेक. किंवा स्वतः यायचं त्यांच्या मनांत नसलं, तर दिवाणजींना तरी पाठवतीलच. तेव्हां मी त्यांना सांगेन आईला घेऊन यायला पुढल्या मुलाखतीच्या वेळीं. नाहींतर मग तूं घेऊन ये तिला—"

तो पुन्हा क्षणभर थांबला आणि नंतर म्हणाला—

" चंदनला तूं असं सांग कीं, लग्न मोडल्यामुळं वाईट वाटून घेऊं नकोस मुळींच. मी तुरुंगांत असतांना सुद्धां लग्न होऊं शकतं आपलं. तिलाहि शक्य झाल्यास पुढल्या खेपेला घेऊन ये तूं माझ्या भेटीला—"

" जरूर आणीन. मला वाटतं दर पंधरा दिवसांनीं भेटूं शकूं नाहीं का आम्ही तुला ?—"

" हो. शिवाय मी आईला न् तिला बहुधा आजच पत्र लिहीन. सध्यां तरी इथलीं बंधनं फारशीं कडक दिसत नाहींत—"

तो बोलतां बोलतां पुन्हा थांबला आणि एकदम अभिमन्यूच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला—

" अभि, चंदनच्या बाबतींत माझी सगळी भिस्त तुम्हां दोघांवर आहे आतां. तूं न् हिरा दोघांनीं जपलं पाहिजे तिला. ती कॉलेजपर्यंत गेलेली असली, तरी ज्याला जग म्हणतात त्याची कांहींच कल्पना नाहीं तिला. लहान मुलासारखं अजाण न् हळवं मन आहे तिचं. मी सुटून येईपर्यंत तुम्ही धीर दिला पाहिजे तिला—"

त्याचा आवाज पुन्हा भरून आला. म्हणून अभिमन्यूनें म्हटलें—

" तूं काळजी करूं नकोस मुळींच. तुझं पत्र गेल्यावर खात्रीनें धीर येईल तिला. शिवाय आम्ही घेऊंच शक्य ती सर्व काळजी—"

आणि मुलाखतीची मुदत संपल्यामुळें त्यानें अवधूतचा निरोप घेतला.

त्यानें वर्णन केल्याप्रमाणें चंदनची स्थिति खरोखरीच अतिशय केविलवाणी झाली होती.

अवधूतला अटक होणार, हें ती जाणून होती. पण लग्नाचें निश्चित झाल्यावर नेमकी आदल्या रात्रींच अटक व्हावी, हा योगायोग तिला अत्यंत सूचक, अत्यंत अशुभ वाटला. त्याच्याशीं संबंध ठेवूं नकोस म्हणून सांगतांना " जगांतल्या पुष्कळ चांगल्या गोष्टी जशा आपल्या नशिबीं नाहींत, तशीच ही एक गोष्ट

समज तूं," असे जे उद्गार तिच्या आईनें काढले होते, ते सारखे तिच्या मनांत येत आणि तिला वाटे अवधूतच्या साहचर्याचें भाग्य आपल्या नशिबीं नसल्यामुळेंच तर लग्नाच्या आदल्या रात्रीं त्याला अटक झाली नसेल ना ?

ती एकच एक भीषण कल्पना, लांकडाच्या गाभ्यांत शिरून भुणभुण करीत त्याला पोखरणाऱ्या भुंग्याप्रमाणें, तिच्या मनांत सारखी भणभणत होती.

सिस्टर ख्रिश्चियानाला सकाळीं प्रार्थनेच्या वेळीं अवधूतला अटक झाल्याचें समजलें. म्हणून ती प्रार्थना संपल्याबरोबर तशीच तडक चंदनच्या घरीं आली. तिला पहातांच चंदनला रडूं आवरेना. येसू आणि रखमा किंवा हिरा आणि अभिमन्यू यांना जरी तिच्या दुःखाची जाणीव होती, तरी जिव्हारीं घाव बसल्यासारखी तिची जी अवस्था झाली होती, त्या अवस्थेचा उलगडा मात्र त्यांना झाला नव्हता. पण सिस्टरला तिच्या त्या अवस्थेचें कारण माहीत होतें. त्यामुळें चंदनचें तें असहाय आक्रंदन पाहून तिलाहि आपले अश्रु आवरेनात.

येसूनें सिस्टरला म्हटलें देखील, "काल रात्रीपासून पोर रडते आहे वेड्यासारखी. लग्नाची बायकोसुद्धां नवऱ्यासाठीं धाय मोकलीत नसेल अशा रीतीनें ! तुम्ही तरी तिला चार शब्द सांगा समजुतीचे. ही जर अशा रीतीनें सारखी रडत राह्यली, तर लोक काय म्हणतील ? आणि हिच्या तब्बेतीवर तरी किती वाईट परिणाम होईल ?—— "

येसूचे ते उद्गार ऐकून सिस्टरच्या मनांत आलें, अवधूतला अटक झाल्यामुळें चंदनला इतकें दुःख का होत आहे, हें तिला सांगून टाकावें. म्हणजे त्या दोघांनीं केलेल्या निश्चयाची त्या सास्वासुनांना कल्पना येऊन त्यांचीं मनें तयार होतील. पण, घाबरलेल्या येसूच्या बडबडीपेक्षांहि चंदनवर सारखी नजर ठेवीत तिच्या भोंवतीं घोटाळत असलेल्या रखमाचें गंभीर मौन पाहून सिस्टरला वाटलें, चंदनची अशी विलक्षण अवस्था कां झाली आहे, हें हिनें ताडलेलें तर नाहीं ? आणि जर तिनें ताडलें असेल तर, आपण त्या अस्वस्थतेचं कारण सांगितल्यानें तिचें कठोर मन अधिकच कठोर होणार नाहीं कशावरून ? किंबहुना आपल्या आईची कोणत्याहि प्रकारची भीड किंवा भीति न बाळगतां चंदन ज्या मोकळ्या मनानें आपलें दुःख प्रगट करीत होती, त्या मोकळेपणाचें मर्म धूर्त रखमाच्या ध्यानांत येऊन तिच्या मनांतली अढी जास्तच बळकट झाली नसेल कशावरून ?

म्हणून चंदनचें अगदीं मोघम शब्दांनीं सांत्वन करून सिस्टर कांहीं वेळानें परत गेली.

त्या दिवशीं दुपारीं अभिमन्यु जो अवधूतची मुलाखत घेऊन तुरुंगांतून परत आला, तो प्रथम तिला येऊन भेटला. चंदनशीं आपल्याला एकांतांत बोलतां यावें, अशी त्याची फार इच्छा होती. पण, रखमा त्या वेळीं तिथें बसलेली असल्यामुळें, त्याला विशेष कांहीं न बोलतां फक्त अवधूतची भेट झाल्याचें सांगून तिचा निरोप घ्यावा लागला.

रखमाची दिवसभर तिच्यावर सक्त नजर होती. आपलें पंख न फुटलेलें पिलूं घरट्यांतून खालीं पडून जाया झालें असतां चिमणी जशी चिंव चिंव करीत त्या पिलाभोंवतीं उडत घिरटया घालीत रहाते, तशी रखमा सारखी तिच्या भोंवतीं घुटमळत होती. त्यामुळें संध्याकाळीं हिरा जरी तिला आपल्या घरीं घेऊन जाण्या-साठीं आली, तरी रखमानें कांहीं तिला घराबाहेर पडूं दिलें नाहीं.

चंदन रात्रीं मूर्च्छेतून सावध झाल्यापासून रखमा तिच्याशीं इतक्या ममतेनें वागत होती कीं, आपल्या आईची मध्यंतरीं दुरावलेली माया आपल्याला पुन्हा लाभली, याबद्दल त्या संकटांतहि तिला समाधान वाटल्याविना राहिलें नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं म्हणजे ता. १ मार्च रोजीं संप होईल आणि आपण घरींच राहून चंदनवर नजर ठेवूं शकूं, अशी उमेद रखमाला वाटत होती. पण आदल्या दिवशीं सायंकाळीं कामगारसंघाच्या कचेरींत भरलेली कार्यकारी मंडळाची सभा पहांटे दोन पर्यंत चालली; तींत मालकांकडून पैसे खाल्ल्याच्या आरोपावरून जोडाजोडीपर्यंत प्रसंग आले; व शेवटीं चौकशीच्या योजनेचा स्वीकार करावा असा ठराव कसाबसा एकदांचा मंजूर झाला. अर्थात् निरनिराळ्या ठिकाणच्या कामगार-वस्तींत रातोरात दवंडी पिटून संप तहकूब झाल्याचें जाहीर करण्यांत आलें. काम-गारवर्गाला हा निर्णय अवसानघातकीपणाचा वाटला. पण, संप चालविण्याच्या बाबतींत त्यांची सारी भिस्त ज्या एका पुढाऱ्यावर होती, तो तुरुंगांत डांबला गेलेला असल्यामुळें त्यांना संघाच्या निर्णयापुढें मान वांकवण्याविना आतां दुसरी गति नव्हती.

ता. १ मार्च रोजीं पहांटे जेव्हां गिरणीचा पहिला पोंगा झाला तेव्हां रखमाचें मन, वस्तींतील इतर साऱ्या कामगारांप्रमाणें, कामावर जावें किंवा नाहीं, याबद्दल डळमळ करीत होतें. गेल्या तीन चार महिन्यांच्या प्रक्षोभक चळवळीमुळें कामगा-

रांच्या आकांक्षा आणि उत्साह हीं शिगेला जाऊन पोंचलीं होती. सार्वत्रिक संप धडाक्यानें होणार आणि तो झाल्यावर युद्धाचे ठेके घेतलेल्या मालकांना कांहीं ना कांहींतरी महागाई भत्ता आपल्याला हमखास द्यावा लागणार, अशा मनोराज्यांत गेले तीन चार महिने कामगार मश्गूल होते. नागपूरच्या संपामागोमाग पांच दिवसांनीं मुंबईचा संप झाला, म्हणजे दोन पूर आलेल्या नद्यांचें पाणी संगमापाशीं एकत्र होतांच जसा जलप्रलयाचा प्रसंग येतो, तशी भांडवलशाहीची अवस्था होईल, अशी कामगारांची अपेक्षा होती; व त्यामुळें विजयाच्या खात्रीनें मोहिमेला निघालेल्या लष्कराच्या वृत्तींतला उन्माद त्यांच्या ठिकाणीं संचरला होता.

पण, ता. १ मार्च रोजीं पहांटे संघातर्फे संप तहकूब झाल्याची जी दवंडी ऐन वेळीं पिटण्यांत आली, तिच्यामुळें तो उताला आलेला सगळा उत्साह आणि त्या उधान चढलेल्या सगळ्या आकांक्षा धाडदिशीं कोसळून पडल्या; व अंगांतील तापाचा जोर उतरतांच उन्माद झालेला रोगी जसा मृतप्राय होऊन निपचित पडावा, तशी कामगारवर्गाच्या समूहमनाची अवस्था होऊन गेली.

त्यामुळें पहांटे जो पहिला पोंगा झाला, तो ऐकतांच अंथरुणावरून नेहमीं चट्दिशीं उठणारी रखमा आज तशीच लोळत विचार करीत पडून राहिली. तिला निजावेंसें वाटेना, उठावेंसेंहि वाटेना. आपल्या शरीरांतली सगळी शक्ति, मनाचा सगळा उत्साह कोणी तरी मंत्रानें काढून घेतला आहे असें तिला वाटलें आणि ती तशीच अंथरुणावर लोळत राहिली.

पण, त्यानंतर पुन्हा तासानें जेव्हां पावणे सातचा पोंगा झाला, तेव्हां मात्र तिला रहावेना. त्या पोंग्याचा कर्कश आवाज कानांवर आदळतांच तिचें शरीर आणि मन, मालकाची हुकमी शीळ ऐकतांच धांवत सुटणाऱ्या कुत्र्याप्रमाणें, गिरणीकडे खेंचलें जाऊं लागलें; व ती अंगावरलें पांघरूण बाजूला सारून खाटेवरून खालीं उतरली.

तोंच वस्तींतल्या कामगार स्त्रिया कामावर जाण्याबाबत तिचा सल्ला विचारण्यासाठीं, अंथरुणावरून उठल्यावर तोंडावर पाण्याचा हात न फिरवतांच, तंबाकूचा बार भरून, तिच्याकडे आल्या. त्यांना काय सांगावें, हें तिला सुचेना. तितक्यांत साताचा पोंगा झाला. तो कानांवर पडतांच त्यांनीं ठरवून टाकलें कीं, संप तहकूब करण्यांत जरी चूक आणि नुकसान होत असलें, तरी आपण आतां मुकाट्यानें कामावर जावें, हेंच उत्तम. आणि त्या बायकांप्रमाणेंच डळमळीत मनानें उशिरां उठून गिरणीकडे धांवपळ करीत चाललेल्या पुरुषांच्या पाठोपाठ त्याहि कामावर जावयाला निघाल्या.

घरांतून बाहेर पडतांना रखमानें चंदनला म्हटलें—

" तुझ्या जिवाला जर बरं वाटत नसेल, तर तूं जाऊं नकोस आज कॉलेजांत. आपल्या जिवापेक्षां कांहीं शिक्षण जास्त नाहीं. शिवाय दुपारीं उन्ह कडक पडतं. तेंहि सोसायचं नाहीं तुला या स्थितींत— "

तेव्हां चंदन तिला म्हणाली—

" दुपारीं दहाच्या सुमारास जर मला बरं वाटलं, तर जाईन मी कॉलेजांत. घरीं बसून तरी काय करूं? तूं काळजी नको करूं उगाच माझी— "

पण, दहाच्या सुमारास हिरा जेव्हां तिला कॉलेजांत आपल्याबरोबर घेऊन जाण्यासाठीं आली, तेव्हां चंदनला कांहीं जाण्याची इच्छा होईना. म्हणून तिनें हिराला म्हटलें—

" आज तर कांहीं येत नाहीं बाई मी. तुम्हीच या दुपारीं दोघं इथं. म्हणजे तेवढाच विरंगुळा वाटेल माझ्या जिवाला—"

आणि ती तशीच अंथरुणावर पडून राहिली.

दुपारीं साडेअकराच्या सुमारास येसू जेव्हां रखमाचें जेवण घेऊन गिरणींत गेली, तेव्हां तिनें पहिला प्रश्न येसूला हा केला—

" पोर घरीच आहे ना आजहि?—"

" हो—"

" तुम्ही लक्ष ठेवा तिच्यावर. मला सारखी धास्ती वाटती आहे ती आपल्या जिवाला कांहीं अपाय करून घेईल कीं काय म्हणून. एकदां महिना पंधरा दिवस निभावून गेले, म्हणजे मग ताळ्यावर येईल आपोआप गाडं—"

" पण तिला बरं वाटल्याबरोबर लग्न उरकून टाकलं पाहिजे तिचं, सूनबाई—"

" हो. माझाहि तोच विचार आहे. तें मोहित्यांचं स्थळ तिला पसंत नाहीं मुळींच. या महिन्या दोन महिन्यांत दुसरा चांगला मुलगा पाहिला पाहिजे—"

" आणि तोंपर्यंत तो देशपांडे सुटून आला तर?—"

" मला नाहीं वाटत तो आतां वर्षभर तरी सुटेलसं. इथं तर सगळे लोक म्हणतात लडाई संपेपर्यंत त्याला सोडणार नाहींत म्हणून. त्याचं नाहीं भय आपल्याला आतां— "

तें वाक्य उच्चारतांना रखमाच्या चेहऱ्यावर न कळत हंसूं चमकलें. पण तें तत्क्षणींच दाबून टाकून ती म्हणाली—

" एका मोठ्या पेंचांतून सुटलों आपण सासूबाई, तो पकडला गेल्यानं— "

" हो. पण पोरीनं हाय खाल्ली आहे अगदीं. काल रात्रीं दोनदां झोंपेंतून दच-कून रडत उठली. काय त्या देशपांड्यानं येवढी मोहनी टाकली आहे तिच्यावर कुणाला ठाउऊ— ;"

रखमाला तिचें तसलें कांहीं बोलणें ऐकण्याची इच्छा नव्हती. म्हणून तिनें मध्येंच म्हटलें—

" तुम्ही कांहीं बोलूं नका उगाच तिला. कोणतंहि दुःख दिवसगतीनं कमी होतं आपोआप. महिना पंधरा दिवसांत तिचं मन थाऱ्यावर येईल न् पुन्हा पूर्वीसारखी हुषार होईल पहा ती— "

" मी आज परत जातांना अंजिराला भेटतें न् मुलगा पाह्यला सांगतें तिला. तिच्याजोगा शिकला सवरलेला, साजरा मुलगा मिळायचा म्हणजे एव्हांपासून खट-पट केली पाहिजे— "

आणि खरोखरीच गिरणींतून परत येतांना ती वाटेंत अंजिराकडे गेली.

आई आणि आजी या दोघीहि बाहेर गेल्यामुळें लाभलेला तो एकांत चंदनला अत्यंत सांत्वनकारक वाटला. आपल्या हृदयांत डांचणारें शल्य ती त्यांना बोलून दाखवूं शकत नव्हती. त्यामुळें त्यांच्या सावध नजरेचा आपल्यावर रात्रंदिवस असलेला तो पहारा तिला असह्य झाला होता. अवधूतची ती दशरथनें आणलेली चिठी वाचल्यापासून गेल्या दोन दिवसांत तिला कोणत्याहि प्रकारचें स्वास्थ्य म्हणून मिळालें नव्हतें. तें आतां प्रथमच तिला लाभलें आणि तिच्या मनांत नाना प्रका-रच्या कल्पना आल्या.

वस्तींतल्या बायकापुरुषांच्या तोंडीं गेले दोन दिवस अवधूतच्या अटकेशिवाय दुसरा विषय नव्हता; व प्रत्येकाच्या बोलण्यांत प्रामुख्यानें फक्त एकच गोष्ट येत असे. ती ही कीं, अवधूतला बहुधा युद्ध संपेपर्यंत सरकार बंधमुक्त करणार नाहीं. प्रथम प्रथम चंदनला तें खरें वाटेना. पण, सकाळीं तिला भेटावयाला आलेली सिस्टर ख्रिश्चियाना जेव्हां म्हणाली कीं, त्याच्यासारख्या उत्पाती मतांचा पुरस्कार करणाऱ्या माणसाला सरकारनें जर लढाई संपेपर्यंत तुरुंगांत ठेवलें, तर नवल मानण्याचें कारण नाहीं, तेव्हां मात्र तिच्या मनाचा धीर खचून गेला आणि तिला वाटलें, मावशी म्हणते त्याप्रमाणें तो जर लढाई संपेपर्यंत सुटला नाहीं, तर आपलें कसें होईल? त्याचा आणि आपला विधियुक्त विवाह जरी दुर्दैवानें होऊं

शकला नसला, तरी मनानें आणि शरीरानेंहि तो आपला पति आहे, ही गोष्ट कोणाजवळ बोलून दाखविण्याची सोय नाहीं आणि आपण बोललों तरी ती पटणारहि नाहीं. अशा स्थितींत, आपल्या आईनें आणि आजीनें जर उद्यां आपल्या लग्नाचा प्रश्न उपस्थित केला, तर त्यांना काय उत्तर द्यावयाचें ? आपण जरी त्याची मुक्तता होईपर्यंत थांबावयाला तयार असलों, तरी त्यांना तितका धीर निघणार नाहीं. किंबहुना, त्याचा कांटा आपल्या मार्गांतून आपोआप निघाला हें लक्षांत घेऊन, आई कदाचित् आपलें लग्न जमविण्याच्या खटपटीला आतां तांतडीनें लागेलहि. तिला आपण काय सांगणार आणि कशा रीतीनें परावृत्त करणार ?

छे, मावशी म्हणते त्याप्रमाणें अवधूत जर लढाई संपेपर्यंत सुटला नाहीं, तर आपली कांहीं धडगत नाहीं. मोठी माय कदाचित् लग्नाच्या बाबतींत त्रास देणार नाहीं आपल्याला. पण माय ? आपण अवधूतला मनानें वरलें आहे असें तिला जीव तोडून जरी सांगितलें, तरी ती आपलें थोडेंच ऐकणार आहे ? त्याच्या आणि आपल्या प्रेमसंबंधाचा बोभाटा इतका कांहीं झाला आहे कीं, बहुधा आपल्याशीं कोणी लग्न करावयाला तयार होणार नाहीं; व मग माय कदाचित् पुन्हा त्या मोहित्याच्या गळ्यांत आपल्याला बांधावयाला तयार होईल.

ही कल्पना मनांत आली आणि चंदनच्या अंगावर भीतीनें कांटा उभा राहिला.

छे, अवधूत सुटला पाहिजे, लवकर सुटला पाहिजे आणि त्याच्याशीं आपलें लग्न ताबडतोब झालें पाहिजे.

हा विचार तिच्या मनांत येतो न येतो, तोंच बाहेरून कोणीतरी आपल्याला हांक मारल्याचा भास तिला झाला आणि तिनें लगबगीनें उठून दार उघडलें.

त्याबरोबर पोस्टमननें तिच्या नांवाचें एक पाकीट तिच्या हातीं दिलें.

पोस्टानें पत्र येण्याचा तिच्या आयुष्यांतला तो पहिलाच प्रसंग होता. आणि हें जें पहिलेंच पत्र तिला पोस्टानें आलें होतें, तें तिच्या प्रियकराचें होतें.

त्या पाकिटावरलें अवधूतचें हस्ताक्षर दृष्टीस पडतांच तिला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें, पराकाष्ठेचा आनंद झाला.

त्या आनंदाच्या भरांत तिला दाराला कडी लावण्याचें भान उरलें नाहीं आणि आंत जाऊन निवांतपणें तें पत्र वाचण्याची कल्पनाहि सुचली नाहीं.

तिनें छपरींत उभें राहून घाईघाईनें तें पाकिट फोडलें आणि आपले आतुर डोळे पत्रावरून झरेकन फिरविले.

तिच्या प्रियकरानें तिला लिहिलें होतें—

*प्रिय चंदन,*

*मला तुरुंगांत येऊन अद्याप पुरते चोवीस तासहि झाले नाहींत, तोंच मी हें पत्र तुला लिहीत आहे. आतांच अभि तुझी हकीकत सांगून गेला. ती ऐकून मला चैन पडेना आणि मी लगेच हें पत्र लिहावयाला बसलों.*

*मला झालेली अटक बेमुदत आहे, ही गोष्ट खरी. पण त्यामुळें इतकें खचून जाण्याचें मात्र कारण नाहीं. त्या दिवशी मध्यरात्रीं आपण जें बोललों, जीं वचनें एकमेकांना दिली, तीं तुझ्या लक्षांत आहेत ना? मी कुठेंही असलों तरी त्या वचनांत अंतर पडणार नाहीं.*

*आमचे दिवाणजी मला आतांच भेटून गेले. ते सांगत होते, मला अटक झाल्याचें कळल्यापासून आई सारखी रडते आहे. तिचें रडणें मी समजूं शकतों. पण, चंदन, तूंही तिच्याप्रमाणें असहाय होऊन रडत सुटावेंस, हें मात्र मला सहन होत नाहीं. आपल्या वैवाहिक जीवनाचा मंगल दिन उगवण्यापूर्वींच माव-ळला हें खरें. पण म्हणून कांहीं तुला इतकें हताश होण्याचें कारण नाहीं.*

*एक गोष्ट तूं लक्षांत ठेव, चंदन. मी जरी येथें अडकून पडलों असलों, तरीहि आपलें लग्न होऊं शकेल. तुरुंगाच्या भिंती आपल्या लग्नाच्या आड येणार नाहींत. तूं मला नुसतें कळव मात्र म्हणजे मी लगेच नोटीस देईन. म्हणून म्हणतों, तुला इतकें भिण्याचें, इतकें खचून जाण्याचें कारण नाहीं.*

*पुढल्या मुलाखतीच्या वेळीं तूं अभिबरोबर मला भेटा-वयाला ये. म्हणजे मी समक्षच तुला सगळ्या गोष्टी सांगेन.*

*सदैव तुझा*

*अवधूत*

चंदननें तें पत्र एकदां वाचून संपविलें आणि दुसऱ्यांदा वाचावयाला सुरवात करणार, तोंच तिच्या कानांवर शब्द आले—

" कुणाचं पत्र वाचते आहेस, चंदन ?—"

तिनें मागें वळून पाहिलें. पायरीवर उभी असलेली हिरा तिच्याकडे आश्चर्यानें बघत होती.

" अवधूतांचं पत्र आहे ना ? ते म्हणालेच होते काल अभीजवळ तुला पत्र पाठवायचा आपला विचार आहे म्हणून—"

हिरा उत्सुकतेनें पुढें येऊन म्हणाली.

पण, चंदननें तें पत्र ब्लाऊजच्या खिशांत ठेवलें आणि तिला विचारलें—

" आणखी काय म्हणाले होते ते अभीजवळ ?—"

अवधूतचें पत्र आपल्याला दाखविण्याची चंदनला इच्छा नाहीं, हें हिराच्या तत्क्षणींच लक्षांत येऊन तिला वैषम्य वाटलें. पण आपलें मन आवरून ती म्हणाली—

" तो येईलच आतां इतक्यांत तुला भेटायला. पण तूं किती दिवस येणार नाहीं आहेस कॉलेजांत ? शिक्षण अजीबात सोडून द्यायचा तर विचार नाहीं ना तुझा ?— "

" तें काय म्हणून ?—"

" अवधूत कदाचित् सुटणार नाहींत युद्ध संपेपर्यंत. तेव्हां म्हटलं, तूंहि कॉलेज सोडणार कीं काय त्यांचा वियोग असह्य होऊन ?—"

तिच्या त्या बोलण्यांतली खोंच चंदनला आवडली नाहीं. पण तसें कांहीं न दर्शवितां ती म्हणाली—

" छे ग, मी उद्यांपासून अगदीं नेमानें येणार आहे कॉलेजांत—"

नंतर त्या दोघीजणी घरांत आल्या आणि कॉलेजांतल्या निरनिराळ्या गोष्टीं-विषयीं गप्पा मारीत बसल्या.

तोंच अभिमन्यु आला आणि त्यानें चंदनला विचारलें—

" पत्र आलं ना अवधूतचं तुला ?—"

" हो—"

चंदननें किंचित् लाजून उत्तर दिलें.

पण, त्यानें पत्र पहाण्याविषयीं यत्किंचित्‌हि उत्सुकता न दर्शवितां तिला विचारलें—

" मग उद्यांपासून जाणार ना कॉलेजांत ?— "

" हो. पण त्यांना सोडवून आणण्यासाठीं कांहीं खटपट करतां येणार नाहीं का ? नाहीं तरी आतां संप तहकूब झालाच आहे. मग सरकारनं त्यांना अटकेंत कां ठेवावं ?— "

" त्याला पकडल्यामुळं संप टळला असं जिथं सरकारला वाटत आहे, तिथं त्याला सोडायला सरकार कसं तयार होईल ? शिवाय आणखी दोन दिवसांनीं मुंबईला सार्वत्रिक संप सुरू होतोय. अशा स्थितींत सरकार त्याला बिनशर्त सोडायला तयार होईल असं वाटत नाहीं मला— "

" पण खटपट करायला काय हरकत आहे ?— "

" हरकत मुळींच नाहीं. विशेषतः त्याचे वडील जर डेप्युटी कमिश्नरला भेटले, तो स्वतः जर चळवळीपासून अलिप्त राह्यला कबूल झाला किंवा आपण कम्युनिस्ट नाहीं असं जर त्यानं लिहून दिलं, तर सुटका होऊं शकेल त्याची— "

" तुमचं बोलणं झालेलं दिसतंय कुणाशीं तरी— "

" हो. मी आज सकाळींच भेटून आलों आहें डे. कमिश्नरला. तो त्याला कम्युनिस्ट समजतो आणि हा त्याचा समज दूर झाल्याशिवाय अवधूतची सुटका होणं कठीण आहे— "

" पण ते तर कम्युनिस्ट नाहींत-- "

" हो. पण आपल्या दृष्टीनं तो कम्युनिस्ट नसला, तरी आर्थिक समतेच्या क्रांतिकारक तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करणारा प्रत्येक मनुष्य सरकारला कम्युनिस्ट वाटतो त्याला आपण काय करणार ? म्हणून आपण कम्युनिस्ट नाहीं असं लिहून द्यायला जर तो तयार होईल, तर सरकार विचार करील त्याच्या मुक्ततेच्या प्रश्नाचा— "

" तसं लिहून देतील ते ?— "

" तें कसं सांगणार ? पण तो कम्युनिस्ट नसल्यामुळें त्याला तसं लिहून द्यायला वास्तविक कांहीं हरकत वाटूं नये—"

" मग तुम्ही सांगत का नाहीं त्यांना तसं ?— "

" सध्यां सगळंच वातावरण फार गरम आहे. तें थोडं निवूं द्या. मग पाहूं काय करायचं तें— "

अभिमन्यूनें हंसून म्हटलें.

त्याच्या या बोलण्यानें चंदनला पुष्कळ धीर आला; व दुसऱ्या दिवशीं ती कॉलेजांत गेली.

पण, तिचा हा धीर फार दिवस टिकला नाहीं. अवधूतची आणि आपली आणखी पंधरा दिवसांनीं भेट होईल व आपण त्याच्याशीं त्या वेळीं कांहीं गोष्टी समक्ष बोलूं शकूं, असें तिला वाटत होतें. पण, त्यानंतर पंधरा दिवसांनीं त्याची मुलाखत घेण्याची जेव्हां वेळ आली, तेव्हां त्याचे वडील आणि आई हीं दोघें त्याला भेटावयला गेल्यामुळें, अभिमन्यूला तिला नेणें शक्य झालें नाहीं. वस्तुतः ती गोष्ट अगदीं क्षुल्लक होती. पण, त्या दिवशीं झालेल्या या निराशेचा तिच्या अधु मनावर असा कांहीं चमत्कारिक परिणाम झाला कीं, तो आतां आपल्या पुन्हा कधींहि दृष्टीस पडणार नाहीं, असें तिच्या मनानें घेतलें.

त्यामुळें त्याची मुलाखत घेऊन अभिमन्यु जेव्हां तिला भेटावयाला आला, तेव्हां ती त्याला म्हणाली—

" चौकशीचं काम आतां संपलंच आहे. मग त्यांना सोडवण्याची जी खटपट तुम्ही करणार होतात, ती करायला काय हरकत आहे आतां ?— "

" आतां खटपट करणं पूर्वींपेक्षांहि कठीण झालंय, चंदन— "

" कां बरं ?— "

" तूं वर्तमानपत्रं वाचीत नाहींस, त्यामुळं कळत नाहीं तुला देशांत काय चाललंय तें. मुंबईच्या सगळ्या कामगार पुढाऱ्यांना सरकारनं परवांच पकडलं न कम्युनिस्ट कार्यकर्ते हे गुप्त रीतीनं उत्पाती चळवळ करीत असल्याबद्दल आपल खात्री पटली असल्यामुळें युद्ध चालू असेपर्यंत आपण त्यांना तुरुंगांत ठेवणार असंहि सरकारनं जाहीर केलंय. अशा स्थितीत त्याला आतां सोडवून कसा आणणार ?—'

" पण ते तर नेहमीं म्हणत असतात मी कम्युनिस्ट नाहीं म्हणून— "

" तसं नुसतं म्हणून काय फायदा ? तो तसं लिहून द्यायला तयार होईल का त्यानं जर तसं लिहून दिलं, तर सरकार बहुधा सोडील त्याला— "

" मग तुम्ही सुचवीत का नाहीं त्यांना तसं ?— "

" मला वाटत नाहीं तो या बाबतींत माझं ऐकेलसं— "

" पण विचारून तर पहा एकदां— "

" तुझी इच्छा आहे तशी असं सांगून विचारतों वाटल्यास— "

" हरकत नाहीं माझी. पण आतां पंधरा दिवसांवर गेली ही गोष्ट नाहीं का ?—"

" छे, मी जर या कामासाठीं मुलाखत मागितली, तर ती लागलीच मिळेल मला— "

" मग मला वाटतं, तुम्ही शक्य तितक्या लवकर विचारून पहावं. कारण चौकशीचा निकाल प्रसिद्ध झाल्यावर मग जर पुन्हा संपाचा प्रश्न उद्‌भवला, तर सरकार सोडणार नाहीं त्यांना— "

" हो. बरोबर आहे तुझा तर्क— "

चंदनच्या त्या आग्रहामुळें अभिमन्यूनें दुसऱ्या दिवशीं डे. कमिश्नरची भेट घेऊन अवधूतच्या खास मुलाखतीची परवानगी काढली; व तो एकटाच त्याला भेटावयाला गेला.

पहिल्या मुलाखतीनंतर लगेच तो पुन्हा इतक्या लवकर आपल्या भेटीला आल्याचें पाहून अवधूतला आश्चर्य तर वाटलेंच पण भीतीहि वाटली. त्यानें एकदम अभिमन्यूला विचारलें—

" का रे, चंदन खुशाल आहे ना ?— "

" हो— "

" आणि आई ?— "

" त्याही खुशाल आहेत— "

" मग तूं आज मुद्दाम का आलास माझ्या भेटीला ? मी आतांच चंदनला पत्र पाठवायच्या विचारांत होतों— "

" तिच्या सांगण्यावरूनच मी मुद्दाम भेटायला आलोंय तुला आज— "

" कांहीं विशेष निरोप आहे तिचा ?— "

" तिला सारखं असं वाटतंय कीं, तूं तुरुंगांतून शक्य तितक्या लवकर सुटून यावंस— "

" मलाहि तसंच वाटतं. पण तें माझ्या हातांत थोडंच आहे ?— "

अवधूतनें हंसून विचारलें.

" नाहीं म्हटलं तरी थोडंसं तुझ्या हातांत खात्रीनं आहे— "

" तें कसं काय ?— "

" सरकारनं तुला पकडलं, तें मुख्यतः तूं कम्युनिस्ट आहेस अशा समजुतीनं. ती सरकारची समजूत जर दूर झाली, तर मला वाटतं तूं लगेच सुटशील— "

" पण ती समजूत मी दूर करणार कशी ?— "

" तूं तसं कळवलंस सरकारला तर दूर होईल ती समजूत— "

" अस्सं ! म्हणजे तूं मला असं सुचवायला आला आहेस का अभि, कीं मी कम्युनिस्ट नाहीं असं सरकारला लिहून द्यावं न् सुटका करून घ्यावी स्वतःची ?— "

बोलतां बोलतां अवधूतचा चेहरा एकदम लाल होऊन गेला व त्याच्या उंच कपाळावरली मधली शीर फुगून तें घामानें डवरून गेलें. त्याच्या चेहऱ्यांत झालेला तो फरक अभिमन्यूच्या लक्षांत आला. पण त्यानें विचारलें--

" हो. तूं जर खरोखरी कम्युनिस्ट नाहींस, तर काय हरकत आहे तसं लिहून द्यायला ?-- "

" हरकत खात्रीनं आहे. सरकारनं कम्युनिस्टांवर शस्त्र धरलं असतां, मी कम्युनिस्ट नाहीं, असं जाहीर करून स्वतःचा बचाव करणं बरं दिसेल का ? शिवाय मी कम्युनिस्ट पक्षाचा सभासद नसलों, आणि त्या पक्षाचं धोरण मला कांहीं बाब-तींत अनिष्ट वाटत असलं, तरी त्यांचा कार्यक्रम मला बव्हंशीं मान्य आहे, हें माहीत आहे ना तुला ?-- "

" पण कम्युनिस्ट पक्ष कांहीं तुला आपल्यांतला समजत नाहीं. मग तसं लिहून द्यायला काय हरकत आहे तुला ? त्यांत कोणत्याहि प्रकारची तत्त्वहानि किंवा मानहानीहि नाहीं— "

" अभि, तूं असं म्हणावंस याचं नवलं वाटतं मला. चंदन सध्यां भीतीनं गांग-रून गेलेली असल्यामुळं तिच्या मनांत असल्या विचित्र कल्पना याव्यात न् तिला सारासारविवेक राहूं नये, हें साहजिक आहे अगदीं. पण, तूं राजकारणांत मुरलेला आहेस. तिची ही कल्पना किती अनर्थकारक आहे, हें समजावून द्यायला हवं होतंस तूं तिला. त्याच्याऐवजीं तूं उलट मजकडून माफीपत्र लिहून घेण्यासाठीं आलास का मुद्दाम माझ्या भेटीला ? मी कम्युनिस्ट असेन किंवा नसेन. तो प्रश्न अलाहिदा आहे. पण अशा प्रकारचं कांहीं सरकारला लिहून देऊन स्वतःची सुटका करून घ्यायची मात्र मुळींच इच्छा नाहीं माझी-- "

ते शब्द त्यानें उच्चारले आणि एक क्षणभरहि न थांबतां तो त्या खोलीं-तून बाहेर पडला.

# निरोप २१

"त्याच रात्रीं का ?—"

सिस्टरनें चंदनच्या पाठीवरून हात फिरवीत विचारलें.

मॅडोनाच्या पुतळ्यासमोर त्या दोघी बसल्या होत्या. पुतळ्यापुढें जळत असलेल्या रंगीबेरंगी मेणबत्त्यांच्या हलत्या सौम्य प्रकाशांत बालयेशूला कडेवर घेऊन उभी असलेली मेरी त्यांच्याकडे कृपादृष्टीनें पहात होती.

"हो—"

चंदननें खालीं मान घालून उत्तर दिलें.

त्याबरोबर गळ्यांतला चांदीचा क्रॉस हातांत घेऊन सिस्टर म्हणाली—

"मला वाटलंच होतं तसं. 'आतां थांबणं शक्य नाहीं' असं जेव्हां तूं त्या दिवशीं मला म्हटलंस, तेव्हांच कल्पना आली होती मला या गोष्टीची—"

"मी त्यांना आजच पत्र घालून कळवलंय मला अशी शंका आल्याचं; न् उम्माची ताबडतोब नोटीस देण्याबद्दलहि लिहिलंय. पण त्यांचं उत्तर यायला पंधरा दिवस तरी लागतील. तोंपर्यंत मी काय सांगूं ग मायला तिनं मला कांहीं विचारलं तर ?—"

"म्हणजे ! तिच्या लक्षांत आली आहे ही गोष्ट ?—"

"बहुधा आली असावी. कारण या खेपेला माझी पाळी चुकल्यापासून ती अगदीं गंभीर न् अबोल झाली आहे बघ—"

"तुला दोन पत्रं आलीं आहेत ना त्याचीं लग्न करायला तयार असल्याबद्दल ! ती दाखव तूं तिला—"

"पण तीं पत्रं पाहिल्यानं तिचं समाधान होईल असं वाटतं का तुला, मावशी ?

तिच्या मनानं असं पक्कं घेतलंय कीं, ते कालत्रयीं लग्न करणार नाहींत माझ्याशी. त्यांचीं पत्रं वगैरे सगळ्या भुलथापा आहेत तिच्या दृष्टीनं— "

" पण त्यानं लग्नाची नोटीस दिल्यावर मग तर कांहीं जागा रहाणार नाहीं ना शंकेला !— "

" हो. पण त्यांना माझं पत्र पोंचल्यावर नोटीस देतील ते. तोंपर्यंत माय काय करील न् काय नाहीं— "

बोलतां बोलतां चंदनच्या डोळ्यांत अश्रु आले.

" तूं अगदीं भिऊं नकोस, बेटा. तुझ्या मायनं जर तुला त्रास द्यायला सुरवात केली किंवा घराबाहेर काढून देईन म्हटलं, तर तूं खुशाल राह्यला ये इथं— "

तें वाक्य उच्चारून सिस्टर एकदम थांबली. तिनें चंदनला आपल्या पोटाशीं धरलं आणि मेरीच्या पुतळ्याकडे पाहून ती सद्‍गदित कंठानें म्हणाली—

" ही कुमारी माता साक्ष आहे, बेटा. मी तुला जन्म दिला नाहीं. तुझ्या जातीची आणि धर्माचीहि मी नाहीं. पोटच्या गोळ्यावर आई जिवाभावानं कसं प्रेम करते, याचाहि अनुभव मला नाहीं. पण, चंदन, तुझी भेट झाल्या दिवसापासून या माउलीजवळ जर कोणती एक करुणा मी भाकली असेल, तर ती तुझ्या कल्याणाची. मी तुला कधींहि अंतर देणार नाहीं, कोणत्याहि स्थितींत दूर लोटणार नाहीं— "

तिच्या डोळ्यांतले अश्रु टपटपां चंदनच्या मस्तकावर पडत होते.

" तुझ्या या प्रेमाला मी खरोखरीच पात्र नाहीं, मावशी. नाहीं तर मी तुझ्या पासून लपवली नसती ही गोष्ट गळ्याशीं पाणी येईपर्यंत. माफ कर मला तूं— "

चंदननें रडत रडत म्हटलें.

" रडूं नकोस, बेटा. जें झालं तें झालं. मी त्याबद्दल दोष देत नाहीं तुला; न त्यांत दोष देण्यासारखंहि कांहीं नाहीं. उद्यां आपलं लग्न होणार अशा खात्रीच्या भरांत गोष्ट घडली ती तुमच्या हातनं. दुर्दैवानं तुमचा तो बेत फसला न् ह चमत्कारिक प्रसंग आला आहे तुझ्यावर आज— "

" हो. मी दुर्दैवी आहे अशी माझ्या मनाची आतां पक्की खात्री होऊन चुकल आहे, मावशी. ज्या दिवशीं त्यांना अटक झाल्याचं कळलं, त्या दिवसापासू माझ्या मनाला सारखं वाटतंय कीं, ते कांहीं आतां पुन्हा माझ्या दृष्टीस पडणा नाहींत— "

" नको, नको, असं बोलूं नकोस, बेटा. तो प्रामाणिक आहे. तो तुला कधींहि अंतर द्यायचा नाहीं, कधींहि फसवायचा नाहीं. तुझं पत्र हातीं पडल्याबरोबर नोटीस देईल तो लग्नाची. मला खात्री आहे त्याच्याबद्दल. तूं असं भलतं सलतं कांहीं आणूं नकोस मनांत— "

" मलाहि खात्री आहे त्यांच्याबद्दल. पण मायची फार भीति वाटते ग— "

" तुला जर ती कांहीं भलतं सलतं बोलली, तर लगेच मला येऊन सांग. मी तिची समजूत घालायचा प्रयत्न करीन. नाहींच जर तिनं ऐकलं, तर तूं लग्न होईपर्यंत राह्यला ये इथं माझ्याजवळ—— "

बोलतां बोलतां ती एकदम थांबली आणि कांहीं वेळानें तिनें चंदनला विचारलें—

" तुला निरोप नाहीं का त्याला पाठवतां यायचा कुणा विश्वासांतल्या माणसा-रोबर ? अभिमन्यूचा उपयोग होईल का या बाबतींत ?—— "

" पण, त्याला ही गोष्ट स्पष्ट सांगावी लागेल, मावशी— "

" हो. तूं त्याला माझ्याकडे पाठव. मी सांगतें त्याला. ही गोष्ट उघडकीस येण्या-र्वींच लग्न झालं पाहिजे तुमचं. नाहीं तर तुझी आईच काय, ही सगळी वस्ती ायला उठेल तुला— "

" मग अभिमन्यूला उद्यां पाठवूं म्हणतेस तुझ्याकडे ?— "

" जरूर पाठव. मी त्याला सांगेन सगळ्या गोष्टी नीट समजावून; न् तो त्याच्या लाखतीला जाऊन नोटीस द्यायची व्यवस्था करील. पण तूं धीर सोडूं नकोस टा— "

सिस्टरनें तिचे डोळे पुसून म्हटलें.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं चंदन अभिमन्यूला भेटावयाला मुद्दाम विद्यापीठाच्या थालयांत गेली; व तिनें त्याला विचारलें——

" तुम्हांला भेट घेतां येईल का पुन्हा त्यांची या आठवड्यांत ?—— "

" का बरं ? कांहीं विशेष काम आहे का तुझं ?—— "

" हो—— "

" मी प्रयत्न करून पाहतों. पण मला शक्य नाहीं वाटत आतां पंधरा दिवस ी त्याची मुलाखत मिळणं—— "

" मागं नव्हती का तुम्हांला परवानगी मिळाली ? तशीच याहि वेळीं मिळेल—"

" मागची गोष्ट निराळी होती. त्या वेळीं मी डे. कमिश्नरला स्पष्ट सांगितलं होतं

त्याला अटकेंतून सोडवायच्या दृष्टीनं बोलणं करण्यासाठीं मी त्याची भेट मागतोंय म्हणून. या वेळीं तसं कांहींच कारण सांगतां येणार नाहीं मला-- "

" कायद्याच्या कामासाठीं त्यांची भेट केव्हांहि मिळूं शकते असं म्हणाला होतात तुम्ही एकदां मला—"

" हो. आणि या आठवड्यांत त्याचे वडील तशाच स्वरूपाच्या कांहीं तरी कामासाठीं मुलाखत घेणार आहेत त्याची दोन तीन दिवसांत—"

" कां ? काहीं कर्जाची भानगड आहे का ?—"

" तसंच कांहीं तरी असलं पाहिजे. कालच दिवाणजी सांगत होते मला दादासाहेब बंगला विकून टाकायच्या विचारांत आहेत म्हणून. यंदा कांहीं वायदा भरलेला नाहीं त्यांनीं अजून. शिवाय माधवदास शेठजीचाहि तगादा सुरू आहे सारखा. तो तर चंदनवाडीवर जप्ती आणायच्या बेतांत आहे म्हणतात. त्यामुळं बंगला विकावा आणि चंदनवाडीवरलं गंडांतर टाळावं अशी कांहींतरी खटपट चालली आहे दादासाहेबांची; न् त्यासाठींच भेटणार असतील ते त्याला—"

" मग या आठवड्यांत कांही त्यांची मुलाखत मिळणं शक्य होणार नाहीं म्हणता ?— "

" हो. पण तसंच कांहीं निकडीचं काम असेल तर सांग. मी प्रयत्न करून पाहीन. डे. कमिश्नरचा माझ्यावर किती लोभ आहे हें माहीतच आहे तुला. त्यामुळं कदाचित् जमेलहि— "

चंदन कांहीं बोलली नाहीं.

तिच्या त्या मौनानें तो बुचकळ्यांत पडल्यासारखा झाला. थोडा वेळ वाट पाहून त्यानें विचारलें--

" तूं कांहीं पत्र देणार आहेस का त्याला ?--"

" नाहीं. पत्र मीं कालच पाठवलं-- "

तेवढें वाक्य उच्चारून ती थांबली आणि आवंढा गिळून म्हणाली--

" तुम्ही आज मावशीला भेटूं शकाल का रात्रीं ? ती सांगेल तुम्हांला त्यांच्याशीं काय बोलायचं तें--"

बोलतां बोलतां तिचा चेहरा लाल झाला आणि डोळे भरून आले.

तिची ती चमत्कारिक अवस्था त्याच्या तत्क्षणींच लक्षांत आली. म्हणून त्यानें खोकला आल्यासारखें करून तोंड फिरवलें आणि म्हटलें—

" मी भेटतों सिस्टरला रात्रीं आणि शक्य तितक्या लवकर त्याची मुलाखत मिळवण्याचाहि प्रयत्न करितों-- "

अभिमन्यूच्या त्या उत्तरानें तिला धीर आला. अवधूत पकडला गेल्यापासून गेल्या दीड महिन्यांत तो तिच्याशीं इतक्या निष्ठेनें आणि तत्परतेनें वागत आला होता कीं, मावशीइतकाच त्याचाहि आधार आपल्याला या दारुण संकटांत आहे, असें तिला अलिकडे वाटूं लागलें होतें. आजपर्यंत तो आपल्या मैत्रिणीचा थोरला भाऊ याच दृष्टीनें ती त्याच्याकडे पहात आली होती. पण आतां तो तिला सख्ख्या भावासारखा वाटावयाला लागला होता; व हिराच्या बोलण्यांत जो केव्हां केव्हां वैषम्याचा भाव दिसे, त्यामुळें तर तिचें मन आतां त्याच्याशींच जास्त मोकळें होत चाललें होतें.

तरीसुद्धां आपल्या काळजीचें नाजूक कारण त्याच्याजवळ बोलून दाखविण्याचा हिम्या तिला कांहीं झाला नाहीं.

पण, त्या काळजीमुळें तिच्या वृत्तींत आणि प्रकृतींत पडत चाललेला फरक येसूच्या सुद्धां ध्यानांत आल्याशिवाय राहिला नाहीं. तिचें जेवण तुटत चाललें होतें; गालहाडें वर आलीं होतीं; व शरीर एकाएकीं रोडावून गेलें होतें. कॉलेज आतां बंद झालेलें असल्यामुळें ती दिवसभर घरींच असे. पण तिचा दिवसाचा बहुतेक वेळ आपल्या खोलींत खाटेवर लोळून रहाण्यांत जाई. त्यामुळें येसू अखेर एक दिवस जेवतांना तिला म्हणाली--

" तुझी अन्नावरली वासना अजीबात उडून गेली, पोरी; न् अशक्तीहि येत चालली आहे दिवसेंदिवस. तूं आतां सोडून दे हें शिक्षण-- "

" माय, मी कितीहि खाल्लं, तरी तुला तें थोडंच वाटतं; न् भलभलत्या शंका येतात तुला माझ्या तब्बेतीविषयीं. कॉलेज बंद होऊन आतां पंधरा दिवस झाले. तेव्हां माझ्या कमी खाण्याचा न् शिकण्याचा संबंध काय ?— "

" मला आतां एक म्हातारचळ लागलाय. पण तुझ्या मायला विचारून पहा ती काय म्हणते तें— "

पण, रखमा कांहीं बोलली नाहीं. ती मुकाट्यानें जेवीत होती.

त्या दोघी जेव्हां कांहीं बोलेनात, तेव्हां येसू रागारागानें म्हणाली—

" तुम्ही दोघीहि मायलेकी आंतल्या गांठीच्या आहांत अगदीं. पण तूं शिकणं

सोड किंवा नको सोडूं. मी मात्र यंदा ज्येष्ठांत लग्न करून देणार तुझं. मग तुझ्या नवऱ्यानं दिली परवानगी तर जा खुशाल कॉलेजांत— ”

तरीहि रखमा कांहीं बोलली नाहीं. पण येसूचा तो निर्धार ऐकून चंदन मात्र अत्यंत अस्वस्थ झाली.

तिला आतां एक एक दिवस युगासारखा वाटत होता. अभिमन्यु आपल्याला भेटून गेल्याचें सिस्टरनें तिला सांगितलें होतें. पण, त्यानंतर आतां चार दिवस होऊन गेले, तरी तो कांहीं तिला भेटावयाला आला नाहीं किंवा हिराबरोबर त्यानें कांहीं निरोपहि पाठवला नाहीं. इतके दिवस त्या दोघी संध्याकाळीं नेमानें फिरावयाला जात असत. पण अलिकडे तिला मधून मधून मळमळल्यासारखें आणि घेरी आल्यासारखें वाटूं लागल्यामुळें ती संध्याकाळींहि घराबाहेर पडेनाशी झाली.

आणि, संध्याकाळच्या त्या उदास वेळीं ती घरीं राहिली, म्हणजे आपल्या परिस्थितीविषयींचे भयानक विचार, पडक्या ओसाड घरांत घिरट्या घालणाऱ्या पाकोळ्यांप्रमाणें, तिच्या निराश मनाला सतावून सोडीत.

मनाच्या त्या सचिंत, भयविव्हळ स्थितींत तिला जर सगळ्यांत भीति कोणत्या गोष्टीची वाटली असेल, तर ती आपल्या आईच्या मौनाची. त्या मौनाचा अर्थ ती जाणून होती आणि त्यामुळें आई घरांत असली, म्हणजे घरांत सापाचा संचार असल्याची जाणीव असलेला मनुष्य जसा सभय सावधतेनें वागतो, तशी तिची अवस्था होऊन जात असे.

पण तें रखमाचें मौन एक दिवस अचानक संपलें.

त्या दिवशीं रविवार असल्यामुळें येसू नेहमींप्रमाणें सकाळीं बाजारांत गेली होती; व चंदन आपल्या खोलींत खाटेवर पडून लोळत होती. इतक्यांत रखमा एकदम आंत आली आणि तिनें विचारलें--

“ चंदन, काय झालं ग दिवसभर लोळायला तुला ?-- ”

आईचा तो प्रश्न ऐकतांच, पाठीवर चाबकाचा फटका बसावा त्याप्रमाणें, चंदन सटकन् उठून उभी राहिली आणि तिची भेदक दृष्टि टाळून म्हणाली--

“ कांहीं नांहीं. उगाच पडलें होतें वाचीत-- ”

त्याबरोबर रखमा तिच्या जवळ गेली आणि तिचें तोंड वर करून तिच्या नजरेला नजर भिडवीत म्हणाली--

“ चंदन, खरं सांग मला. हा काय प्रकार आहे ?— ”

चंदननें तिचा तो प्रश्न ऐकला आणि एकदम जोरानें हुंदका दिला.

रखमानें तत्क्षणींच आपले हात मागें घेतले आणि चंदन मटकन् खाटेवर बसली.

कांहीं क्षण त्या खोलींत अगदीं शांतता होती.

नंतर रखमानें अगदीं संथपणानें बोलावयाला सुरवात केली.

"त्या दिवशीं रात्रीं जेव्हां तूं दोन वाजतां परत आलीस, तेव्हांच माझ्या पोटांत धस्स झालं. पण मला वाटलं, तूं शिकलीसवरलेली आहेस, तुला जबाबदारी कळते आपली, तुझ्या हातून अशी भलतीच चूक होणार नाहीं. तो तुरुंगांत गेल्यावर तुझी जी वेड्यासारखी अवस्था झाली, ती पाहून मला शंका येई मधून मधून. पण मी समजूत घालीत असे माझ्या मनाची. पण अखेर डाव साधला आमच्या कमनशिबानं—"

रखमा भिंतीला टेकून उभी होती. तिचा आवाज हळुहळू चढत गेला. पण तिच्या वृत्तींत किंवा बोलण्यांत कोणत्याहि प्रकारचा संताप किंवा त्वेष नव्हता. ती अगदीं शांतपणानें, अगदीं विचारपूर्वक बोलत होती. पण तिच्या तोंडून बाहेर पडणाऱ्या प्रत्येक शब्दांत एक प्रकारचा विलक्षण उद्वेग, विलक्षण वैताग भरलेला होता.

चंदन दोन्ही हातांनीं तोंड झांकून मुकाट्यानें अश्रु गाळीत होती.

"आतां कशाला रडतेस? त्या दिवशीं सकाळीं मीं तुला इतकं जीव तोडून सांगितलं त्याच्याशीं संबंध ठेवूं नकोस म्हणून, तेव्हां ऐकलं नाहींस तूं माझं आणि आतां कशाला रडतेस? मी त्याच्या बापाची रखेली व्हायचं नाकारलं; पण माझ्या करंट्या नशिबानं अशा रीतीनं सूड घेतला अखेर माझा—"

तिचे ते कठोर शब्द कानांवर पडतांच चंदन एकदम खाटेवरून उठली आणि आवेशानें म्हणाली—

"नको, नको माय, असं नको बोलूं. माझ्या हातून चूक झाली हें कबूल करतें मी. पण, तुला जी भीति वाटते, तसं कधींहि व्हायचं नाही, माय. ते ज्या दिवशीं पकडले गेले, त्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळींच लग्न व्हायचं ठरलं होतं आमचं. तूं मावशीला विचारून पहा वाटल्यास—"

"ती येणार होती वाटतं लग्नाच्या वेळीं कन्यादान करायला? छान! चांगले पांग फेडलेस तूं चंदन, आमचे! आम्ही दोघी घरांत जिवंत असतां तिला जी तूं

या लग्नाच्या कटांत सामील करून घेतलीस, ती आम्हांला फसवण्यासाठींच कीं नाहीं ? चांगले उपकार फेडलेस पोरी, नऊ मास तुला उदरीं वाह्यल्याचे--

" नाहीं माय, तुला फसवायची इच्छा नव्हती माझी मुळींच. पण तूं रागावशील, आमच्या लग्नाच्या आड येशील, या भीतीनं धैर्य झालं नाहीं मला तुझ्याजवळ ती गोष्ट बोलण्याचं. पण मोठ्या मायजवळ मात्र मी अर्धवट बोललें होतें याबद्दल--"

" म्हणजे तुझ्या दृष्टीनं मीच एक काय ती तुझी पूर्वजन्मींची दावेदार म्हणायची !-- "

" नाहीं, नाहीं माय. मी चुकलें. तूं क्षमा कर मला-- "

चंदन रडत रडत म्हणाली. रखमाचा तो उद्गार तिच्या काळजाला भेदून गेला.

" मी कधींच क्षमा केली आहे तुला. नाहीं तर त्या दिवशीं सकाळीं तूं मला वचन द्यायचं नाकारल्यावर मी तोंड पाह्यलं नसतं तुझं पुन्हा. पण मीं क्षमा केल्यानं कांहीं पुढला प्रश्न सुटत नाहीं— "

" नाहीं, माय. तुरुंगांत गेल्यावर दुसऱ्याच दिवशीं त्यांनीं मला पत्र लिहून कळवलं कीं, तूं म्हणशील तेव्हां मी लग्न करायला तयार आहे तुझ्याशीं. तुला दाखवतें मी तें पत्र हवं असल्यास— "

" नको, नको. मला कांहीं सुद्धां पाह्यची इच्छा नाहीं. तूं इतकी शिकलीस पोरी, पण तुला जग कसं आहे याची कांहीं सुद्धां कल्पना नाहीं आलेली अद्याप. तो लिहितो काय न् तूं तें खरं मानतेस काय ? तुरुंगांत जाऊन बसल्यावर आतां तुला अशा तऱ्हेचीं पत्रं लिहायला काय वेंचतं त्याचं ? अग, प्रत्यक्ष आपला गर्भ पोटांत आहे याची जाणीव असतांना देखील दुष्यंतानं समोर येऊन उभ्या राहिलेल्या शकुंतलेला ओळख द्यायचं नाकारलं ! आणि तूं मला सांगतेस तो तुझ्याशीं लग्न करणार आहे म्हणून— "

" हो. खरंच करणार आहेत, माय. मी त्यांना गेल्याच आठवड्यांत पत्र पाठवून कळवली आहे ही गोष्ट— "

" कसं बोलतेस तूं हें, चंदन ? तो तुरुंगांत असतांना कसं लग्न होणार तुमचं ? तो लिहितो काय न् तूं त्यावर विश्वास ठेवतेस काय ?— "

" हो, हो. ते तुरुंगांत असले, तरी देखील लग्न होऊं शकेल आमचं. तसं लिहिलंच आहे त्यांनीं मला; न् या महिन्याच्या अखेर खात्रीनं लग्न होईल आमचं-"

" आणि कन्यादान करून तुमच्या डोक्यावर अक्षता टाकायला तुझी ती मावशी येणार असेल नाहीं ?— "

तें वाक्य उच्चारून रखमा एकदम मोठ्यानें हंसली आणि नंतर आपल्या कपाळावर हात मारून उद्गारली—

" चंदन, तूं आपलाहि गळा कापलास आणि आमचाहि गळा कापलास— "

" नको, नको माय, असं बोलं नकोस तूं भलतं सलतं ! माझ्यावर विश्वास ठेव. एवढी एक वेळ तरी माझ्यावर विश्वास ठेवून पहा. जर महिन्याच्या आंत आमचं लग्न झालं नाहीं, तर तूं आपल्या हातानं विष दे मला— "

चंदन रडत रडत म्हणाली.

पण रखमा कांहीं बोलली नाहीं. ती स्तब्ध उभी होती. खोलींतल्या त्या निःशब्द, मरणगंभीर वातावरणांत तिचा श्वासोच्छ्वास चंदनला स्पष्ट ऐकूं येत होता.

तिची ती विलक्षण स्तब्धता पाहून चंदन भयभीत झाली. एकादें प्रेत जसें भिंतीला टेकून उभें करून ठेवावें, तसें तिचें तें ताठरलेलें निश्चेष्ट शरीर, तो भेसूर चेहरा, ते भकास डोळे दिसत होते. ती निश्चेष्टता, तो भकासपणा चंदनला बघवेना. ती रखमाच्या जवळ गेली आणि तिच्या कमरेला विळखा घालून म्हणाली—

" माय, असं काय करतेस ? माझ्याशीं दोन शब्द तरी बोल ग— "

तिचा स्पर्श होतांच रखमाचें ताठरलेलें शरीर एकदम खचलें, तिच्या भकास डोळ्यांत अश्रूंचा पूर लोटला. आणि एक प्रकारच्या असहायतेनें ती चंदनला जवळ घेऊन उद्गारली—

" पोरी, मी तुला दोष देत नाहीं. आम्हींच दोघी रंडक्या दुर्दैवी. आमचं कमनशीब, आमचं पूर्वजन्मींचं पाप भोंवलं तुला— "

त्याबरोबर चंदननें तिचे डोळे पुशीत म्हटलें—

" माय, तूं उगाच दोष लावून घेतेस स्वतःला. ते खात्रीनं लग्न करतील माझ्याशीं— "

ते शब्द तिनें उच्चारले मात्र, रखमा एकदम तिच्यापासून दूर झाली.

ती पुन्हा कांहीं क्षण स्तब्ध होती. नंतर म्हणाली—

" हें बघ, तूं आतां एक गोष्ट तरी ऐक माझी— "

" कोणती माय ?— "

" आतां यापुढं हा प्रकार तूं कुणाजवळ बोलूं नकोस. मी पहातें काय करायचं तें. मोठया मायलासुद्धां कळतां कामा नये यांतलं कांहीं— "

" बरं—"

चंदन म्हणाली. आपण सिस्टरजवळ ही गोष्ट बोललों आहों असें आईला सांगून टाकावें असा विचार तिच्या मनांत आला. पण क्षणभरच. ती कांहीं बोलली नाहीं.

आईशीं सगळ्या गोष्टी स्पष्ट बोलून टाकल्यामुळें चंदनच्या मनावरचा भार हलका झाला ही गोष्ट खरी. पण तिची काळजी मात्र कमी झाली नाहीं. अभिमन्यूची वाट तिनें सारा दिवसभर पाहिली; व संध्याकाळींहि जेव्हां तो आला नाहीं, तेव्हां तिचें मन गांगरल्यासारखें होऊन मायनें सकाळीं व्यक्त केलेली दुष्ट शंका खरी तर होणार नाहीं, असा विचार पुनःपुन्हा तिच्या मनांत येऊं लागला. म्हणून प्रार्थनेच्या घंटेचा आवाज कानांवर पडतांच ती उठली आणि मिशनमध्यें गेली.

सिस्टर देवळांत जावयाला निघाली होती. चंदनला पहातांच ती थबकली आणि म्हणाली--

" कां ग, आज आली नाहींस सबंध दिवसांत ? मी सकाळपासून वाट पहातें आहे तुझी-- "

" अभीनं निरोप आणला वाटतं कांहीं ?— "

" हो. उद्यां नोटीस देणार आहे तो लग्नाची; न् बहुधा या महिनाअखेर लग्न होईल तुमचं-- "

" मावशी !-- "

चंदन हर्षभरानें तिचे दोन्ही हात घट्ट धरून उद्गारली.

सिस्टर क्षणमात्र कांहीं बोलली नाहीं. नंतर गळ्यांतला चांदीचा क्रॉस तिनें हातांत घेतला आणि ती अगदीं शांतपणानें म्हणाली--

" इतकी उतावळी होऊं नकोस, बेटा. खरी आनंदाची वेळ आलेली नाहीं अजून. तुझं लग्न एकदां निर्विघ्न पार पडूं या. मग आनंदच आहे सगळा पुढं-- "

पण, चंदनचें मन आनंदानें इतकें उल्हसून गेलें होतें कीं, सिस्टरच्या त्या सूचक उद्गारांतलें गांभीर्य तिला जाणवलें नाहीं. तिनें विचारलें--

" अभि केव्हां आला होता ?-- "

" आज सकाळीं. कदाचित् तो येईल आतां इतक्यांत तुला भेटण्यासाठीं. मला

माहीत होतं तूं संध्याकाळीं तरी प्रार्थनेला येशील हें. म्हणून मी त्याला ये म्हटलं मुद्दाम. बरं, चल, आपण देवळांत जाऊं या— "

त्या देवळाच्या चौथऱ्यापर्यंत जातात न जातात, तोंच सायकलवरून आलेला अभिमन्यु त्यांच्या जवळ येऊन खालीं उतरला.

त्याला पहातांच चंदनच्या चेहऱ्यावर लज्जेची छटा उसळली.

सिस्टरनें हंसून त्याच्या अभिवादनाचा स्वीकार केला आणि ती देवळांत गेली.

प्रार्थना सुमारे पाऊण तास चालली होती. ती संपून देऊळ रिकामें झाल्यावर सिस्टर त्या दोघांना म्हणाली—

" अभिमन्यु, भिकाऱ्यांची जेवायची वेळ झाली आहे. मी जाऊन येतें जरा वेळानें— "

आणि ती बाहेर पडली.

देवळाच्या झरोक्यांना असलेल्या रंगीत कांचांतून सायंसूर्याचीं किरणें आंत पडलीं होतीं. त्या क्षणोक्षणीं अंधुकत चाललेल्या सौम्य प्रकाशांत विलक्षण गांभीर्य भरलें होतें.

तीं दोघेंहि समोरासमोर स्तब्ध उभीं होतीं. शेवटीं अभिमन्यूनें विचारलें—

" त्याचा निरोप सांगितला का तुला सिस्टरनं ?— "

चंदन कांहीं बोलली नाहीं. तिचे डोळे भरून आले होते.

तिनें पदरानें डोळे पुसले आणि ती म्हणाली—

" अभि, तुमचे हे उपकार जन्मोजन्मीं फिटणार नाहींत मी माझ्या चामड्याचे जोडे करून तुमच्या पायांत घातले तरी— "

" तूं कांहींतरी वेड्यासारखं बोलतेस, चंदन— "

" नाहीं, नाहीं अभि. मी अगदीं मनापासून बोलतें आहे. तुम्हीं आणलेल्या त्या निरोपानं मला केवढा धीर आला, याची कधींहि कल्पना यायची नाहीं तुम्हांला. हिरा मोठी भाग्याची, म्हणून तुमच्यासारखा भाऊ लाभला तिला. या जन्मीं नाहीं, तरी पुढल्या जन्मीं तुमच्या पाठीं यावं, असं मागणं मागेन मी देवाला— "

बोलतां बोलतां पुन्हा तिचे डोळे भरून आले.

तिच्या तोंडचा तो उद्‌गार ऐकून त्यानें उसासा टाकला आणि आपल्या डोळ्यांच्या कडा रुमालानं टिपल्या. पण चंदनच्या लक्षांत ती गोष्ट आली नाहीं.

त्या दिवशीं रात्रीं जेवणाच्या वेळीं ती घरीं आली, ती जणुं एक प्रकारच्या सुख-स्वप्नांत, एक प्रकारच्या गोड तंद्रेंत होती. आपली आई आज नेहमींपेक्षां जास्त गंभीर दिसत आहे, हें कांहीं त्या आनंदाच्या भरांत तिच्या लक्षांत आलें नाहीं.

ती आज किती तरी दिवसांनीं इतकी चांगली जेवली कीं, येसू तिला म्हणाली देखील--

" तुझ्या तोंडाची चव आज परत आलेली दिसते आहे, बेटा--"

पण, रखमा मात्र अगदीं स्तब्ध, अगदीं गंभीर होती.

तिची ती सचिंत मुद्रा पाहून चंदनच्या मनांत आलें, अभिमन्यूनें आणलेली ती बातमी मायला सांगून टाकावी, म्हणजे तिच्या मनावरलें काळजीचें दडपण एकदम दूर होऊन जाईल.

पण, दुसऱ्याच क्षणीं तिला वाटलें, आपण बातमी सांगितली आणि तिच्यावर मायचा विश्वास बसला नाहीं तर? प्रत्यक्ष नोटीस दिल्याचें नक्की कळल्या-वरच आपण तिला सांगितलेलें बरें. नाहीं तरी पंधरा वीस दिवसांचाच काय तो आतां प्रश्न आहे.

त्यामुळें ती रखमाजवळ कांहीं बोलली नाहीं आणि जेवण झाल्यावर येसूशीं थोडा वेळ गप्पागोष्टी करून झोंपी गेली.

अवधूतला अटक झाल्यापासून किती तरी दिवसांत तिला इतकी गाढ झोंप लागली नव्हती.

त्या गाढ झोंपेंत ती असतांनाच तिला आपल्या अंगाला कसला तरी अगदीं थंड स्पर्श झाल्यासारखा वाटला आणि ती दचकून जागी झाली.

तिनें डोळे उघडून पाहिलें--

रखमा तिच्या खाटेजवळ बसली होती.

कंदिलाच्या अंधुक प्रकाशांत तिचा सुरकुतलेला चेहरा विलक्षण श्रांत, विलक्षण उदास दिसत होता.

तिला पहातांच चंदन कांहीं बोलणार, तोंच तिच्या तोंडावर हात ठेवून रखमा म्हणाली--

" मोठ्यानं बोलूं नकोस. पलीकडे मोठी माय निजली आहे, ती जागी होईल. तुला मळमळतं ना आतांशा सारखं? मी हें औषध तयार करून आणलंय तें घे--"

आणि तिनें कसला तरी काढा असलेला कप चंदनच्या हातीं दिला.

चंदननें तो कप तोंडाजवळ नेला आणि एकदम अंगावर शहारे आल्यासारखें करून खालीं ठेवला.

" नको माय. भयंकर उग्र न् कडवट दर्प आहे याला-- "

तिनें बोलतां बोलतां पुन्हा शहारे दिले.

" घे बेटा. त्यानं मळमळणं कमी होईल तुझं. नाहीं तर लक्षांत येईल मोठ्या मायच्या खरा प्रकार-- "

लहान मुलाला आर्जवून कडू औषध घ्यावयाला लावावें, तसें रखमानें तिला म्हटलें.

चंदननें पुन्हा तो कप तोंडाशीं नेला आणि पुन्हा तिच्या अंगावर शहारे आले.

तिनें कप खालीं ठेवला आणि आईला म्हटलें--

" उद्यां घेतलं तर नाहीं चालणार का, माय ?-- "

" नको, नको. आजच घे. त्यांच्या देखत देणं शक्य नाहीं म्हणून तर एवढ्या रात्रीं उठवून देतें आहे मी तें तुला-- "

" बरं, घेतें बाई-- "

चंदननें एका घोटांत तो काढा घेतला आणि कप खालीं ठेवला.

रखमाच्या उदास चेहऱ्यावर समाधानाची चमत्कारिक तिरीप उमटून गेली.

# अखेर                                                                                    ३३

" चंदन, ऊठ बेटा, चल माझ्याबरोबर-- "

" तिला कुठं घेऊन जातां सासूबाई, अशा स्थितींत ?-- "

चंदनच्या खाटेजवळ आलेल्या येसूला आवरण्याचा प्रयत्न करीत रखमा म्हणाली.

" कुठं म्हणजे ? चंदनवाडीला. परवांच अंजू सांगत होती मला चंदनवाडीचा हर्रास झाला म्हणून. देशपांड्यांचं रीठ सुद्धां राह्यलं नाहीं आतां तिथं. हिला घेऊन आत्तांच्या आत्तां चंदनवाडीला जाऊं. माझ्या वर्धेचं तीर्थ तोंडांत पडल्याबरोबर बरं वाटेल हिला. सतीच्या आशीर्वादानं लाभली आहे ही आपल्याला. तिच्या तीर्थानंच बरी होईल ही-- "

येसूनें हातवारे करीत काढलेले ते उद्गार ऐकून चंदन म्हणाली—

" मोठी माय, मला थोडं बरं वाटलं, म्हणजे आपण जाऊं चंदनवाडीला. तूं नीज जाऊन आतां. साऱ्या रात्रभर जागरण झालंय तुला— "

तिचा आवाज खोल गेला होता, डोळे खोल गेले होते. कंदिलाच्या अंधुक प्रकाशांत तिच्या नाकाचा आणि गालहाडांचा उंचपणा अधिकच जाणवत होता.

तिच्या शेजारीं बसून तिला वारा घालीत असलेली रखमा टिपें गाळीत होती. चंदननें तिला म्हटलें--

" माय, तूं उगीच लावून घेऊं नकोस आपल्या मनाला. तूं केलंस तें माझ्या भल्यासाठींच केलंस. त्यांत तुझा कांहीं दोष नाहीं. तूं म्हणाली होतीस तेंच खरे. माझ्या नशिबीं ते नव्हते, म्हणून दशा झाली माझी अशी-- "

रखमा कांहीं बोलली नाहीं. तिनें मुकाट्यानें डोळे पुसले.

त्या दिवशीं रात्रीं चंदन जी काढा घेऊन निजली, ती दुसऱ्या दिवशीं सकाळीं थोडी उशिरानेंच उठली. पण, ती निजून उठली, तेव्हां तिचें मन इतकें कांहीं प्रसन्न होतें कीं, त्या उल्हासाच्या भरांत मायनें आपल्याला मध्यरात्रीं उठवून कांहीं तरी प्यावयाला दिलें, याचेंहि स्मरण तिला राहिलें नाहीं. संध्याकाळच्या सुमारास तिच्या ओटीपोटांत दुखूं लागलें आणि स्रावहि सुरू झाला. तेव्हां तिला वाटलें, आपल्याला दिवस गेले असल्याची जी शंका गेले तीन आठवडे आपल्या मनाला सारखी सतावून सोडीत होती, ती चुकीची तर नव्हती ना? आणि तिच्या मनावर गेला पाऊण महिना असलेलें काळजीचें दडपण एकदम दूर झालें.

पण, हें तिचें समाधान फार वेळ टिकलें नाहीं. रात्रभर तिच्या ओटीपोटांत सारखे पेटके येत होते आणि सकाळीं तिला अंथरुणावरून उठवेना. रखमाच्या ध्यानांत तिची ती स्थिति आली. पण, ती कांहींच न बोलतां, आपली वेळ होतांच कामावर निघून गेली.

पण, चंदनला जेव्हां त्या वेदना सहन होईनाशा झाल्या, तेव्हां तिनें येसूला हांक मारून म्हटलें—

" मोठी माय, मला बरं वाटत नाहीं. तूं मावशीला बोलावून घे लवकर. म्हणजे ती कांहीं तरी औषध देईल मला— "

" काय होतंय पोरी तुला! काल संध्याकाळपर्यंत तर मजेंत होतीस— "

" हो. पण काल रात्रीपासून सारखं पोटांत दुखतंय— "

" पण नेहमींच असा त्रास होतो नाहीं का तुला पहिल्या दिवशीं?— "

" पण आज होत असलेला त्रास कांहीं निराळाच आहे. तूं मावशीला बोलावून आण लवकर— "

चंदनला तेवढ्या त्या बोलण्यानें धाप लागल्यासारखी झाली.

" बरं बोलावतें हं—"

येसूनें काळजी वाटून म्हटलें.

सिस्टर आली, त्या वेळीं चंदन आपल्या खोलींत खाटेवर निपचित पडली होती.

ती आंत येतांच चंदननें डोळे उघडले आणि हंसण्याचा प्रयत्न केला. पण तिचे ओठ ज्या वेळीं स्मित करण्यासाठीं विलग झाले, त्याच वेळीं तिच्या डोळ्यांच्या कडांना आंसवें तरारलीं.

" काय होतंय बेटा तुला?—"

सिस्टरनें तिचा हात आपल्या हातांत घेऊन विचारलें.

पण तिच्या हाताचा स्पर्श होतांच सिस्टर एकदम चरकली.

तो हात अगदीं गार गार आणि घामानें भिजून गेलेला होता.

सिस्टरनें तिच्याकडे न्याहाळून पाहिलें. तिचें कपाळ आणि तोंड हीं घामानें डवरून गेलीं होतीं, ओठांच्या नाजूक लाल कळ्या करपून काळवंडून गेल्या होत्या व गालहाडें एकदम वर आल्यासारखीं दिसत होतीं.

तिनें चंदनच्या तोंडाजवळ तोंड नेऊन अगदीं हलकेंच विचारलें—

" तुला काय होतंय, सांग बरं मला— "

चंदननें एक दोन वाक्यांतच आपल्याला काय होत आहे, हें तिला सांगितलें.

पण, तीं वाक्यें उच्चारल्याबरोबर तिला पुन्हा धाप लागली.

सिस्टर क्षणमात्र स्तब्ध होती.

आपल्या कपाळाला आलेला घाम तिनें पुसला आणि गळ्यांतला क्रॉस हातांत घेऊन विचारलें—

" चंदन, तुझ्या मायनें कांहीं औषध दिलं का तुला ?— "

चंदनचे डोळे मिटलेले होते. पण त्या मिटलेल्या डोळ्यांतून ठिबकणारीं आंसवें सिस्टरला दिसत होतीं.

ती खालीं वांकली आणि तिनें पुन्हा अगदीं कळवळून विचारलें—

" खरं सांग बेटा. हें कसं झालं ? तुझ्या मायनं तुला कांहीं औषध दिलं का ? कांहीं तरी जालीम पदार्थ तुझ्या पोटांत गेल्याशिवाय कांहीं हें झालेलं नाहीं— "

तिचा तो उद्गार ऐकतांच चंदननें डोळे उघडले आणि पदराच्या शेवानें आंसवें टिपून म्हटलें—

" नाहीं मावशी, मायनं कांहींहि दिलं नाहीं मला— "

" मग हें कसं झालं ? तूं आज खरं नाहीं सांगत बेटा— "

" नाहीं, मावशी. अगदीं खरं खरं सांगतें. परवां रात्रीं हींव भरल्यासारखं वाटलं. म्हणून मीं कोयनेल घेतलं. त्यामुळं झालं असेल कदाचित् असं— "

" छे, कोयनेलनं शक्य नाहीं इतकं होणं. तूं खरं नाहीं सांगत मला— "

" नाहीं, मावशी. मी अगदीं खरं खरं सांगतें. मायनं कांहींहि दिलं नाहीं मला आणि तिला कल्पनाहि नाहीं मला असं कांहीं होत असल्याची. मी खरंच सांगतें तुला, मीं कोयनेल घेतलं, त्याचा परिणाम असेल हा— "

" किती घेतलं होतंस ?— "

" तें आठवत नाहीं आतां— "

सिस्टर कांहीं बोलली नाहीं. तिनें क्रॉस कपाळाला लावला, मनगटावरल्या घड्याळाकडे पाहिलें आणि ती म्हणाली—

" तूं बिलकूल हलूं नकोस खाटेवरून. मी डॉ० फर्नांडिसला घेऊन येतें आणि ती काय म्हणते तें पहातें— "

आणि सिस्टर येसूशीं थोडें सूचक बोलून बाहेर पडली.

डॉ० फर्नांडिसला घेऊन सिस्टर जेव्हां तासाभरानें परत आली, तेव्हां चंदनच्या चेहऱ्यावर निळसर झांक आली असून तिला धाप लागली असल्याचें सिस्टरच्या नजरेस आलें.

फर्नांडिस चंदनच्या खाटेजवळ गेली आणि तिला तपासावयाला सुरवात करून म्हणाली—

" तूं बिलकूल घबराट होऊं नको, बेटा. मी तुला अस्पतालांत घेऊन जाईन आमच्या न् खडखडीत बरी करून देईन— "

नंतर तिनें सिस्टरकडे वळून इंग्रजींत म्हटलें—

" तूं म्हणालीस तें खरं आहे, ख्रिश्चियाना. हिच्या पोटांत कांहींतरी जालीम पदार्थ गेला असला पाहिजे. एरवीं असं होणार नाहीं. हिच्या आईनं तर हिला गर्भपात व्हावा म्हणून कांहीं गांवठी औषध दिलं नसेल ना ?— "

फर्नांडिसचा तो प्रश्न ऐकतांच चंदन आपल्या अंगांतलें सगळें बळ एकवटून इंग्रजींत म्हणाली—

" तुम्ही फुकट संशय घेतां आहांत माझ्या मायचा. मीं मघांशींच सांगितलं मावशीला कोयनेल घेतल्याचा हा परिणाम असेल म्हणून. माझ्या मायनं जर मला जालीम औषध दिलं असतं, तर ती या स्थितींत मला टाकून कामावर कशी गेली असती, डॉक्टर ?— "

तेवढ्या त्या बोलण्यानें तिला धाप लागून विलक्षण थकवा आला; व तिनें डोळे मिटले.

डॉ० फर्नांडिस तिला कांहीं उत्तर देणार, तोंच सिस्टरनें तिला खूण केली. तेव्हां ती आपल्या ओठाशीं आलेले शब्द गिळून म्हणाली—

" हिला आतांच्या आतां हॉस्पिटलमध्यें नेलं पाहिजे. मी स्ट्रेचर न् अॅब्युलन्स कार पाठवून देतें--"

तिची ती सूचना ऐकतांच सिस्टरच्या कपाळावरल्या आंठ्या एकदम दाट झाल्या आणि ती इंग्रजींतच म्हणाली—

" मला तिच्या आजीला विचारलं पाहिजे. या हिंदु बायकांना हॉस्पिटल म्हणजे कांहीं तरी भयंकर वाटतं--"

लगेच तिनें येसूला हांक मारली आणि तिला चंदनच्या आजाराची थोडीशी कल्पना देऊन हॉस्पिटलमध्यें नेण्याची आवश्यकता समजाऊन सांगितली.

त्याबरोबर येसू एकदम घाबरून जाऊन म्हणाली—

" अस्पतालांत कशाला न्यायला हवं ? इथं औषधपाणी करून बरं नाहीं का वाटणार हिला ?— "

तेव्हां डॉ० फर्नांडिस मध्येंच म्हणाली—

" आजीबाई, तुम्ही घाबरून जाऊं नका. अस्पतालांत नेल्यानं सारखी नजर राहील हिच्यावर माझी न् मला जरूर तर ऑपरेशनहि करतां येईल ताबडतोब--"

तो ऑपरेशन हा शब्द फर्नांडिसनें उच्चारला मात्र, येसू एकदम कपाळाला हात लावून म्हणाली--

" नाहीं, नाहीं. तिच्या मायला विचारल्याशिवाय मी हलवूं देणार नाहीं तिला मुळींच इथून. अस्पतालांत गेललं माणूस परत येत नाहीं म्हणतात कधीं घरीं जिवंत. आणि त्यांतून तुम्ही तर हिला नेऊन चीरफाड करणार— "

सिस्टरनें तिची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण ती कांहीं केल्या चंदनला हॉस्पिटलमध्यें पाठवावयाला कबूल होईना.

शेवटीं असें ठरलें कीं, दुपारीं साडे अकरा वाजतां तिनें गिरणींत जाऊन रखमाला बोलावून आणावें आणि नंतर चंदनला हॉस्पिटलमध्यें न्यावयाचें कीं नाहीं हें निश्चित करावें.

चंदनला हॉस्पिटलमध्यें न्यावयाला होत असलेला तो विलंब डॉ० फर्नांडिसला अगदीं अक्षम्य वाटला. पण येसूच्या हट्टापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं.

दुपारीं रखमा जेव्हां गिरणींतून परत आली, तेव्हां सिस्टरनें तिला थोडक्यांत चंदनच्या दुखण्याचें गंभीर स्वरूप समजावून सांगितलें आणि तिला हॉस्पिटलमध्यें नेल्याशिवाय गत्यंतर नाहीं, ही गोष्ट तिच्या लक्षांत आणून दिली.

चंदनची ती विलक्षण स्थिति पाहून रखमा आधींच घाबरून गेली होती. तिनें चंदनला हॉस्पिटलमध्यें नेण्याच्या कल्पनेला तत्क्षणींच संमति दिली.

पण येसू कांहीं केल्या ऐकेना. हॉस्पिटलमध्यें घरच्यापेक्षां चांगल्या सोई होतात, वगैरे सगळ्या गोष्टी सिस्टरनें तिला परोपरीनें समजावून सांगितल्या. पण ती कांहीं केल्या चंदनला घरांतून हलविण्याच्या त्या कल्पनेला कबूल होईना.

तिची ती बडबड आणि तें रडणें चंदनच्या कानांवर गेलें, तेव्हां तिनें सिस्टरला हांक मारून म्हटलें--

" मावशी, माझं काय व्हायचं असेल, तें इथंच होऊं दे. मोठ्या मायला नाराज करून तूं हलवूं नकोस मला इथून-- "

" चंदन, तूं शिकलीसवरलेली आहेस. तुला सगळ्या गोष्टी समजतात. आपल्या आजीची समजूत घालण्याऐवजीं तूं असं कसं वेडयासारखं बोलतेस ?— "

" मी वेडयासारखं बोलत नाहीं, मावशी. तुला खरोखरीच वाटतं का मी यांतून उठेन असं ? म्हणून म्हणतें, जर मरायचंच आहे, तर मग इथंच, माझ्या या खोलींत, मोठ्या मायच्या मांडीवर मरूं दे मला. ऑपरेशन टेबलवर मरण्याची इच्छा नाहीं माझी— "

चंदनचे ते निर्वाणीचे उद्गार ऐकून सिस्टरच्या काळजाचें अगदीं पाणी पाणी झालें. तिनें गळ्यांतला क्रॉस मुकाट्यानें कपाळाला लावला आणि ती आवंडा गिळून म्हणाली—

" बेटा, तूं असं भलतं सलतं का बोलतेस ! तुला ताबडतोब जर उपचार झाले, तर तूं बरी होशील खात्रीनं— "

" नाहीं मावशी. तुझा भ्रम आहे हा. मी बरी व्हावी आणि त्यांचं न् माझं लग्न व्हावं इतकं चांगलं नशीब नाहीं माझं. तुला जाणीव आहे माझ्या स्थितीची. मला आतां मरण तरी सुखानं येऊं दे तुमच्या सगळयांच्या सान्निध्यांत-- "

" नको बोलूं असं, बेटा— "

सिस्टरच्या डोळ्यांतून टिपें पडत होती.

" नाहीं मावशी. मी जें मला वाटतं, जें अंतर्यामांतून मला जाणवतं, तेंच बोलतें आहे. माझ्या सगळ्या शरीराला ओढ लागली आहे. सगळ्या गात्रांची तगमग होते आहे. मला इथंच राहूं दे आतां. मात्र तूं आतां मला सोडून जाऊं नकोस कुठं— "

त्यावर सिस्टर कांहीं बोलली नाहीं. तिनें ताबडतोब डॉ. फर्नांडिसला चिठी पाठवली आणि अभिमन्यूलाहि निरोप धाडला.

डॉ. फर्नांडिस आणि अभिमन्यु हीं दोघें एकदमच तिथें आलीं. चंदनची ती विलक्षण अवस्था पाहून अभिमन्यु थक्क होऊन गेला. पण त्यानें कांहीं बोलून मात्र दाखविलें नाहीं. क्षणार्धांत त्याच्या लक्षांत सगळा प्रकार आला.

डॉ. फर्नांडिसनें आल्याबरोबर एक इंजेक्शन दिलें आणि बाहेर आल्यावर सिस्टरला म्हटलें—

"फार रक्त गेलंय, ख्रिश्चियाना. मला कांहीं आशा नाहीं फारशी-- "

" पण कोणताहि प्रयत्न करायचा शिल्लक ठेवूं नकोस तूं— "

" हो. या इंजेक्शनचा परिणाम पहातें आणि मग ठरवतें— "

डॉ. फर्नांडिस गेल्यावर अभिमन्यु चंदनजवळ गेला आणि तिला म्हणाला—

" चंदन, मी आलोंय-- "

त्याचे ते शब्द कानांवर पडतांच तिनें डोळे उघडले आणि विचारलें—

" हिरा कुठें आहे? तिला का नाहीं आणलीत?— "

" मला मुळींच कल्पना नव्हती तूं इतकी आजारी असशील अशी. यांचा निरोप आल्यामुळें आलों मी-- "

तेवढें बोलून तो थांबला आणि नंतर त्यानें विचारलें—

" अवधूतला भेटायची इच्छा आहे का तुला? त्याची भेट झाल्यानं तुला बरं वाटेल खात्रीनें— "

" ते कसे येऊं शकतील?-- "

" तूं आजारी असल्याचं कळवल्यावर त्याची सुटका होऊं शकेल कदाचित् कांहीं तासांपुरती-- "

त्याच्या त्या उत्तराचा तिनें कांहीं वेळ डोळे मिटून विचार केला आणि नंतर ती म्हणाली—

" नको. माझी ही स्थिति पाहून वेडयासारखं होऊन जाईल त्यांना-- "

" पण तुला बरं नाहीं का वाटणार तो भेटल्यानं?— "

" मी बरं व्हायच्या स्थितीच्या पलिकडे गेलें आहे आतां, अभि. नको, त्यांना दिसायला नको माझी ही स्थिति. माझी ही अवस्था पाहून त्यांच्या मनाला अतिशय वेदना होतील, आपल्या उतावळेपणाबद्दल त्यांना-- "

पण तेवढेंच बोलून ती थांबली आणि तिनें डोळे मिटले.

तो कांहीं बोलला नाहीं. फक्त त्याच्या डोळ्यांतून अश्रु पडत होते.

दिवस जसजसा कलत गेला, तसतशा तिच्या यातना वाढत गेल्या.

संध्याकाळीं पुन्हा डॉ. फर्नांडिस आली आणि तिनें आणखी एक इंजेक्शन दिलें.

पण चंदनच्या यातना कमी झाल्या नाहींत. तिच्या डोळ्यांतून सारखें पाणी जात होतें, घशाला सारखी कोरड पडत होती आणि अंगाचा सारखा दाह होत होता.

तिचें अर्धे अधिक शरीर येसूच्या मांडीवर होतें; व रखमा तिला वारा घालीत होती. हातांत जपमाळ घेऊन खुर्चीवर बसलेली सिस्टर साखरपाणी चमचानें सारखें तिला पाजीत होती.

रात्रीं नवाच्या सुमाराला ती एकदम घाबरली आणि तिच्या नाडया सुटल्या.

त्याबरोबर सिस्टरनें अभिमन्यूला डॉ. फर्नांडिसकडे पाठवला.

तिची ती अवस्था पाहून येसूचा तोल सुटला आणि ती बडबडूं लागली. तिनें रखमाला म्हटलें--

" सूनबाई, त्या डॉक्टरणीच्या दवाईनं कांहीं व्हायचं नाहीं. हिला आतांच्या आतां चंदनवाडीला घेऊन जाऊं या आपण— "

" सासूबाई, भलतंच काय आठवलंय हें तुम्हाला ? तुम्ही पहातां आहांत ना ती कोणत्या स्थितींत आहे तें— "

रखमा वैतागानें म्हणाली.

पण, तेव्हांपासून येसूची जी तिला चंदनवाडीला घेऊन जाण्यासंबंधीं बडबड सुरू झाली, ती कांहीं केल्या थांबेना.

त्या बडबडीचा अर्थ चंदनची नाडी हातांत धरून बसलेल्या सिस्टरच्या तत्क्षणींच लक्षांत आला आणि ती रखमाला म्हणाली--

" तुम्ही वाद घालूं नका त्यांच्याशीं. त्या घाबरल्या आहेत न् त्यामुळं त्यांच्या डोक्यांत फरक पडलाय. त्या बोलतील तें मुकाटयानें ऐकून घ्या-- "

पण येसूला आतां चंदनच्या खोलींत राहूं देणें इष्ट नव्हतें. म्हणून सिस्टरनें मोठ्या खुबीनें तिची समजूत घालून तिला चंदनजवळून उठवली आणि बाहेर नेली.

तोंच डॉ. फर्नांडिस आली आणि तिनें इंजेक्शन देण्याची तयारी केली. ती चंदनच्या जवळ गेली आणि तिला इंजेक्शन देणार, इतक्यांत येसूनें आंत येऊन एकदम तिचा हात धरला आणि म्हटलें--

" तुमच्या या सुया टोंचण्यानें का ही बरी होणार आहे, डॉक्टरीणबाई ! मी उजाडल्याबरोबर हिला घेऊन जातें चंदनवाडीला. आणि मग पहा वर्षेचं तीर्थ घेतल्याबरोबर तिला कसा आराम पडतो तो-- "

रखमा आणि अभिमन्यु यांनीं मोठ्या मुष्किलीनें तिची समजूत घालून तिला बाहेर नेली; व मग डॉक्टरनें चंदनला इंजेक्शन दिलें.

पण, मध्यरात्र उलटून गेली, तरी ती ग्लानींतच होती. सिस्टर तिला आपल्या मांडीवर घेऊन सारखें चमचानें पाणी पाजीत होती; व रखमा तिला वारा घालीत होती.

पहांटेच्या सुमाराला तिला थोडी हुषारी वाटली आणि तिनें डोळे उघडून सिस्टरला म्हटलें--

" मावशी, तूं आडवी हो जरा आतां. मला बरं वाटतंय थोडं. माय आहेच बसलेली माझ्याजवळ-- "

तिच्या त्या आग्रहाच्या सांगण्यामुळें सिस्टरनें हळूच तिचें डोकें उशीवर ठेवलें आणि ती छपरींतल्या खाटेवर जाऊन पडली.

येसूच्या येरझारा आणि बडबड सारखी चालू होती.

ती मधून मधून चंदनच्या जवळ येई आणि तिच्याशी कांहीं बाही बोले.

चंदन तिच्याशीं एकाद दुसरा शब्द बोलून तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करीत असे.

ती अगदींच अनावर होऊन चंदनला उठवूं लागली, म्हणजे रखमा अभिमन्यूच्या मदतीनें तिला बाहेर काढून देत असे.

या स्थितींतच दिवस उजाडला.

प्रातःसूर्याचे भगभगीत किरण खोलींत आले आणि चंदनला इतका वेळ वाटत असलेली हुषारी सगळी नाहींशी होऊन तिला पुन्हा शोष लागला.

सिस्टर तोंडावरून पाण्याचा हात फिरवून आंत आली.

तिला पहातांच चंदन म्हणाली—

" पाणी दे ग थोडं-- "

त्याबरोबर रखमानें पाण्यानें भरलेला चमचा तिच्या तोंडाशीं नेला.

पण चंदननें एकदम तोंड फिरवलें आणि क्षणमात्र थांबून म्हटलें—

" मावशी, मांडीवर घे मला आतां तूं-- "

सिस्टर जवळ आली आणि तिनें चंदनचें डोकें अलगद उशीवरून उचलून तिला आपल्या मांड़ीवर घेतलें.

चंदनचा श्वास जड झाला होता, दृष्टि विचल झाली होती.

सिस्टरच्या डोळ्यांतून सारखें पाणी ठिबकत होतें.

चंदननें डोळे उघडून तिच्याकडे पाहिलें आणि म्हटलें—

" पाणी दे ग मला थोडं— "

रखमानें चटकन् साखरपाण्याचा पेला पुढें केला. सिस्टरनें त्यांतून चमचानें पाणी घेतलें आणि तें तिच्या करपलेल्या ओठांजवळ नेलें.

त्या पाण्याचे दोन तीन घोट तिनें घेतले आणि एकदम हुशारी आल्यासारखें वाटून ती म्हणाली—

" मावशी तूं एक गोष्ट करशील कां माझ्यासाठीं !— "

" काय बेटा !-- "

सिस्टरनें खालीं वाकून विचारलें.

चंदन एक एक शब्द अगदी सावकाश उच्चारीत मोठ्या कष्टानें म्हणाली—

" माझ्या मोठ्या मायला अंतर देऊं नकोस. तिची पाह्यलीस ना काय अवस्था झाली आहे ती ! माझा जीव तिच्यासाठीं ओढ खातो आहे. मी मेल्यानं इतर कुणाचं कांहीं अडायचं नाहीं. पण माझ्या यातना पाहून ती मात्र उठली आहे आतांच या जगांतून. तिला सांभाळ. एवढं वचन दे मला. म्हणजे मग मी सुखानं मरतें-- "

सिस्टरला बोलवेना. तिच्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर लोटला.

" मावशी, ऐकलंस ना मी काय म्हटलं तें ?— "

चंदननें पुन्हा विचारलें.

" हो, बेटा. मी कधींहि अंतर देणार नाहीं तुझ्या मोठ्या मायला-- "

सिस्टरनें हुंदका आवरून उच्चारलेले ते शब्द कानांवर पडतांच चंदनच्या कोमेजलेल्या चेहऱ्यावर स्मिताची क्षीण रेषा उमटली.

पण क्षणार्धच.

धनतेरस, १९४२ शांतानिवास, नागपूर